


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या महाराष्ट्र साहित्य पत्रिका ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून महाराष्ट्र साहित्य परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. हे अंक सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका








महाराष्ट्र साहित्य परिषदेचे त्रैमासिक मुखपत्र

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

अंक २७८, जुलै - सप्टेंबर १९९६



**विशेष सूचना**

म. सा. प. ची वार्षिक साधारण सभा रविवार दि. २८।७।९६ सायं. ४-३० वाजता परिषदेच्या माधवराव पटवर्धन सभागृहात भरणार आहे. सर्व सभासदांनी या सभेस उपस्थित राहावे ही विनंती. या अंकात - अहवाल, ताळेबंद व हिशेब पत्रके समाविष्ट आहेत.

डॉ. गं. ना. जोगळेकर, कार्याध्यक्ष

मुखपृष्ठ : महेश गावडे

---

- या अंकाची किंमत : ३० रुपये
  वार्षिक वर्गणी (संस्थांसाठी) १०० रुपये
  आजीव सदस्य शुल्क : ५०० रु. वार्षिक सदस्य शुल्क : ५० रु.

---



---

- मुद्रक-प्रकाशक : राजा फडणीस, प्रमुख कार्यवाह, महाराष्ट्र साहित्य परिषद, टिळक रस्ता, पुणे ४११ ०३०. (दूरभाष : ४७५९६३)
- मुद्रणस्थळ : वालोद्यान प्रेस, पुणे २

अनुक्रमणिका



# अनुक्रमणिका



• बी. रघुनाथ यांच्यावर परभणी येथे झालेल्या चर्चासत्रात वाचलेले निबंध

★ पत्रिकेत प्रसिद्ध होणाऱ्या लेखातील मते त्या त्या लेखकाची असतात.
त्या मतांशी म. सा. परिषद सहमत असेलच असे नाही.

## सूचना

★ अभ्यासपूर्ण, संशोधनात्मक लेखांना पत्रिकेत आवर्जून स्थान देण्याचा संकल्प आहे. मात्र असे लेख पाठवण्यापूर्वी त्यांचा विषय, प्रतिपादनातील वेगळेपणा व अंदाजे शब्दसंख्या इत्यादी तपशील देणारे पत्र पाठवावे म्हणजे तो लेख पत्रिकेसाठी विचारात घेता येईल की नाही हे आधी कळवता येईल.

★ आपल्या लेखाची एक प्रत आपल्याकडे ठेवावी. लेखाबद्दलचा निर्णय एका महिन्यात कळवला जाईल. नापसंत लेख परत पाठवण्यात येणार नाही. त्यासाठी लेखाबरोबर पोस्टेज पाठवू नये.

## संपादकीय

महाराष्ट्र साहित्य परिषदेचा नव्वदावा वर्धापन दिवस दि. २७ मे १९९६ रोजी राजेंद्र बनहट्टी यांच्या अध्यक्षतेखाली साजरा करण्यात आला. यंदाच्या म.सा.प. पुरस्काराचे मानकरी विख्यात कादंबरीकार श्री. ना. पेंडसे यांनी आपल्या भाषणात मराठी भाषा व साहित्य यांच्या संदर्भात इंग्रजी माध्यमाचा वाढता प्रसार आणि मराठी साहित्याची सद्य:स्थिती याबद्दल चिंता प्रकट केली. कोणत्याही भारतीय भाषेत मानाने वसतील अशा कादंबऱ्या मराठीत आहेत. पण त्या कादंबऱ्या जागतिक संदर्भात महान ठरतील का असा प्रश्न त्यांनी केला. तशातच आजच्या ललित लेखकांच्या झटपट प्रसिद्धीच्या व पैसा मिळवण्याच्या प्रवृत्तीबद्दलही त्यांनी नाराजी व्यक्त केली. इंग्रजी माध्यमाबद्दल उगाच बाऊ करू नये असे म्हणून बंगाल व दाक्षिणात्य राज्यात आपल्यापेक्षा इंग्रजीचा प्रसार अधिक असूनही तेथील साहित्य हे आपल्यापेक्षा उजवे आहे आणि राष्ट्रीय पातळीवरील पुरस्कारही तिकडेच जास्त जातात याकडे त्यांनी लक्ष वेधले. इंग्रजी माध्यमामुळे मराठीची आबाळ होते हे मत त्यांना मान्य नाही. इंग्रजी उत्तम येणे हे काळाचे आव्हान आहे. इंग्रजीवर प्रभुत्व नसल्याने मराठी माणूस मागे पडत आहे, असे त्यांनी म्हटले.

प्रमुख पाहुणे म्हणून बोलताना नामवत शास्त्रज्ञ व पुणे विद्यापीठाचे कुलगुरू डॉ. वसंतराव गोवारीकर यांनी मराठीची पीछेहाट होत नसून उलट तिचा प्रसार व प्रभाव वाढत आहे असे प्रतिपादन केले. पूर्वी शिक्षण ही मध्यमवर्गीयांचीच मिरामदारी होती. सध्या ते सर्व थरात पसरल्यामुळे मराठीचा वाचकवर्ग मोठ्या प्रमाणावर वाढत आहे. त्याचबरोबर राज्यशासनही आता पत्रव्यवहारात व कामकाजात मराठीचा वापर अधिक करू लागले आहे. न्यायदानातही मराठीत निकालपत्रे लिहिण्याचे धोरण अनेक न्यायाधीश राबवत आहेत. महाराष्ट्रात राहणारे परभाषकही मराठी आत्मसात करीत आहेत. विद्यापीठातही मराठी विषय घेणाऱ्यांची संख्या पूर्वी कधी नव्हे इतकी वाढली आहे. तेव्हा मराठीला भवितव्य नाही अशी हाकाटी करण्यात अर्थ नाही. डॉ. गोवारीकर नेहमी विधायक व सकारात्मक बाजूवर भर देतात. त्यामुळे त्यांचे हे भाषण उत्साहवर्धक वाटते.

याच कार्यक्रमाच्या वेळी डॉ. भीमराव कुलकर्णी पुरस्कार इंदूरचे श्री. घाटे यांना आणि गौरव निधी त्रिवेंद्रमच्या श्री. टी. भीमराव यांना प्रदान करण्यात आला. परिषदेच्या

## परिषदेचा इतिहास

महाराष्ट्र साहित्य परिषदेचे एक विश्वस्त श्री. म. श्री. दीक्षित यांचा परिषदेशी गेली चाळीसावर वर्षे विविध नात्यांनी घनिष्ट संबंध आहे. राज्य मराठी विकास संस्थेने त्यांजवर महाराष्ट्र साहित्य परिषदेचा इतिहास लिहिण्याचे काम सोपवले. त्यांनीही ते अल्पावधीत पूर्ण केले. त्या पुस्तकाचे प्रकाशन म. सा. परिषदेच्या ९० व्या वर्धापन दिनी पुणे विद्यापीठाचे कुलगुरू वसंतराव गोवारीकर यांच्या हस्ते करण्यात आले. या पुस्तकामुळे परिषदेच्या वाटचालीची कल्पना सहजपणे येते. श्री. दीक्षित हे त्याबद्दल धन्यवादास पात्र आहेत.

## शाखा मेळावा

यंदा वर्धापन दिनाच्या आदल्या दिवशी म्हणजे दि. २६ मे रोजी शाखा मेळावा घेण्यात आला. त्या मेळाव्याला बहुतेक सर्व शाखांचे पदाधिकारी उपस्थित होते. नवती महोत्सवासाठी दरमहा एकेका जिल्ह्यात जिल्हा सभासद मेळावा घेण्याची व नवतीसाठी निधी गोळा करण्याची कल्पना सर्वांनी उचलून धरली. ठाणे (जून), अहमदनगर (जुलै), सोलापूर (ऑगस्ट), धुळे (सप्टेंबर), लासलगाव (ऑक्टोबर), फलटण (नोव्हेंबर), इस्लामपूर (डिसेंबर), या ठिकाणी हे मेळावे होणार आहेत. श्री. जाधव (पिंपरी), अशोक गोवंडे (इचलकरंजी), भालचंद्र रेडे (कल्याण), नामदेवराव देसाई (सोनई), भगवान ठाकूर (धुळे), प्रभाकर संत (कल्याण), व्यंकटेश देशपांडे (फलटण), धोंडीराम सलगर (इस्लामपूर), जे. जे. कुलकर्णी (सोलापूर), पद्माकर शिरवाडकर (ठाणे), मधुकर हसमनीस (इस्लामपूर), पोखरकर, उपाध्ये (श्रीरामपूर) वगैरे प्रतिनिधींनी आपल्या अडचणी मांडून अनेक सूचनाही केल्या. म.सा.प.चे काही कार्यक्रमही शाखांनी घेण्याची तयारी दाखवली.

## चौथी जागतिक मराठी परिषद

इस्त्रायलमध्ये चौथी जागतिक मराठी परिषद लौकरच होणार आहे; त्या निमित्ताने तेथील मराठी भाषिकांची जोरात पूर्वतयारी चालू आहे. परिषदेचे कार्याध्यक्ष माधव गडकरी आणि संगीत दिग्दर्शक - गायक यशवंत देव यांनी नुकतीच इस्त्रायलला भेट देऊन आगामी परिषदेच्या कार्यक्रमाचा तपशील ठरवला. त्याचवेळी 'मायबोली' या तेथील मराठी मासिकाचा आठवा वर्धापन दिनही साजरा करण्यात आला. तेथील मराठी भाषकांची संख्या ३० हजारावर असून त्यांची सांस्कृतिक भूक मोठी आहे असे श्री. गडकरींना आढळून आले. तेथे 'मायबोली'चा चांगला प्रसार आहे. त्याचे संपादन श्रीमती फ्लोरा सॅम्युअल या करतात. मराठी भाषकांना जोडणारा एक भक्कम दुवा म्हणून हे मासिक तेथे चांगले रुजले आहे. लेवी एलायजा हे मराठी लोकांच्या समस्यांवर मराठीत लेखन करतात. अखिल भारतीय ज्यू संघटनेचे अध्यक्ष जेरूसलेम मधील नोहा मस्सील हे मराठीत कविता करतात. तेथील मराठी भाषकांना नवीन मराठी पुस्तके व लेखक यांच्याबद्दल आस्था आहे. देणगीदाखल त्यांना नवी मराठी पुस्तके नियमित मिळत राहिली तर त्यांचे मराठी साहित्याचे आकलन अद्ययावत राहू शकेल. तेथील भारतीय



अनुक्रमणिका

राजदूतांच्या कार्यालयातही मराठी पुस्तकांचे ग्रंथालय आहे. महाराष्ट्रातील सेवाभावी संस्थांनी पुढाकार घेऊन नवीन पुस्तके तेथे जात राहतील यासाठी योजनाबद्ध आखणी करावी. मराठी भाषक लोक वास्तव्याला आहेत त्या सर्वच देशांवावत आपण आस्था दाखवून, मराठी पुस्तके तेथील उत्साही वाचकांना उपलब्ध होत राहतील अशी व्यवस्था करणे इष्ट ठरेल. महाराष्ट्र शासनानेही यासाठी काही आर्थिक तरतूद करण्याची गरज आहे. जागतिक मराठी परिषदेच्या निमित्ताने तेथे मराठी ग्रंथजत्रा भरवण्यात येणार आहे. आपल्या प्रकाशकांनी जर योजकता दाखवली तर प्रदर्शनातील ग्रंथविक्रीवरोबरच भावी ग्राहकवर्ग जोडण्याची ही एक अमूल्य संधी ठरेल.

## अहमदनगर - संमेलनाची तयारी सुरू

सत्तरावे अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलन हे अहमदनगर येथे भरविण्याचे आमंत्रण स्वीकारल्याचे अ. भा. मराठी साहित्य महामंडळाने आळंदी संमेलनातच जाहीर केले. त्यामुळे नगरच्या कार्यकर्त्यांना संमेलनाची सुव्यवस्थित आखणी करण्यासाठी भरपूर वेळ मिळाला आहे. दि. १६ जून रोजी जिल्ह्यातील साहित्यिक व रसिक यांची बैठक घेण्यात आली; त्यावेळी साहित्य परिषदेचे कार्याध्यक्ष डॉ. गं. ना. जोगळेकर व अन्य पदाधिकारी व कार्यकारिणी सदस्यही उपस्थित होते. संमेलनाचे स्वागताध्यक्ष यशवंतराव गडाख यांनी हे संमेलन म्हणजे साहित्यातील सर्व प्रवाहांचा सुरेख संगम घडविणारा संस्मरणीय आनंद सोहळा व्हावा, अशा प्रकारे त्याचे आयोजन करण्याचा मनोदय व्यक्त केला. निधिसंकलनासाठी तालुकावार बैठका घेण्याचेही त्यांनी ठरवले आहे. जिल्ह्यातील सर्व लेखककवींना सामावून घेण्याचा त्यांचा प्रयत्न आहे. साहित्य संमेलनाच्या कामकाज पुस्तिकेचेही यावेळी डॉ. गं. ना. जोगळेकर यांच्या हस्ते प्रकाशन झाले. डॉ. सु. प्र. कुलकर्णी यांनी प्रास्ताविक केले. नामदेवराव देसाई यांनी सूत्रसंचालन केले. सौ. सुमती लांडे यांनी आभार मानले. कार्यकर्त्यांचे मोठे पाठबळ असल्याने मा. यशवंतराव गडाख यांच्या नेतृत्वाखाली या संमेलनाचे एकूणच आयोजन नेटके होईल असा विश्वास वाटतो.

## कुमुदिनी रांगणेकर

२५ मार्च १९९६ रोजी मराठीतील एक लोकप्रिय लेखिका कुमुदिनी प्रभावळकर - रांगणेकर यांनी ९१ व्या वर्षात पदार्पण केले. इंग्रजीतील गुलाबी प्रेमकथांचे स्वैर भाषांतर करण्यात त्यांचा झपाटा होता. दोनशेवर कादंबऱ्यांचे अनुवाद त्यांच्या नावावर आहेत. शिवाय शंभर स्वतंत्र कादंबऱ्याही त्यांनी लिहिल्या. सर रामकृष्ण भांडारकर हे त्यांचे पणजोबा. त्यांचे वडील शंकरराव प्रभावळकर हे सिव्हिल इंजिनियर. एकुलता एक धाकटा भाऊ माधव याचे अल्पवयातच कर्करोगाने निधन झाले. 'बंधुविरहाचं दुःख विसरायला' लेखणीचा आधार त्यांनी घेतला. १९३४ साली 'अनियमित जग' ही त्यांची पहिली कादंबरी छापली गेली. तिचे स्वागत चांगले झाले. त्यामुळे लेखन चालू राहिले. लोकमान्य कन्याशाळेच्या मुख्याध्यापिका म्हणूनही त्यांनी काम केले. १९४१ मध्ये ॲड. गोविंदराव रांगणेकर यांच्याशी विवाह झाला. अजूनही त्यांचे लेखन चालू आहे.

नव्वदीच्या घरगुती समारंभाच्या वेळी त्यांच्या काही कादंबऱ्यांचे पुनर्मुद्रण पुण्याच्या पुष्प प्रकाशनने केले. कुमुदिनीबाईंना म. सा. परिषदेच्या वतीने शुभेच्छा.

## 'रोहिणी'चा सुवर्ण महोत्सव

रोहिणी मासिकाने जून १९९६ मध्ये पन्नासाव्या वर्षात पदार्पण केले. १९४७ साली ते सुरू झाले. प्रा. श्री. म. माटे हे आद्य संपादक होते. कार्यकारी संपादक भा. द. खेर आणि संचालक वसंत काणे. आरंभी सर्वसामान्य मासिकांप्रमाणेच त्याचे स्वरूप होते. परंतु १९६० पासून त्यात विवाहेच्छू स्थळांची माहिती देण्यात येऊ लागली; आणि त्यामुळे रोहिणीला स्वतःचे व्यक्तिमत्त्व लाभले. १९७० पासून या कार्याला पालकांकडून प्रतिसाद उत्स्फूर्तपणे मिळू लागला. गेल्या तीस वर्षात रोहिणीने सुमारे २५ हजार विवाह जुळवले. त्यापैकी पाच हजार आंतरजातीय आहेत. संपादक वसंत काणे यांनी या मासिकाबरोबरच दैनिक संध्या हे सायंदैनिकही चालवले आहे. पत्रकार परिषदेचे कामही ते करतात. रोहिणीच्या सुवर्ण महोत्सवानिमित्त त्यांचे अभिनंदन.

## धर्मभास्कर : रौप्यमहोत्सव

धर्मभास्कर या मासिकाने मे १९९६ मध्ये पंचवीस वर्षे पूर्ण केली. मराठीत अनेक मासिके अल्पायुषी ठरतात; आणि दीर्घकाळ चाललेली काही मासिकेही साप्ताहिकाच्या स्पर्धेपुढे निष्प्रभ ठरत आहेत. अशा परिस्थितीत 'धर्मभास्कर'ने एका विशिष्ट विचारसरणीचा पुरस्कार करीत असतानाही मराठीतील नामवंत साहित्यिकांचे लेखन मिळवून वैचारिक लेखनाबरोबर साहित्यिकांच्या मुलाखती, कादंबऱ्या, विज्ञानकथा, बालसाहित्य, परीक्षणे इ. ललित साहित्यही देण्याचा परिपाठ ठेवला. कथास्पर्धा घेतल्या. राम गणेश गडकरी, ज्ञानेश्वरी सप्तशताब्दी यासारखे विशेषांक काढले. संपादक अवधूत शास्त्री यांचे या रौप्यमहोत्सवी वाटचालीबद्दल अभिनंदन.

## चुकांची दुरुस्ती

एप्रिल - जून ९६ च्या पत्रिकेच्या अंकात अनवधानाने काही चुका राहून गेल्या. कृपया त्याबद्दल क्षमा करावी.

पृष्ठ १७ वर परिषदेच्या कार्यवाहांची यादी देण्यात आली आहे. त्यात दिवंगत व्यक्तींच्या नावामागे टिंब देण्यात आलेले आहे. परिषदेचे एक माजी कार्यवाह श्री. वा. रं. सुंठणकर यांच्या नावामागे टिंब चुकून पडले आहे. त्याबद्दल आम्ही दिलगीर आहो. श्री. सुंठणकर ह्यांचे लेखनवाचन उत्साहाने चालू आहे. नुकताच त्यांचा महाराष्ट्राच्या इतिहासावरचा 'महाराष्ट्र १८५८ - १९२०' हा इंग्रजी ग्रंथ प्रसिद्ध झाला आहे. त्यांना दीर्घायुष्य लाभावे अशी ईश्वरचरणी प्रार्थना.

पृष्ठ १५ वर परिषदेच्या कार्याध्यक्षांच्या यादीत डॉ. म. वि. गोखले (इ. स. १९९२-९५) ह्यांचे नाव नजरचुकीने छापण्याचे राहिले आहे.

पृष्ठ १०४ वर शं. वा. किर्लोस्कर स्मृतिपारितोषिकाची रक्कम रु. १०० अशी हवी. त्याचबरोबर दिवाळी अंकातील उत्कृष्ट ललित लेखाला २०० रु. चा अनंत काणेकर पुरस्कार देण्यात येतो. त्याचा उल्लेखही हवा होता.

पृष्ठ १०५ वर ग्रंथपारितोषिकांच्या यादीत संदर्भ व कोश वाङ्मयासाठी श्री. शा. हणमंते पुरस्कार (रु. ३५०/-) याचाही समावेश करायला हवा.

जानेवारी - मार्च १९९६ अंकातील काकासाहेब गाडगीळ यांच्यावरील लेखामधील 'कोलफील्ड एक्स्प्रेसला नव्या रेल्वेमंत्र्यांनी ब्लॅक डायमंड हे नाव दिले' हा तपशील बरोबर नसून या दोन वेगवेगळ्या गाड्या आहेत असे सौ. वीणा विजापूरकर (पुणे ३०) यांनी कळवले आहे. कोलफील्ड १९५५-५६ च्या सुमारास तर ब्लॅक डायमंड १९६५-६६ च्या सुमारास सुरू झाल्याची माहितीही त्यांनी दिली आहे. या माहितीबद्दल त्यांना धन्यवाद.

## श्रद्धांजली

### रंगा वैद्य

सोलापूरच्या दैनिक संचारचे संपादक व महाराष्ट्रातील एक सव्यसाची पत्रकार रंगनाथ माधव उर्फ रंगा वैद्य यांचे दि. १ जून १९९६ रोजी वयाच्या ७४ व्या वर्षी निधन झाले. १९४९ मध्ये त्यांनी पत्रकारितेला आरंभ केला. १९६१ मध्ये दैनिक संचार त्यांनी मित्रांच्या मदतीने सुरू केले. तेव्हापासून ते अखेरपर्यंत दैनिक संचारच्या संपादकपदाची धुरा वाहत होते. भूदान यज्ञात त्यांनी स्वतःची ११ एकर जमीन विनोबाजींना दिली. आगरकर पुरस्कार, पुढारीकार जाधव पुरस्कार, समतानंद गद्रे पुरस्कार वगैरे सन्मान त्यांना लाभले. घशाच्या कर्करोगामुळे सहा वर्षांपूर्वी त्यांचे स्वरयंत्र काढून टाकण्यात आले होते. तरीही अखेरपर्यंत त्यांचे वृत्तपत्रीय लेखन चालू होते. त्यांच्या स्मृतीला आमचे अभिवादन.

### बाबा दळवी

औरंगाबादच्या दै. लोकमतचे माजी कार्यकारी संपादक म. य. उर्फ बाबा दळवी यांचे एप्रिल महिन्यात दुःखद निधन झाले. मुंबईच्या विविध वृत्तपत्रांत काम करून दळवी मराठवाड्यात गेले. 'लोकमत'ची धुरा त्यांनी सांभाळली व त्या दैनिकाला मराठवाड्यात अग्रस्थान मिळवून दिले. समाजवादी विचारसरणीचे असूनही सर्व पक्षांच्या कार्यकर्त्यांशी त्यांचे जिव्हाळ्याचे संबंध होते आणि आपला वृत्तपत्रातही सर्व मतांना त्यांनी मुक्तपणे स्थान दिले. म्हणूनच जनतेने त्यांच्या अमृतमहोत्सवानिमित्त एक लक्षाची थैली देऊन त्यांचा सत्कार केला. मराठवाडा समग्र विकास ट्रस्ट स्थापन करून ग्रामीण नेतृत्व विकास केंद्रातर्फे त्यांनी ग्रामीण विकास व तंत्र शिक्षण प्रसाराचे कार्य हाती घेतले होते. १९४५ साली ते जंजिरा संस्थानात शिक्षक होते. जंजिरा संस्थान भारतात विलीन व्हावे म्हणून नाना पुरोहित, मोहन धारिया यांनी सशस्त्र मुक्तिसेना उभारून संस्थानाच्या विलीनीकरणाला गती दिली. त्यात बाबांचाही सहभाग होता. एक क्रियाशील विचारवंत म्हणून त्यांनी ठसा उमटवला. त्यांचे पुत्र अजित व प्रदीप हे दोघेही नाटककार म्हणून आपला ठसा उमटवण्यात यशस्वी झाले असून, एका परीने बाबांचा वारसा पुढे नेत आहेत. बाबा दळवी यांच्या स्मृतीला आदरांजली.

## नवीन आजीव सभासद

**पुणे**

सौ. प्रतिभा ज्ञानेश्वर आडकर, रवींद्रनाथ सुरेंद्रनाथ दुर्वे, सौ. अलका प्रभाकर दांडेकर
गंधाली चिंतामणी जोशी, चिंतामणी सुरेंद्र जोशी, सौ. उज्वला किसन पाटील
किसन श्रीधरपंत पाटील, शरद वंडोपंत कुलकर्णी, स्वप्नल अजित भाटे
डॉ. म. कृ. नाईक, प्रा. मोहन गोविंद धडफळे, सोनाली गोपाळ भाटवडेकर
भानुदास घनःश्याम काळे, डॉ. भालचंद्र विद्यासागर पंडीत, श्याम यशवंत तानवडे
प्ररितोष अनिल भाटवडेकर, उन्मेष नामदेव जोशी, रघुनाथ गोविंद बापट
माधव सखाराम राजगुरू, किशन रामभाऊ किरवले, अजय उर्फ आदिनाथ रंभाजी चांदणे
मोहनराव संभाजी वाघमारे, प्रकाश वसंत पाठक, रमेश लक्ष्मण शाळीग्राम
गणेश त्र्यंवक भिडे, अभिजित वसंत घोरपडे

**सोनई**

राजाराम चिमाजी कुसळकर, शंकरराव यशवंतराव गडाख पाटील, शेंगुळे हरिश्चंद्र कडुवाल
प्रा. शरद रंगनाथ दरदले

किशोर गजानन घनवटे (नाऊर), मच्छिंद्र गोविंद वर्पे (चिकणी) श्रीमती प्रा. आरस्तोल हिंमतराव सावले (राहुरी), अमानुल्ला महंमद शेख, (सलावतपूर), संदीप प्रभाकर खेडकर (जोहरापूर), संभाजी सोपानराव दराडे (वंजारवाडी); प्रा. सौ. सुनीता चारुदत्त लेंगडे (सांगली), अनुराधा म. फाटक (सांगली), ज्ञानेश्वर रामचंद्र मुळे (माहिम, मुंबई), अरविंद शंकर नाडकर्णी (सोलापूर), अरविंद रामचंद्र भुजवळ (वाणेर), प्रभाकर यशवंत नाडगौंडा (सोलापूर) डॉ. दत्तात्रय पुंडलिकराव पाटील (नांदेड)

**अहमदनगर**

अर्जुनसावळेराम साळवे, ब्रिजलाल झुंवरलाल सारडा, प्रा. नारायण बाबुराव मिसाळ
वंटीसेठ मनीसिंग धुप्पड, गोविंदराव वामनराव आदिक, प्रा. मीना चंद्रकांत कोहोक
प्रा. सुभाष निवृत्ती रोकडे

**पाथर्डी**

पांडुरंग आबाजी खेडकर, किरण केशवराव शेळके, बाळासाहेब सितारामजी चिंतामणी
सुभाषराव मारुतराव बुधवंत, आप्पासाहेब दादावा राजळे, प्रा. गीता उपेंद्र घैसास
प्रदीप मुरलीधर वारुळकर, रामनाथ भगवान खेडकर, श्रीमती मंदाकिनी कान्हू सरकाळे
श्रीमती उज्वला प्रकाश जाधव, पांडुरंग नारायण जावळे, दीपक सोन्याबापू पावसे
उद्धवराव रघुनाथ वाघ, सुलेमान कासीम तांबोळी, (वेगमपूर)

**लासलगांव**

अपर्णा रमेश कुलकर्णी, दत्तात्रय काशिनाथ टाकरे, सौ. विजयश्री चंद्रशेखर भावसार
सौ. वर्षा विजय आगाशे, (श्रीरामपूर)

**डोंबिवली**

सौ. शिला सोहनलाल राठोड, अ. वा. सराफ, दत्तात्रय शंकर रानडे
प्रभाकर वासुदेव भिडे, श्रीधर चिंतामणी काणे, लक्ष्मी गोपाळ देव
संजय विष्णू कुलकर्णी, सौ. माणिक मनोहर राजे, राम गोविंद मुंगी

**धुळे**

मोहन मोरे, डॉ. मृदुला वर्मा, सुधाकर भालचंद्र जोशी

## साभार स्वीकार

- ❖ हस्तकला हस्तव्यवसाय छंद : अ. दि. कोकड, सत पब्लिकेशन, पुणे. चारशे पंचाहत्तर रुपये.
- ❖ नवभारताचे शिल्पकार पंडित नेहरू : डॉ. स. रा. गाडगीळ, शलाका प्रकाशन, मुंबई. पृष्ठे ४१३. दोनशे रुपये.
- ❖ चंद्राचे दिवस सूर्याच्या रात्री : डॉ. किसन आटोळे, मुद्रा प्रकाशन, पुणे. पृष्ठे ९६, चाळीस रुपये.
- ❖ वसंत फुलला मनी : सुभाष पवार, साहित्य कलायात्री प्रकाशन, पुणे. पृष्ठे ७९, वीस रुपये.
- ❖ जाव : कमल कदम, शब्ददान प्रकाशन, नांदेड, पृष्ठे ७२, पंचेचाळीस रुपये.
- ❖ चुंवळ : प्रा. श. रा. राणे, रत्नदीप प्रकाशन, फैजपूर. पृष्ठे ५०, चाळीस रुपये.
- ❖ घर आणि दोन एकांकिका : श. रा. राणे, रत्नदीप प्रकाशन, फैजपूर. पृष्ठे ४३, चाळीस रुपये.
- ❖ आगरकर - टिळक व समाज सुधारणा : पी. डी. दिघे, (१९९३) लोकवाङ्मय गृह प्रकाशन, मुंबई. पृष्ठे ६०, वारा रुपये.
- ❖ दोन कर्मवीर : कॉ. पी. डी. दिघे, लोकवाङ्मय गृहप्रकाशन, मुंबई. पृष्ठे ६२, दहा रुपये.
- ❖ महाराष्ट्रातील सामाजिक सांस्कृतिक चळवळ : पी. डी. दिघे (१९९५) अक्षर प्रकाशन, मुंबई, पृष्ठे ८५, तीस रुपये.

**जयदत्त प्रकाशन, कोल्हापूर.**

- ❖ साहित्य सहकार : वाजीराव पाटील, पृष्ठे १६८, एकशे पस्तीस रुपये.
- ❖ वृत्तविद्या मूलतत्त्वे : संपा. प्रताप पाटील , पृष्ठे ८५, पन्नास रुपये.
- ❖ जनसंपर्क साधने : एक अभ्यास : डॉ. प्रताप पाटील, पृष्ठे ५८, चाळीस रुपये.
- ❖ ग्रामग्रंथालये : बाजीराव पाटील, पृष्ठे ३८, पस्तीस रुपये.
- ❖ सहकारी साखर उद्योगाची चार दशके : राजेंद्र दर्डा, पृष्ठे २१९, दीडशे रुपये.

**तंजावर महाराजा शरफोजी सरस्वती महाल ग्रंथालय, तंजावर.**

- ❖ कुलालचरित्र : टी. आर. भीमराव, पृष्ठे ३९, तेरा रुपये.
- ❖ राजकन्यापरिणय नाटक : टी. आर. भीमराव, पृष्ठे ५१, पाच रुपये.
- ❖ रामायण वालकांड : टी. आर. भीमराव, पृष्ठे १४०, पन्नास रुपये.
- ❖ गोंधळाचे साहित्य : टी. आर. भीमराव, पृष्ठे ७१, अठरा रुपये.
- ❖ गंगाजमनी : राघवेंद्र पगडी, प्रपंच प्रकाशन, पुणे. पृष्ठे १००, पन्नास रुपये.
- ❖ वासनातल्या कविता : वि. भा. नेमाडे, तेजस प्रकाशन जळगाव, पृष्ठे ६३, पंचवीस रुपये.
- ❖ माझा प्रवास : गोडसे भटजी, मच्छिंद्र मालुंजकर, स्फूर्ती प्रकाशन नगर. पृष्ठे ९३, पासष्ठ रुपये.
- ❖ प्रीती मिळेल का हो : मुरलीधर जावडेकर, मु. म. जावडेकर प्रकाशन, पुणे. पृष्ठे ६४, सहा रुपये.
- ❖ मराठी निबंधदीप : सौ. मनीषा वर्वे, उत्कर्ष प्रकाशन, पुणे. पृष्ठे ९४, पंचवीस रुपये.
- ❖ फुलांच्या वाळवंटात : एकनाथ पवार, सुविचार प्रकाशन मंडळ, नागपूर. पृष्ठे ७८, (प्रथमावृत्ती ६६) वत्तीस रुपये.
- ❖ तुझ्या कविता : मिलिंद जोगळेकर, स्वान कम्युनिकेशन, पुणे. पृष्ठे ९६, वीस रुपये.
- ❖ कधी कधी : मनोहर जाधव, नवीन उद्योग प्रकाशन, पुणे. पृष्ठे ६४, चाळीस रुपये.

**साकेत प्रकाशन, औरंगाबाद.**

- ❖ धर्माची गोष्ट : वावा भांड, पृष्ठे ६८, पंचवीस रुपये.
- ❖ अमाणूस : डॉ. अरुण मांडे, पृष्ठे १६८, पासष्ठ रुपये.
- ❖ धर्माची गोष्ट : बाबा भांड, पृष्ठे ६८, पंचवीस रुपये.

# 'एकच प्याला' चे टीकाकार व प्रा. श्री. के. क्षीरसागर

डॉ. विनायक गंधे

गडकऱ्यांचे 'एकच प्याला' हे केवळ मराठी नाट्यसृष्टीचेच नव्हे तर मराठी जीवनाचे आणि संस्कृतीचे दर्शन घडविणारे प्रातिनिधिक नाटक आहे. मराठी भाषेचे ते भूषण ठरले आहे. 'एकच प्याला' च्या निर्मितीला पंचाहत्तर वर्षे होऊन गेली. प्रा. श्री. के. क्षीरसागर यांनी केलेल्या 'एकच प्याला' च्या दीर्घ अभ्यासपूर्ण समीक्षेला पन्नास वर्षे झाली. प्रा. क्षीरसागरांच्या रूपाने एक 'समानधर्मा' समीक्षक 'एकच प्याला' ला लाभला.

प्रा. क्षीरसागरांनी 'एकच प्याला' च्या सातव्या आवृत्तीला 'टीकात्मक विवेचन' या नावाने एकोणसत्तर पानांची दीर्घ प्रस्तावना लिहिली. या प्रस्तावनेची मौलिकता आज पन्नास वर्षांनंतरही जाणवते. या प्रस्तावनेचे 'एकच प्याला' च्या एकूण समीक्षा व्यवहारातील स्थान पाहणे हा प्रस्तुत लेखाचा उद्देश आहे.

'एकच प्याला' हे मराठी रंगभूमीवरील, विशेषतः संगीत रंगभूमीवरील विलक्षण लोकप्रिय नाटक. ते जेवढे लोकप्रिय तेवढेच वादग्रस्तही ठरले. १९१९ साली रंगभूमीवर आल्यापासून या नाटकाची चर्चा सुरू झाली ती आजतागायतही सुरू आहे. गेली सत्तर पंच्याहत्तर वर्षे 'एकच प्याला' चा विचार-विमर्श सुरू आहे. 'एकच प्याला' बद्दल आजवर जेवढा विचार झाला असेल तेवढा अन्य मराठी नाटकाबद्दल क्वचितच झाला असेल. या नाट्याच्या विचारविमर्शात सामान्य रसिकांपासून विचक्षण समीक्षकांपर्यंत सर्वांचा सहभाग आहे. या नाटकाची समीक्षा भिन्न प्रवृत्तीच्या आणि भिन्न अभिरुचीच्या विचारवंतांनी केली आहे. फडके, खांडेकर, अत्रे, क्षीरसागर, बाळिंबे, गाडगीळ, सरदेशमुख, म. वा. धोंड ही 'एकच प्याला' च्या समीक्षकांची काही नावे पाहिली तरी त्यातील वैविध्य लक्षात येईल. 'एकच प्याला' च्या समीक्षेत केवळ विविधता नाही तर कमालीची मतभिन्नता आहे. 'एकच प्याला' च्या समीक्षेतील परस्परविरोधी चित्रे अन्य साहित्यकृतींच्या समीक्षेत सहसा आढळणार नाहीत. या नाटकावरील उलट-सुलट, अनुकूल, प्रतिकूल आणि परस्परविरुद्ध टीकाची समीक्षा पाहिली की अनेक अभ्यासकांना या नाटकाने चकविले आहे, हे लक्षात येते.

मोल्टनच्या विचारांवर चिंतन करताना गडकऱ्यांनी लिहून ठेवले आहे की, 'रोमँटिक नाटकाची प्रवृत्ती सर्व प्लॉट समग्र मांडण्याकडे असते'. गडकऱ्यांनी 'एकच प्याला' चा प्लॉट या सूत्रानुसार समग्रतेने मांडलेला आहे. त्यामुळे हे नाटक विविध दृष्टिकोन व्यक्त करणारे ठरले.

बहुकेंद्री आणि व्यामिश्र स्वरूपाच्या 'एकच प्याला' च्या समीक्षेचा समग्र आलेख पाहिल्यास

त्यातून मराठी मनाच्या वृत्ति प्रवृत्तींचे दर्शन घडते. त्याचबरोबर मराठी मनाच्या बदलत्या अभिरुचीचे दर्शन घडते. या नाटकाच्या समीक्षेतून जे विचारमंथन झाले त्यातून केवळ मराठी नाट्यसमीक्षेचा आलेख उभा राहतो असे नव्हे. तर त्यातून आपल्या सामाजिक आणि सांस्कृतिक धारणाही प्रकट होतात. त्यातून संस्कृतीतील विचारधारा आणि मूल्ये यांचे मंथन होते.

'एकच प्याला' निर्मितीनंतर पंचवीस वर्षांनी लिहिलेली प्रस्तुत नाटकाची प्रा. श्री. के. क्षीरसागरकृत समीक्षा 'एकच प्याला' च्या सर्वांगीण अभ्यासाला प्रेरक ठरली. या समीक्षेने 'एकच प्याला' च्या अभ्यासाच्या अनेक शक्यता दाखविल्या. प्रा. क्षीरसागरांनी केलेली 'एकच प्याला'ची समीक्षा अनेक मार्गांनी कार्यरत झाली.

वास्तविक प्रा. क्षीरसागरांनी 'एकच प्याला'च्या सातव्या आवृत्तीला प्रस्तावना लिहिली. परंतु या प्रस्तावनेची व्यापक बैठक व त्यातील मूलगामी चिंतन पाहता या समीक्षेला ग्रंथाचे मोल प्राप्त झाले.

**१९४५ पूर्व काळातील 'एकच प्याला'ची समीक्षा**

'एकच प्याला' चा प्रारंभकालीन विचार समीक्षेच्या पातळीवरचा नाही. तो बराचसा प्रतिक्रियात्मक स्वरूपाचा आहे. नाटक रंगभूमीवर येण्याआधीच गडकऱ्यांचे दुर्दैवी निधन झाले. त्यामुळे या प्रतिक्रियांना काही प्रमाणात गडकरी प्रेमाची पार्श्वभूमी होती. शिवाय असे भीषण दारुण नाट्य रंगभूमीवर प्रथमच अवतरले होते. बालगंधर्वांसारख्या नटाने सिंधूची व्यक्तिरेखा विलक्षण लोकप्रिय केली होती. नवयुग, चित्रमयजगत्, उद्यान, मनोरंजन इ. नियतकालिकांत 'एकच प्याला'वर प्रतिक्रियात्मक लेख प्रसिद्ध झाले. अनुकूल-प्रतिकूल प्रतिक्रिया असे त्यांचे स्वरूप आहे.

१९२४ साली जोशी-साठे यांचे 'महाराष्ट्रीय नाटककार गडकरी' हे छोटेखानी पुस्तक प्रसिद्ध झाले आणि ग्रंथरूपाने गडकऱ्यांच्या नाटकांचा परामर्श सुरू झाला. प्रा. ना. सी. फडके, वि. स. खांडेकर, शि. गो. भावे, शं. ना. सहस्रबुद्धे हे प्रा. क्षीरसागरांच्या आधीचे महत्त्वाचे गडकरी- समीक्षक. फडके, खांडेकर हे तर त्या काळातील महत्त्वाचे लोकप्रिय होऊ पाहणारे ललितलेखक! गडकऱ्यांच्या लोकप्रियतेचे रहस्य शोधण्याच्या भूमिकेनेच ते 'एकच प्याला'च्या विचाराकडे वळलेले दिसतात. 'नाट्यस्वरूप गडकरी' हा ग्रंथ लिहिणाऱ्या शं. ना. सहस्रबुद्धे यांची प्रेरणा म्हणजे वि. स. खांडेकरांचा 'गडकरी : व्यक्ती व वाङ्मय' हा ग्रंथ होय. खांडेकर आणि फडके यांच्या जीवनवादाचा व कलावादाचा त्यांच्या समीक्षेतून येणारा प्रत्यय अत्यंत गुळगुळीत स्वरूपाचा आहे. नाटक या वाङ्मयप्रकाराच्या पृथगात्मतेचे त्यांचे आकलन फारसे खोल नाही. खांडेकर फडके या दोघांनीही श्रीपाद कृष्ण कोल्हटकरांच्या नाटकाचे विशेष लक्षात घेऊन त्याआधारे गडकऱ्यांच्या नाटकाची पाहणी केली. खांडेकरांनी नाटकाच्या तंत्राला, रचनेला अधिक महत्त्व दिले. फडक्यांनी कलाकृतीत काय सांगितले यापेक्षा कसे सांगितले हा प्रश्न महत्त्वाचा मानला. या दोघांनी विविध नाट्यांगांचा एकत्रित विचार न करता स्वतंत्रपणे केला. खांडेकरांनी पात्रांचा कथानकाच्या संदर्भात एक आणि स्वतंत्रपणे व्यक्तिदर्शन म्हणून एक असा वेगवेगळा विचार केला. सिंधूचे स्वभावरेखन साधुतुल्य असले तरी मानवी मनाचे चित्र या दृष्टीने खांडेकरांना ते सदोष वाटते. फडके-खांडेकर या दोघांनीही दारूचे दुष्परिणाम हा 'एकच प्याला'चा मुख्य विषय मानून एक बोधवादी नाटक म्हणून 'एकच प्याला'ची पाहणी केली.

दुःखपर्यवसायी नाटक म्हणून विचार करताना एक शोकांतिका म्हणून या नाटकाची मीमांसा त्यांना करावीशी वाटली नाही . गडकऱ्यांनी शोकरसाचे हत्यार वापरले ते प्रेक्षकांना स्तिमित करण्यासाठीच . ' ही गडकऱ्यांच्या लेखनगुणांची फडकेप्रणीत मीमांसा उथळ स्वरूपाची आहे . प्रसंगांचा अघटितपणा व स्वभाव वैशिष्ट्यांचे अतिरंजन या दोन गोष्टींमुळे गडकऱ्यांना यश मिळाले असा ना . सी . फडके यांचा निष्कर्ष आहे . '' नाटककार या नात्याने गडकरी सर्वात निकृष्ट होते ; पण भाषेची उपासना आणि तपश्चर्या करणारे प्रतिभासंपन्न लेखक म्हणून मात्र ते (देवल , किर्लोस्कर , खाडिलकर ,कोल्हटकर) या चौघात श्रेष्ठ ठरतील . ''[९] असाही फडके यांचा निष्कर्ष आहे . पुढील काळात या नाटकाकडे खांडेकरांनी व्यापक भूमिकेतून पाहिले असले तरी सुरुवातीला तरी त्यांनी तपशीलाला महत्त्व दिले . फडके आणि खांडेकर या दोघांनीही प्रस्तुत नाटकावर घेतलेले आक्षेप आणि शंका पाहिल्या की लोकधर्मी आणि नाट्यधर्मी यातील भेद त्यांनी लक्षात घेतला नव्हता हे जाणवते . सुधाकरासारख्या शिकलेल्या तरुणाला त्या काळात पंधरा रुपये पगाराचीही नोकरी मिळू नये ? किंवा पश्चात्तापदग्ध सुधाकर नोकरी मिळविण्यासाठी नेमका वंडगार्डनवरच कसा येतो ? अशासारखे प्रश्न या दोघांनी उपस्थित केले .

नाट्यकृती निकोप मनाने पाहिली नाही की ग्रह-पूर्वग्रह कसे प्रबळ होतात आणि नाटककारावर आणि नाट्यकृतीवर ते कसे अन्यायकारक ठरतात , हे शं . ना . सहस्रबुद्धे यांच्या ' नाट्यस्वरूप गडकरी ' या ग्रंथातून जाणवते . प्रा . क्षीरसागरांच्या आधीच्या समीक्षकांनी ' एकच प्याला 'चे मांडलेले आकलन स्थूल स्वरूपाचे , विस्कळित आणि एकांगी आहे . तत्त्वापेक्षा तपशीलाला या लेखकांनी अधिक महत्त्व दिले . ' एकच प्याला 'ची समीक्षा करताना गडकरी चरित्रावर अनेकांनी अधिक भर दिला .

**प्रा. क्षीरसागरांची 'एकच प्याला'ची समीक्षा**

प्रा . क्षीरसागरांनी ' एकच प्याला 'मधील व्यामिश्र अनुभव ,आणि नाटककाराची वाङ्मयीन प्रकृती लक्षात घेऊन अपले आकलन विस्ताराने मांडले . गडकऱ्यांचा पुढील आदर्श , तत्कालीन नाट्यसंकेत यांचा विचार बाजूला ठेवून ' एकच प्याला 'मधील संकीर्ण अनुभव महत्त्वाचा मानला . एक कविप्रकृतीच्या नाटककाराने लिहिलेले नाटक या दृष्टीने त्यांनी नाटकाचे स्वरूप न्याहाळले . एक शोकांतिका म्हणून विशेषतः शेक्सपिरिअन शोकांतिका म्हणून ' एकच प्याला 'कडे पाहिल्यास या नाटकाचे ' स्वत्व ' सापडते असे त्यांना वाटले .

**'शोकांतिका' प्रकाराची मौलिक मीमांसा**

प्रा . क्षीरसागरांनी केलेल्या ' एकच प्याला 'च्या विवेचनाचा महत्त्वाचा विशेष म्हणजे त्यांनी मराठीत प्रथमच शोकांतिकेसंबंधी सखोल , गंभीर आणि विस्तृत चर्चा केली . क्षीरसागरपूर्व समीक्षकांनी शोकांतिका या प्रकाराचा एवढ्या गांभीर्याने आणि मूलगामी विचार केलेला नाही . मानवी मनोरचनेचे वैशिष्ट्य स्पष्ट करून ' सद्गुणी सज्जनांच्या वाट्याला दुःखे का येतात ? आणि अशा दुःखाच्या कथा आपण सुखी संसाराकडून अधिक आवडीने का ऐकतो ? या दोन प्रश्नांची उत्तरे देणे होय ' अशा शब्दात प्रा . क्षीरसागरांनी शोकांतिकेचे मर्म सांगितले . शोकांतिकेचा परिणाम , शोकांतिकेने होणाऱ्या आनंदाचे स्वरूप आणि भारतीय करुणरस मीमांसा , म्हणजे करुणरसातून होणाऱ्या आनंदाचे स्वरूप भिन्न आहे , हे प्रा . क्षीरसागरांनी दाखवून दिले .

**'एकच प्याला'चा अभिनव अन्वय**

'एकच प्याला'तील घटनांचे गतिसूत्र पाश्चात्य ट्रॅजेडीच्या दृष्टीने त्याकडे पाहिल्यानेच उलगडेल, असे म्हणून शेक्सपिअर प्रणित रोमॅंटिक ट्रॅजेडी या दृष्टीने प्रा. क्षीरसागरांनी 'एकच प्याला'चा अन्वय लावला. कथानकाचे आणि रसाचे वैचित्र्य आणि ॲरिस्टॉटलच्या कायद्यातून मुक्तता हे प्रा. क्षीरसागरांनी शेक्सपिअर प्रणीत रोमॅंटिक ट्रॅजेडीचे विशेष मानले आहेत. आणि असाधारण गुण, असाधारण चांगुलपणा आणि एखाद्या क्षम्य व दोषांबद्दल जबर शिक्षा हे शेक्सपिअरच्या ट्रॅजेडीचे सूत्र प्रा. क्षीरसागरांनी 'एकच प्याला'ला लावले आहे.

सुधाकरला त्यांनी 'रोमॅंटिक ट्रॅजेडी'चा नायक मानले. एका पाणीदार बुद्धिमान आणि सरळ अशा पुरुषाची शोककथा हा त्यांना 'एकच प्याला'चा प्रधान विषय वाटतो. भावनाप्रधान व मानी माणसाच्या वाट्याला येणारे एकलेपण (Romantic Isolation) त्यांना सुधाकराच्या व्यक्तिरेखेत दिसते. सुधाकर हा स्वतःविषयी आत्यंतिक अभिमान असलेला, दुसऱ्याविषयी आत्यंतिक अपेक्षा असलेला आणि कर्तव्यासंबंधीच्या आत्यंतिक कल्पना असलेला थोर पुरुष आहे व स्वतःच्या विशेषांमुळेच तो केविलवाणा होतो. अशी प्रा. क्षीरसागरांची मीमांसा आहे, पण शेक्सपिअरच्या नायकांचे विशेष सुधाकरला बहाल करून प्रा. क्षीरसागरांनी या व्यक्तिरेखेचे उदात्तीकरण केले आहे असे वाटते.

**सिंधू आणि इतर व्यक्तिरेखा**

सिंधूला प्रा. क्षीरसागर सुधाकरची छाया मानतात. ती सुधाकरच्या नशिबाशी बांधली गेली आहे. सिंधूच्या वर्तनाचा, त्या वर्तनाच्या योग्यायोग्यतेचा आपल्या आधीच्या विचारवंतांनी जो खल केला त्याला प्रा. क्षीरसागर बोधवादाची ट्रॅजेडी म्हणतात. त्यांना सिंधू केवळ पारंपरिक पातिव्रत्याची प्रतिमा वाटत नाही. सिंधूत येणारा अतिरेक हा पातिव्रत्याचा अतिरेक नसून स्त्रीत्वाचा अतिरेक आहे, असे त्यांना वाटते. सिंधूच्या वर्तनातील पातिव्रत्य कल्पना सार्वत्रिक आणि स्वाभाविक स्वरूपाची मानून भीषण नाट्यातील कोणताही नाश हा अतिरेकाचा व दोषाचाच परिणाम असतो. हा न्याय प्रा. क्षीरसागरांनी सिंधूला लावला आहे. त्यांच्या मते एकाच वस्तूवर वा व्यक्तीवर सर्व जीवन पणाला लावणे हा सिंधूचा दोष आहे. सुधाकराने जसा अतिरेक केला तसा सिंधूनेही चांगल्या वृत्तीचा म्हणजे भक्तीचा अतिरेक केला. कोणतीही अत्यासक्ती हा नियतीच्या विरुद्ध गुन्हा, त्याबद्दल निष्ठुर आणि अप्रमाण अशीच अद्दल घडणार, हे ट्रॅजेडीचे रहस्य गृहीत धरून प्रा. क्षीरसागरांनी बिचाऱ्या सिंधूलाही दोषी धरले आहे. शेक्सपिरियन शोकांतिकेच्या आधारे प्रा. क्षीरसागर 'एकच प्याला'ची मीमांसा करीत असल्यामुळे त्यांनी सिंधूलाही त्या चौकटीत बसविले असावे. पण अशी मीमांसा सिंधू या व्यक्तिरेखेच्या आकलनाला अपुरी पडते.

क्षीरसागरपूर्व समीक्षकांनी रामलालच्या शब्दपांडित्यावर आणि निष्क्रियतेवर झोड उठविली होती. 'रामलाल' या व्यक्तिरेखेला समजून घेण्याचा प्रयत्न प्रथम प्रा. क्षीरसागरांनीच केला असे म्हणावे लागेल. बाह्य सोवळेपणावर भर देणारा मनुष्य अखेर आत्मसंशोधनापर्यंत जाऊन कसा पोहोचतो हे गडकऱ्यांनी रामलालच्या चित्रणातून दाखविले आहे असे त्यांना वाटते. रामलाल हा उच्च जातीचा तत्त्वनिष्ठ आहे, मोहाचा पराभव आणि पतितांचा उद्धार याबाबतीत तो आत्मवंचनाकरून घेतो असे रामलालच्या भूमिकेचे रहस्यही प्रा. क्षीरसागरांनी मांडले आहे.

नाळिराम ' हा खलनायक नाही . तो निष्ठुर शून्यवाद व्यक्त करतो . तो अश्रद्ध आणि सिनिक आहे . ' नाळिराम 'च्या भाष्यातून गडकऱ्यांनी उदात्त पण निष्फळ ध्येयवादावर आणि भाविकतेवर सूड घेतला आहे असे प्रा . क्षीरसागर मानतात .

'एकच प्याला 'चे उपकथानक

' एकच प्याला 'च्या कथानकापेक्षा उपकथानकाची आजपर्यंत खूप चर्चा होत आली आहे . उपकथानकाची आवश्यकता , मुख्य कथानकाला त्याची मदत , त्यातील जीवनचित्रण इ गोष्टींबद्दल समीक्षकांनी मतभेद व्यक्त केले आहे . प्रा . क्षीरसागरांनी ' एकच प्याला ' हे बहुपेडी आणि वैविध्यपूर्ण अनुभव देणारे नाटक मानले असल्यामुळे त्यांना ' एकच प्याला 'चे उपकथानक उपरे वाटत नाही . उपकथानक नाटकात घालण्याचा तत्कालिन संकेत पाळून गडकरी जीवनाचा सर्वांगीण वेध घेण्यात तत्कालिन नाटककारांच्या पुढे गेले . असे त्यांना वाटते . प्रा . क्षीरसागरांचे हे निदान यथार्थ होय . समकालीन जीवनाचा सर्वांगीण वेध गडकऱ्यांच्या इतका अन्य कोणा लेखकाने घेतलेला दिसत नाही .

व्यामिश्र नाट्यविषय

एक व्यामिश्र बहुउद्देशीय शोकांतिका म्हणून विवेचन करताना प्रा . क्षीरसागरांनी ' एकच प्याला 'चे नाट्यविषयक तीन स्तर मानले आहेत .

१ ) बाजारी , निगरगट्ट आणि मट्ठ अशा जगात मानी आणि सरळ मनाचा होणारा कोंडमारा

२ ) अपमान आणि एकलेपणा सहन व्हावा म्हणून पत्करलेला तोडगा व त्यानुसार घेतलेला सूड .

३ ) महाराष्ट्रीय मध्यमवर्गाच्या विविध प्रतिनिधींचे संविधानकाच्या संदर्भात चित्रण

' एकच प्याला ' हे आधुनिक मध्यमवर्गीय महाराष्ट्राचे एक अंतर्भेदी व स्वयंपूर्ण चित्र आहे ; हा प्रस्तुत नाटकाचा महत्त्वाचा विशेष प्रा . क्षीरसागरांनी लक्षात आणून दिला . रामलालची अनेक भाष्ये या संदर्भात लक्षात घेण्यासारखी आहेत .

' एकच प्याला ' मधील गडकऱ्यांनी मांडलेले समकालीन जीवनाचे आकलन पाहिले की प्रा . क्षीरसागरांच्या विवेचनाची यथार्थता पटते . समकालीन जीवनाचे आणि परिस्थितीचे गडकऱ्यांना तीव्र भान होते . तरल संवादनशीलतेबरोबरच सहकंपनशीलताही गडकऱ्यांच्या ठायी होती . या सहकंपनशीलतेच्या बळावर त्यांनी सभोवारच्या जीवनाचा वेध घेतला . सभा व जीवनाचे , त्यातील अपूर्णतेचे , सामाजिक समस्यांचे गडकऱ्यांचे आकलन किती मार्मिक होते . हे त्यांच्या पात्रांच्या संभाषणावरून लक्षात येते . तत्कालीन प्रसिद्ध नाटककार खाडिलकर यांना एक स्पष्ट राजकीय भूमिका होती . तिचे प्रतिबिंब खाडिलकरांच्या नाटकात दिसते . गडकरी स्पष्ट अशी कोणतीच भूमिका घेत नाहीत . त्यांचा समन्वयवाद , नव्या जुन्यांचा मेळ घालण्याची वृत्ती रामलालच्या तोंडून अनेकदा व्यक्त होते .

' एकच प्याला ' या बहुकेंद्री , वैविध्यपूर्ण जीवनानुभव देणाऱ्या कलाकृतीचे सर्वांगीण आकलन मांडून या कलाकृतीचे मोठेपण प्रा . क्षीरसागरांनी मोठ्या मार्मिकतेने मांडले आहे . गडकरी आपल्या अल्पमतीप्रमाणे तत्कालीन संप्रदाय गिरवीत होते . पण सर्वशक्तिमान प्रतिभा ' नकळत त्यांचा हात धरून त्यांच्याकडून वेगळेच वळण गिरवून घेत होती .'

प्रा . क्षीरसागरांच्या प्रस्तावनेचा प्रभाव

' प्रा . क्षीरसागरांच्या या विवेचक प्रस्तावनेने दारूच्या दुष्परिणामावरील बोधवादी नाटक

हा समज मागे पडला आणि पुढे त्यावरील समीक्षा 'सुधाकर की एकच प्याला' अशी दोलायमान झाली. आणि उत्तरकाळात ती एकच प्याल्याला गौण स्थान देऊन सुधाकर आणि सिंधूच्या विश्लेषणात अधिक रमली. डॉ. रा. शं. वाळिंबे यांनी सुधाकर की एकच प्याला या आपल्या १९४६ च्या ग्रंथात हे दारूच्या दुष्परिणामाचे नाटक आहे असे ठाम प्रतिपादन केले. परन्तु कालांतराने १९५७ साली लिहिलेल्या 'नाटककार गडकरी' या ग्रंथात अनेक चांगल्या गुणांनी युक्त असलेल्या कर्तबगार मनुष्याचा त्याच्या आत्यंतिक मनोवृत्तीमुळे झालेला नाश हा 'एकच प्याल्या' चा प्रमुख विषय मानला.

वि. स. खांडेकर यांनी १९३२ मध्ये केलेले 'एकच प्याल्या'चे विवेचन, १९४९ मध्ये केलेला पुनर्विचार आणि १९६९ मध्ये त्यांनी केलेले प्रतिपादन यामध्ये फरक पडत गेला आहे. "एकच प्याल्या" कडे केवळ कलेच्या दृष्टीने पहा, हे नाटक मुद्दाम दारूवर लिहिले आहे असे मानण्याचे काही कारण नाही असे सांगितले तर दारूच्या तारेत असलेल्या मनुष्याला सुद्धा ते खरे वाटणार नाही." [१] असे ठामपणे म्हणणाऱ्या खांडेकरांना १९४९ मध्ये हे नाटक केवळ प्रचारकी स्वरूपाचे वाटत नाही. तर अधिक उंचावरचे वाटते. आणि १९६९ मध्ये त्यांना एकच प्याला हे केवळ दारूने घडविलेल्या सत्यानाशाचे कौटुंबिक चित्र वाटत नाही तर मानवी जीवनातील मंगल अमंगलच्या सनातन संघर्षाचे चित्र वाटते.

तत्कालीन नाट्यसृष्टीपेक्षा 'एकच प्याल्या'चे वेगळेपण प्रा. क्षीरसागरांनी मानवी मनाच्या चित्रणात वाटते. मानवी मनाचा कोंडमारा ही त्यांच्या मते महत्त्वाची गोष्ट. वृत्तीने पूर्णता कवी असलेल्या गडकऱ्यांनी नाट्यलेखनात यश मिळविले. हे गडकऱ्यांचे वैशिष्ट्य लक्षात घेऊन 'एकच प्याल्या' चा विचार केला की विषयासंबंधी वेगळा बोध होतो. हे प्रा. क्षीरसागरांचे प्रतिपादन 'एकच प्याल्या' वरील चर्चेला चालना देणारे ठरले. विषयाच्या वावटीत 'एकच प्याला' समीक्षेत पुढील प्रवाह आले.

१) दारूच्या दुष्परिणामाचे नाटक
२) सुधाकराची शोकांतिका आणि दारूचे दुष्परिणाम
३) सुधाकराच्या अधःपतनाची कथा
४) सिंधूच्या त्यागाची कथा

'एकच प्याला' च्या निमित्ताने मराठीत प्रथमच प्रा. क्षीरसागरांनी केलेले शोकांतिकेचे तात्त्विक विवेचन पुढील काळातील या नाटकाच्या समीक्षेला उपकारक ठरलेच' (असे मौलिक विवेचन नंतर प्रा. गो. वि. करंदीकरांनी आपल्या 'किंग लिअर' च्या भाषांतराच्या प्रस्तावनेत केले आहे.)'

रोमँटिक ट्रॅजेडीच्या नायकाचे जे विशेष प्रा. क्षीरसागरांनी सुधाकराच्या व्यक्तिरेखेत पाहिले ते पुढील काळातील समीक्षकांना मान्य झाले असे नाही. पण 'एकच प्याल्या' चा शोकांतिका म्हणून विचार अधिकाधिक झाला. विविध अंगांनी 'एकच प्याल्या'चे विश्लेषण झाले. त्यातून सुधाकराच्या मनातील सत् असत् संघर्ष, हिंदू शोकांतिका, सिंधूची शोकांतिका, महाराष्ट्रीय मध्यमवर्गीय जीवनाची शोकांतिका, अशिवाचा प्रश्न (Problem of Evil) गडकरीय ट्रॅजेडी इ. गोष्टींची चर्चा झाली. एक शोकांतिका म्हणून 'एकच प्याल्या'च्या दर्जाबद्दल समीक्षकांनी मतभिन्नता व्यक्त केली असली तरी मराठी समीक्षेत एकच प्याल्याची

आजवर जी चर्चा झाली तिचे प्रेरण प्रा . क्षीरसागरांच्या प्रस्तावनेमधील तात्त्विक विवेचनात आहे यात शंका नाही .

मानवी मन म्हणून सुधाकर सिंधू रामलाल व त्यातही सुधाकराच्या व्यक्तिरेखेचे विश्लेषण करण्याचे श्रेय प्रा . क्षीरसागरांच्याकडे जाते . रोमँटिक ट्रॅजेडीच्या नायकाचे गुण सुधाकरात आहेत की नाहीत याबद्दल मतभेद होतील पण भावनांचा कल्लोळ निर्माण करणारे व्यक्तिमत्त्व म्हणून सुधाकराची व्यक्तिरेखा विलोभनीय आहे .

गेली पंचाहत्तर वर्षे एकच प्याल्याची समीक्षा मराठी नाट्यसृष्टीत सुरूच आहे . विविध हेतूंनी आणि विचारांनी प्रेरित होऊन जीवनाचे एक सम्यक आकलन गडकऱ्यांनी ' एकच प्याल्या' मध्ये मांडले . पण त्या विविध हेतूंना पार करून नकळतपणे एक अवघड आदर्श गडकऱ्यांनी या नाट्यकृतीच्या रूपाने उभा केला . त्यामुळे हे नाटक समीक्षकांना आणि अभ्यासकांना आवाहन करीत आले . केवळ जन्मशताब्दी , किंवा नाटकाचे सुवर्णमहोत्सवी वर्ष अशा प्रसंगीच गडकऱ्यांच्या नाटकांवर लिहिले गेले असे नाही . गडकऱ्यांच्या नाटकांची समीक्षा वेळोवेळी अभ्यासकांकडून होतच राहिली . गडकऱ्यांची नाट्यसृष्टी आजही विचारप्रवृत्त करते . आपल्याला आकर्षित करते , असे तिचे अंगभूत सामर्थ्य आहे . गडकऱ्यांच्या नाट्यसृष्टीचे हे अंगभूत सामर्थ्य प्रथम प्रा . क्षीरसागरांनी दाखवून दिले हे निर्विवाद ! त्यांच्या प्रस्तावनेच्या व्यापक अधिष्ठानावर उत्तर काळातील समीक्षा उभी राहिली . ' एकच प्याला ' या काव्यात्म आणि बहुकेंद्री नाटकाचे अंतरंग प्रा . क्षीरसागरांनी उलगडून दाखविले आणि मराठीतील समीक्षा अनेक अंगांनी कार्यरत झाली . ' एकच प्याल्या ' तील संकीर्ण अनुभवाच्या निमित्ताने प्रा . क्षीरसागरांनी केवळ शोकांतिकेचेच नव्हे तर जीवनविषयक चिंतन प्रकट केले . जीवनातील दुःखानुभवावर प्रकाश टाकला . त्यामुळे डॉ . व . दि . कुलकर्णी आपल्या एका लेखात म्हणतात त्याप्रमाणे ' एकच प्याल्या' वरील टीका ही त्यांच्या टीकासृष्टीत तर सर्वश्रेष्ठ आहेच पण एकूण मराठी टीकासृष्टीत मानदंड ठरावी अशा महत्तेची आहे .

( डॉ . विनायक गंधे ७/बी साईकृपा सोसा , मार्कंडी , चिपळूण , जि . रत्नागिरी )

**संदर्भ आणि टीपा**


| | |
|---|---|
| १) ना . सी . फडके | किर्लोस्कर , देवल , गडकरी , मुंबई १९५९/ पृ . १६१ |
| २) श्री . के . क्षीरसागर | एकच प्याला - टीकात्मक विवेचन , एकच प्याला (आ . ८ वी ) जून ७१ पृष्ठ १५ |
| ३) वि . स . खांडेकर | गडकरी - व्यक्ती व वाङ्मय (दुआ) पुणे १९४९ पृ . २८२ |
| ४) डॉ . व . दि . कुलकर्णी | टीकाकार श्री . के . क्षी .महाराष्ट्र साहित्य पत्रिका , अंक २५७ एप्रिल - जून १९९१ |




# मृत्युंजय : एक नवे आकलन

डॉ. चंद्रकांत बांदिवडेकर

(श्री. शिवाजी सावंत यांना भारतीय ज्ञानपीठाचा मूर्तिदेवी पुरस्कार मिळाला. त्यानिमित्त 'मृत्युंजय' वरील हा लेख देत आहो. - संपादक)

'मृत्युंजय' कादंबरी प्रसिद्ध झाली तेव्हा शिवाजी सावंत हे केवळ सत्तावीस वर्षांचे होते. १९६८ ते ७२ या चार वर्षांच्या काळात 'मृत्युंजय' च्या चार आवृत्त्या निघाल्या आणि पंचवीस हजार प्रती विकल्या गेल्या. 'मृत्युंजय 'ला काही महत्त्वाचे पुरस्कारही मिळाले आहेत : महाराष्ट्र राज्यशासनाचा पुरस्कार (१९६७), केसरी संस्थेचा न. चिं. केळकर पुरस्कार (१९७२), ललित मासिक पुरस्कार (१९६७), पूनमचंद भुनोडिया पुरस्कार (बंगाल १९८५). भारतीय ज्ञानपीठाचा मूर्तिदेवी पुरस्कार (१९९५) इ. 'मृत्युंजय 'च्या हिन्दी अनुवादाच्या चौदा आवृत्त्या आजवर प्रकाशित झाल्या आहेत. १९८४ ते ८५ च्या दरम्यान मल्याळम, कन्नड, इंग्रजी या भाषांत 'मृत्युंजय' चे अनुवाद प्रसिद्ध झाले आहेत. १९९० साली गुजरातीत प्रसिद्ध झालेल्या अनुवादाच्या दोन आवृत्त्या निघाल्या असून त्या अनुवादाला गुजरात राज्य शासनाचे पारितापिक मिळाले आहे (अनुवादिका प्रा. प्रतिभा देव) - आता तेलगु, उडिया, राजस्थानी भाषांत 'मृत्युंजय 'चे अनुवाद होत आहेत. तिचा रशियन भाषेतही अनुवाद होण्याची शक्यता आहे. 'मृत्युंजय' कादंबरीवर आधारलेले नाटक पुण्याच्या कॉन्टिनेन्टल प्रकाशनने १९७५ साली प्रसिद्ध केले असून या नाटकाचे चंद्रलेखा या नाट्यसंस्थेतर्फे सातशे पन्नास प्रयोग झाले आहेत. शिवाय या नाटकाचे क्रमशः प्रसारण आकाशवाणीवरून करण्यात आले आहे. शिवाजी सावंतांनी विविध प्रकारची साहित्यनिर्मिती केली असली तरी सर्वाधिक लोकप्रियता 'मृत्युंजय' कादंबरीलाच मिळाली आहे.

कर्ण, संभाजी, श्रीकृष्ण अशा महान व्यक्तिमत्त्वांविषयी भक्तिभाव बाळगणाऱ्या सावंतांनी भारतीय संस्कृतीविषयी आत्मीयतेने लिहावे यात नवल नाही. वर्ण्य व्यक्तींमधील शौर्य, तेज, स्वाभिमान, अस्मिता, प्रामाणिकपणा, समर्पणशीलता, सत्यनिष्ठा, औदार्य, चैतन्यशीलत्व, स्वार्थत्याग इत्यादी गुणांचे त्यांना मनोमन आकर्षण आहे.

१९६० सालानंतर भारतीय साहित्याचा चेहरामोहराच बदलून गेला. अस्तित्ववाद, माणसाची एकाकी वृत्ती, पराकोटीची व्यक्तिकेन्द्रितता, मानवी जीवनातील क्षुद्रता, पराभूततेचे आकर्षण, त्या आकर्षणातील विकृत आनंद, जीवनातील आदर्श व श्रेष्ठ मूल्यांविषयी वाटणारी तुच्छतेची भावना, वास्तवतेच्या नावावर प्रवाहपतितत्व प्रकट करण्याची ओढ या प्रवृत्ती

जीवनात आणि साहित्यात वळावन चालल्या होत्या. या परिस्थितीत सावंतांचा लेखनप्रवास वेगळ्या दिशेने सुरू झाला होता. या प्रवासात कलावंताच्या आत्म्याला सहजपणे मिळणारा प्रतिसाद, मानवाची विजिगीषु वृत्ती आणि अस्मिता यांना महत्त्वाचे स्थान होते. स्वाभाविकपणेच समाजातल्या किरट्या आणि बीभत्स वास्तवाला झुगारून देऊन भारतीय मिथकांचा आश्रय घेणे आणि सामाजिक प्रक्रियेतील विघटनवादी प्रवृत्तींचा त्याग करून मानवी जीवनातील आत्मिक शक्तींचा पुरस्कार करणे सावंतांच्या प्रतिभाधर्माला आकर्षित करणारे, रुचणारे ठरले. बाह्य प्रलोभनांचा मोह टाळणे, शाश्वत आत्मिक शक्ती आणि उदात्त जीवनमूल्यांचा पुरस्कार करणे ही सावंतांच्या लेखनाची उद्दिष्टे ठरली. सनातन भारतीय संस्कृतीवर पोसलेल्या बहुसंख्य भारतीय माणसांना अशा उदात्त लेखनामुळे अपेक्षित असा दिलासा मिळाला. याच काळात नवतेच्या कल्पनेने भारावलेल्या काही निवडक उच्चभ्रूंना एखाद्या लेखकाने भारतीय संस्कृतीच्या प्राचीन संचितातील आदर्शांच्या दिशेने प्रवास करणे म्हणजे मागासलेपणाचे, तसेच भूतकाळाचा भाबडेपणाने वेध घेण्याचे कृत्य वाटले. पण विघटनवादी प्रवृत्तींच्या भोवऱ्यात गटांगळ्या खाणाऱ्या व्यक्तींना विजिगीषु वृत्ती आणि श्रेष्ठ जीवनमूल्यांचा पुरस्कार करणारे शिवाजी सावंतांचे साहित्य एखाद्या 'लाईफ बोटी' प्रमाणे वाटले असेल तर नवल नाही. असे असताना पाच वर्षात पंचवीस हजार प्रतींची विक्री झालेल्या 'मृत्युंजय'ची दखल घेऊन तिचा गौरव करणे समीक्षकांना कमीपणाचे का वाटले असावे? साहित्यातील नवतेच्या दबावाखाली वावरणाऱ्या, नवतेचा पुरस्कार करणाऱ्या विचारवंतांना आणि लेखकांना आपली माती आणि जीवनमूल्ये यातून प्रेरणा घेणारे शिवाजी सावंतांचे लेखन 'आपले' वाटले नाही, ही दुर्दैवी वस्तुस्थिती आहे. लोकप्रियता हे कोणत्याही साहित्यकृतीच्या श्रेष्ठतेचे गमक ठरत नसते, ही वस्तुस्थिती असली तरी लोकप्रिय कलाकृतींची उपेक्षा करणे योग्य नाही. 'मृत्युंजय' सारख्या साहित्यकृती समीक्षकांच्या चिंतनाला आव्हान देणाऱ्या असतात. त्यांचा विचार करताना साहित्यकृतींच्या श्रेष्ठतेचे निकषही सापडू शकतात. साहित्याकडे नव्या भूमिकेतून पाहणेही शक्य होते.

सर्वसामान्य वाचकाला 'मृत्युंजय' कादंबरी का आवडली, याचे कारण १९६० नंतरच्या मराठी साहित्यातून मिळते. याच काळात दलित साहित्यिकांच्या लेखनाला सुरुवात झाली. १९६२ साली प्रसिद्ध झालेल्या मालतीबाई बेडेकरांच्या 'बळी'ने मराठीतील शोषित समाजाचे उग्र वास्तव प्रकट झाले. भालचंद्र नेमाडे यांच्या 'कोसला' (१९६३) कादंबरीने गैर रोमँटिक नायकाचे चित्र उभे केले. ग्रामीण साहित्यातून उपेक्षितांचे दर्शन घडू लागले. स्त्रीच्या वेदनेला आणि आक्रोशाला साहित्यातून वाट मिळू लागली. उपेक्षित, अपमानित, शोषित समाजघटकांच्या चित्रणातून प्रस्थापितांच्या, प्रतिष्ठितांच्या विरोधाची धार अधिक तीव्र बनत चालली. त्यालाच निषेध आणि विद्रोहाची जोड मिळू लागली. परंतु 'मृत्युंजय' कादंबरीतील विद्रोह आणि निषेधाला भारतीय संस्कृतीचा संदर्भ होता. तिच्यातील निषेध, विरोध आणि विद्रोह यांचे भारतीय मानसिकतेशी एक अतूट नाते आहे. कादंबरीच्या प्रकट होणाऱ्या मानवी भावना रसिकांना कर्णाच्या रूपात साकारलेल्या दिसल्या.

'मृत्युंजय' मधील कर्ण सत्प्रवृत्त, सदाचरणी, त्यागी, समर्पणशील, दानशूर, उदार असा एक आदर्श पुरुष आहे. वृषाली व सुप्रिया यांचा आदर्श पती, मुलांबाळांवर उत्कटतेने प्रेम करणारा वत्सल पिता, आपल्या भावांवर शोणावर निरपेक्षपणे प्रेम करणारा मोठा भाऊ.

आईवडिलांविषयी प्रेम आणि आदर बाळगणारा मुलगा, वहिनीवर माया करणारा दीर, वडीलधाऱ्यांविषयी आदर बाळगणारा आदर्श तरुण. गुरुजनांविषयी कृतज्ञता व्यक्त करणारा शिष्य, मित्रासाठी सर्वस्व अर्पण करणारा हितेच्छू मित्र, आपल्या शब्दांचे पालन करणारा निष्ठावान माणूस अशी कर्णाची विविध रूपे कादंबरीत प्रकट झाली आहेत. ही एका आदर्श भारतीय पुरुषाची वेगवेगळी रूपे आहेत. अशा आदर्श पुरुषाच्या काही चुका, काही दोष, काही विकृती यांकडे समाज क्षमाशीलपणे पाहतो. त्याच्या मर्यादांनाही स्वीकारतो. शाश्वत जीवनमूल्यांच्या प्रस्थापनेसाठी आवश्यक असणारी समर्पणशीलता, आचारविचारातील सुसंगती आणि पुरुषार्थ हे गुण असणाऱ्या कर्णासारख्या महामानवापुढे समाज नेहमीच नतमस्तक होत असतो. 'मृत्युंजय'च्या नायकाबद्दल त्यामुळेच आत्मीयता वाटली असणार.

आणखी एका गोष्टीचा उल्लेख केला पाहिजे. इ. स. १९५० - ५५ च्या दरम्यान मराठी साहित्यातील दोन अतिपरिचित भाषाशैलींबद्दल काहीसा दुरावा निर्माण झाला होता. एक शैली होती ना. सी. फडके यांची. ती शैली सुखासीन जीवनाचे चित्रण करणारी, मोहक, सरळ, प्रवाही आणि सफाईदार होती. दुसरी शैली म्हणजे खांडेकरी शैली. ही शैली आलंकारिक, तत्त्वचिंतनपर आणि प्रतीकात्मक रूपात जीवनावर भाष्य करणारी, कधी कधी उपदेशपर दृष्टांतांचा आधार घेणारी आणि चमकदार होती.

'मृत्युंजय'वर खांडेकरी भाषेचा प्रभाव आहे. केवळ भाषाच नव्हे तर घटना-प्रसंग व व्यक्तिरेखा गुंफण्याची सावंतांची पद्धत खांडेकरी वळणाची आहे. कादंबरीच्या कथावस्तूमधील योगायोग, नाट्यमयता आणि सूचकता यांच्या प्रतीकात्मक निवेदनामुळे किशोरवयीन वाचक मंत्रमुग्ध होतो. आलंकारिक खांडेकरी शैलीचा अवलंब सावंतांनी केला. कादंबरीची सुरुवातीची चमकदार आणि अलंकृत भाषा पुढे अतिशय साधी, गंभीर, सौष्ठवपूर्ण, अर्थसमृद्ध आणि अनलंकृत बनली आहे. ही वस्तुस्थिती समीक्षकांनी लक्षात घेतली नाही. मिथकीय वातावरणाच्या निर्मितीसाठी खांडेकरी शैली उपयुक्त आणि पूरक ठरते. (या संदर्भात खांडेकरांच्या 'ययाति'च्या भाषेच्या प्रभावाचा उल्लेख करावासा वाटतो.) कर्ण, अर्जुन, श्रीकृष्ण या महान व्यक्तींचे चित्रण आधुनिक पोषाख-पेहरावात करणे कितपत इष्ट ठरले असते? खांडेकरी शैलीविषयी त्या काळात वाटणाऱ्या अप्रीतीचा अनिष्ट परिणाम सावंतांना भोगावा लागला, एवढे खरे. (खांडेकरांना मात्र सामान्य वाचकांचा अनुकूल प्रतिसाद मिळाला, याचीही इथे नोंद केली पाहिजे.)

'मृत्युंजय' आणि 'महाभारत' यांचा तुलनात्मक अभ्यास करणे मनोरंजक ठरेल. महाभारतामधील घटना, व्यक्ती, त्यातील जीवनभाष्य या सर्व दृष्टींनी 'मृत्युंजय'मध्ये कोणते बदल केले आहेत, याचा तपशीलवार परामर्श घेणे ही 'मृत्युंजय'च्या अभ्यासाची एक दिशा असू शकते. पण प्रस्तुत लेखात त्या दिशेने विचार न करता काही महत्त्वाच्या गोष्टी अधोरेखित कराव्याशा वाटतात. त्या अशा :

'मृत्युंजय' मध्ये कर्णाच्या व्यक्तिरेखेला केंद्रवर्ती स्थान आहे. ही कादंबरी व्यक्तिकेंद्रित असली तरी तिने कर्णाच्या व्यापक नि बहुमिती व्यक्तिमत्त्वाला कवेत घेतले आहे. महाभारतातील घटना, प्रसंग आणि व्यक्तींचे ऐतिहासिक भूमिकेतून निवेदन करणे, ही भूमिका लेखकाने घेतलेली नाही. कर्णाच्या अंतरंगात शिरणे, त्याच्या मनोविश्वात खोलवर बुडी मारणे हा लेखकाचा मुख्य

जिवंतपणा देतो . ' मृत्युंजय 'मधील नवता कर्णाच्या व्यक्तित्वाच्या पुनर्मूल्यांकनामध्ये सामावलेली आहे . कर्णाचे दोष , त्याच्या उणिवा , त्याची विकारवशता यांच्या प्रकटनावरोबरच त्याची महत्ता अधोरेखित करणे , त्याच्या व्यक्तित्वाला पूर्णपणे न्याय देणे (not poetic justice but poet's justice) हा कादंबरीच्या निर्मितीमागील मुख्य हेतू आहे . त्याच्याही पुढे जाऊन असे म्हणता येईल की , कर्णाच्या आंतरिक व्यक्तित्वाचा शोध घेणे , हा प्रमुख हेतू आहे . आधुनिक मानसशास्त्राने करून दिलेल्या मनुष्यस्वभावाच्या ज्ञानाचे सजग भान ठेवून कर्णाचे ' अंतरंगचित्रण ' लेखकाने केले आहे . प्रसंग आणि व्यक्ती यांच्या संदर्भातील ऐतिह्य वास्तवाचा अपलाप न करता कर्णाचे अंतरंगचित्रण केले आहे . मात्र अज्ञाताच्या अंधाऱ्या गुहेत लेखक खोल अवगाहन करू शकला नाही , हे मान्य करावे लागेल . असे असले तरी कर्णाची संवेदनशीलता , त्याची सुख-दुःखे , अर्जुनाबद्दल त्याला वाटणारी ईर्ष्या , त्याच्या अवमानित व्यक्तित्वाला मिळालेली अहंकाराची जोड , अहंकार डिवचल्यामुळे त्याचा होणारा उद्रेक आणि त्यामुळे कर्णाच्या कृती-उक्तींमधून प्रकटणारा विखार इत्यादींचे चित्रण समर्थपणे केले आहे . कर्णाच्या जन्मापासून मृत्यूपर्यंतच्या सर्व घटनांना कल्पनाशक्तीने भरीव रूप प्राप्त करून दि आहे .

महाभारत हा महाकाव्यातील मिथकीय घटनांमधील अतार्किकता , चमत्कृती , अतिशयोक्ती , योगायोग , अनपेक्षितता यांचे बुद्धिवादाच्या आणि तर्काच्या आधारे समर्थन करणे अशक्य ठरते . तसे केले तर मुळातील मिथकीय तत्त्वच नष्ट होईल . म्हणूनच आधुनिक वाचकांच्या दृष्टीने मिथकीय घटनांना वाचनीय आणि रंजक बनवणे हे आणखी एक आव्हान होते . घटनांची आवश्यकतेनुसार फेरमांडणी करून , व्यक्तिचित्रणावर आणि पात्रांच्या मनोवगाहनावर अधिक भर देऊन आधुनिक लेखक या पेचातून आपली सुटका करून घेऊ शकतो . तशी सुटका लेखकाने करून घेतली आहे . एकाच वेळी हजारो वाणांचे जाळे विणणे , रथाच्या चारी बाजूंनी बाणांचा पिंजरा तयार करून त्यात रथी आणि सारथी यांना कैद करणे , विभिन्न मंत्रांच्या आधारे बाण भारून टाकणे , गदाप्रहाराने रणनीतीचे उल्लंघन करणे , जरासंधाच्या हाडाचे फासे करून आपल्या मनासारखा डाव खेळणे , शापामुळे जीवनावर प्रतिकूल परिणाम होणे इत्यादि घटना लेखकाने यथावत ठेवल्या आहेत . परंतु कर्ण , अश्वत्थामा , कुंती , शोण , वृषाली या पात्रांच्या मानसिक आंदोलनांच्या चित्रणावर जास्त भर आहे .

मृत्युंजयमधील मनोविश्लेषणपरतेचा उल्लेख करताना आणखी एक मुद्दा उपस्थित होतो . लेखकाचा प्रत्यक्षात फ्राइड , एडलर , युंग ह्यांच्या लेखनाशी कितपत संबंध आला आहे ? त्यांच्यापासून प्रेरणा घेऊन लेखकाने मानवी मनाचा वेध किनपत घेतला आहे ? मात्र काही वेळा अशी प्रेरणा सृजनशील लेखकाच्या लेखनाची दिशाभूल करू शकते , असे आढळून येते . उदा . १९६० च्या आसपास मराठी साहित्यविश्वात एका विचाराने मूळ धरले होते . तो विचार असा : साहित्यकृतीत अवतरणाऱ्या माणसाला जाणून घेण्यासाठी लेखकाने पात्राच्या अंतर्मनाचा तळ गाठला पाहिजे . सृजनशील लेखक आपल्या कल्पनाशक्तीने असा शोध घेऊ शकेल असे समीक्षकांना वाटत होते . खरे म्हणजे डोस्टोवस्कीसारख्या नामवंत रशियन लेखकांनी कोणत्याही मनोवैज्ञानिकाला ' वाट न पुसता ' असा शोध घेतला होता . डोस्टोवस्कीच्या अभ्यासानेच फ्राइडने आपले ठोकताळे बांधले . सावंत यांनी कर्णाच्या मनाचा धांडोळा घेतला आहे . प्रेम , क्रोध , घृणा ,

ईर्ष्या , मत्सर , वात्सल्य , उद्विग्नता , साहस , धैर्य आपल्या उज्ज्वल कुळाच्या मोठेपणाची जाणीव . अपमानाची अंतःकरण जाळून टाकणारी जाणीव . कर्णाच्या एकाकीपणाचे इत्यादी स्वभावविशेष व वृत्ती कादंबरीत तीव्रतेने प्रकट झाल्या आहेत . " तसं पाहिलं प्रत्येकाचं जीवन हा एक अज्ञातवास असतो ! दुःखापासून दूर जाण्यासाठी पत्करलेला ! अधिक प्रभावी दुःखांनी घेरलेला ! माझं जीवनही तसच होतं ; पंचाहत्तर वर्षांचा हा दीर्घ प्रवास घटनांची , भावनांची , उत्कर्षापकर्षांची किती अवघड वळणं घेऊन आला होता ! कशाची कशाला संगती लागत नव्हती . पुढं कधीतरी ती लागणार होती की नाही ? कोण जाणे ! " द्रौपदीविषयी वाटणारे आकर्षण आणि दुरावा , राग आणि प्रेम अशा संमिश्र भावना लेखकाने शब्दांकित केल्या आहेत . पश्चात्तापाची जळती वेदना उरी वाळगणारा कर्ण म्हणतो . " अच्युता , त्या विशालाक्षी , श्यामल , भावगंधित द्रौपदीला सांग की . . की कर्णाच्या अंतःकरणाच्या वीणेची एक भग्न तार तुझ्या अवहेलनेच्या जाणिवेनं सदैव कर्कशपणे झणकारतच राहिली आहे ! परन्तु पाच पतींची पत्नी असूनही पातिव्रत्याच्या कळसावर पोहोचलेल्या त्या एकमेव आर्येला पांचालीला सांगा की - की शक्य असल्यास या कर्णाला क्षमा कर ! " भरसभेत द्रौपदीचे वस्त्रहरण केले जात असताना कर्णाने कटू शब्दांनी विद्ध केले होते . परंतु तो आवेश मनाच्या भयानक गुहेतून निघालेला होता . कर्णाचे त्यावर नियंत्रण नव्हते . आपल्या हातून घडणाऱ्या प्रमादाची तीव्र जाणीव , विवेकाची , सदसद्विवेकबुद्धीची सतत लागून राहिलेली टोचणी अशा मनःस्थितीमधील कर्णाच्या अस्वस्थ आत्म्याचे भान लेखकाला आहे . असे भान असणे ही काही लहान गोष्ट नाही . वास्तविकपणे कवचकुंडलाचे दान केल्यावद्दल किंचितही दुःख कर्णाला होत नाही . चुकीने गाय मारल्यामुळे मिळालेल्या शापावद्दल त्याला दुःख होते ; पण भीती वाटत नाही . परशुराम ऋषींनी दिलेल्या शापामुळे त्याच्या मनाला वेदना होतात . त्यानंतरही मृत्यूला अटकाव घालू शकणाऱ्या एकेका शक्तीपासून आपण मुकलो आहोत याचेही एवढे दुःख त्याला होत नाही . कारण आपले शौर्य आणि शस्त्रविद्येतील प्रावीण्य यावर त्याचा पूर्ण विश्वास होता . कर्णाचे समग्र जीवनच मुळी नियतीच्या कठोर प्रहारांनी उद्ध्वस्त झाले आहे . त्यातही त्याचा स्वतःचा असा कोणताही दोष नसलेल्या अपराधावद्दल त्याला फार कठोर शिक्षा भोगावी लागते . अशा परिस्थितीत कर्णाने अंतर्मुख होऊन जीवनार्थाचा शोध घेणे सहज स्वाभाविक आहे . जीवनाच्या विसंगतीतील कार्यकारणभावाचा शोध घेण्याचा कर्ण असफल प्रयत्न करतो . ' मृत्युंजय ' आणि महाभारतामधील कर्णाच्या व्यक्तिरेखेत इथेच भेद आहे . ' मृत्युंजय ' मधील कर्णाची व्यक्तिरेखा अधिक गुंतागुंतीची आणि जटिल आहे . आपण सूर्यपुत्र आहोत या वस्तुस्थितीची श्रीकृष्णाने जाणीव करून दिल्यावर हर्षनिर्भर झालेल्या कर्णाचे परिणामकारक चित्रण लेखकाने केले आहे . ' मृत्युंजय ' मधील कर्ण अंतर्मुख होऊन मानवी जीवनातील अर्थपूर्णतेचा शोध घेण्याचा प्रयत्न करतो - " घटनांचे असंख्य तीक्ष्ण दात उरात रुतू लागले . साक्षात तेजाचा पुत्र असूनही या दीर्घ जीवनक्रमात अपमान , वंचना , अवहेलना , उपेक्षा याशिवाय मी काय अनुभवलं होतं ? कुठून मी कुठं आलो होतो ? जीवनाचा अर्थ काय ? कुणाच्या तरी अपराधाची एवढी महान शिक्षा दुसऱ्या कुणाला तरी मिळावी हेच जीवन आहे काय ? साक्षात सूर्यपुत्र असूनही नियतीच्या किती क्रूर थपडा खात आलं होतं माझं आयुष्य ! की - की ज्या अग्निमध्यातून मी जन्माला आलो त्या अग्नीचा कधीच विसर पडू नये म्हणून नियतीनं ही जीवनाची आग मुक्तहस्तानं माझ्या

सुवर्णमस्तकावर ओतली ?"

श्रीकृष्णाच्या मनाचा कल पांडवांकडे झुकलेला होता ; आणि श्रीकृष्णावद्दल कर्णाच्या मनात अनोखे आकर्षण होते . त्याच्या मनात कृष्णावद्दल कमालीची मोहिनी होती . (मात्र या संदर्भात लेखकाने स्पष्टपणे निवेदन केलेले नाही) कर्णाला पांडवांच्या वाजूने वळवण्यासाठी प्रयत्नशील असलेल्या श्रीकृष्णाला कर्ण म्हणतो , "पण - पण कोणनाही धूत न खेळता मी जीवनभर जो घोर . घृणामय अज्ञातवास पत्करला आहे त्यासाठी तुझ्या मनाला कुठं तरी यातना होतात काय ? त्या झाल्या असत्या . . तर तू मला पांडवांकडे येण्याचा आग्रह कधीच केला नसतास ! घननीळा , एक राजकीय मुत्सद्दी म्हणून येऊनही तू मला भावनामय आवाहन करतो आहेस ! केशवा , कटू असलं तरी हे सत्य आहे . स्पष्टपणं बोलतो आहे म्हणून मला उदार हृदयानं क्षमा कर . तू महान आहेस . दिव्य आहेस . माझ्या अंतःकरणात तुझ्याविषयी शब्दातीत असा नितांत प्रेमादर आहे . म्हणूनच जो महायज्ञ तू पेटविणार आहेस त्यामध्ये माझ्या देहाची सुवर्ण समिधा मी निःशंकपणे सहर्ष अर्पण करणार आहे . जगात कधी झाला नाही , पुढं कधीही होणार नाही असाच तो दिव्य महायज्ञ असेल ! पुरुषोत्तमा , पांडवांच्या आणि कर्णाच्या समेटाचा समय केव्हाच निघून गेला आहे ."

कर्णाच्या जीवनाला शोकांतिकेचे रूप प्राप्त करून देण्यात लेखक यशस्वी झाला आहे . पण मृत्युंजय ही संपूर्णपणे शोकांतिका ठरत नाही . आणि यातच तिचे भारतीयत्व आहे . कुणा एका विशिष्ट व्यक्तीच्या सुखदुःखाला शोकांतिकेचे मूल्य प्राप्त व्हावे , एवढे महत्त्व महाभारताच्या विराट घटनाचक्रात मिळालेले नाही . सर्व घटना आणि पात्रांना केंद्रवर्ती ठेवून मृत्युंजयमध्ये कर्णाची शोकात्म कहाणी कथन केली आहे . त्यामुळेच शोकांतिकेची भावात्मक परिणती अनुभवास येते . नियतीचा क्रूर खेळ , श्रेष्ठपणाला लागलेले ग्रहण आणि मौलिकतेच्या ऱ्हासामुळे अनुभवास येणारे दुःख कादंबरीत प्रकट झाले आहे . शिवाय जीवनातील अतार्किकता आणि विसंगतीचे दर्शनही कादंबरीत होते . एवढे असूनही मृत्युंजय पूर्णपणे शोकान्तिकेचे रूप घेऊ शकत नाही . कारण कर्णाचा विनाश वाचकांना , रसिकांना तितका दुःखपूर्ण वाटत नाही . रसिकांच्या सहानुभूतीचे केंद्र श्रीकृष्ण आणि पांडवांच्या दिशेने झुकते . त्यामुळेच कर्णाचा विनाश दुःख आणि आनंद यांचा संमिश्र प्रत्यय देणारा ठरतो . दुसरे असे की , कर्ण आपल्या मृत्यूचा आनंदाने स्वीकार करतो . .

आपले अंत्यसंस्कार कुमारी (नागीक) भूमीवर करावे अशी इच्छा कर्ण कृष्णाजवळ प्रकट करतो . श्रीकृष्णाला कर्णाची अपेक्षा नीट समजू शकत नाही . तेव्हा कर्ण म्हणतो , "होय . . . कुमारी ! ज्या भूमीवर . . कधी - कधीच . . . तृणांकुर सुद्धा . . . . उगवले नसतील . . उगवणार नाहीत ! माझी दुःखं . . . ती - ती पुन्हा पुन्हा या मर्त्यभूमीवर - कधीच - कोणत्याही रूपात उगवू नयेत ! म्हणून . . . म्हणून ही - ही पंचमहाभूते - कुमारी भूमीत - लय लय . . . " कर्णाचा मृत्यू मृत्यू नसून महानिर्वाण आहे . लेखकाने उचित शब्दांत श्रीकृष्णाच्या तोंडून हे व्यक्त केले आहे . "त्या मृत्युंजय महावीरांचं महानिर्वाण झालं ! ! !" कर्णाचा मृत्यू हा लौकिक अर्थी मृत्यू नाहीच . म्हणून तिथे मृत्युभयही नाही . इथे मृत्युविषयक भारतीय दृष्टिकोन जाणवतो . जरी कर्णाला या पृथ्वीतलावर पुन्हा जन्म घ्यावा असे वाटत नसले तरी त्याच्या संदर्भात मृत्यू म्हणजे मृत्यूमुळे भयग्रस्त होणे किंवा सर्व काही नष्ट होणे अशी स्थिती नाही . मोक्षाच्या अपेक्षेने येणारा

मृत्यू शोकान्तिकेच्या परिणामाची तीव्रता कमी करतो . शोकांतिका हेच केवळ श्रेष्ट साहित्याचे गमक आहे असे समजण्याचे कारण नाही . श्रेष्ट साहित्याकडून अपेक्षित असणाऱ्या लक्षणांपैकी ते एक लक्षण किंवा मूल्य आहे एवढेच .

अंतर्मुखतेच्या दिशेने चाललेला कर्णाच्या मनाचा प्रवास महाभारतामधील कर्णाच्या व्यक्तिरेखच्या प्रवासापेक्षा वेगळा आहे . महाभारतात युद्धाची अनेक वर्णने आहे . त्या वर्णनांत पुनरुक्ती आणि अतिशयोक्ती आहे , हे खरे आहे . मृत्युंजयच्या लेखकाने आधुनिकतेच्या स्वीकारापोटी युद्धवर्णनात फारसा बदल केलेला दिसत नाही . मृत्युंजयमधील मिथकीय वातावरण विचारात घेता तसे करणे योग्यच आहे . मात्र व्यक्तिचित्रणात ठसठशीतपणा आणि भरघोसपणा आणण्याचा यथाशक्ती प्रयत्न लेखकाने केला आहे . तत्त्वचिंतक अश्वत्थाम्याची अत्यंत परिणामकारक अशी व्यक्तिरेखा मृत्युंजयकारांनी उभी केली आहे . महाभारतातील कुंतीचे दुःख निवेदनाच्या - कथनाच्या पातळीवर प्रकट झाले आहे . मृत्युंजयमधील कुंतीची व्यक्तिरेखा संवेदनात्मक पातळीवर चित्रदर्शीपणे आपल्यासमोर उभी राहते . एखाद्या घटनेची निर्मिती लेखकाने अधिक वास्तव आणि तर्कसंगत स्वरूपात केली आहे . कृष्णाने सूर्याला झाकून टाकणे हा जयद्रथ वधाचा प्रसंग लेखकाने सूर्यग्रहणाच्या आधारे उभा केला आहे . मात्र असे प्रसंग कादंबरीत कमी आहेत .

कादंबरीतील प्रसंगांना रसवत्ता प्राप्त करून देण्याचे कौशल्य सावंतांना मूळ महाभारताच्या आधारे प्राप्त झाले आहे . कर्ण आणि भोग यांच्यातील बंधुत्वाचे नाते , वृषाली व कर्ण यांच्यातील वैवाहिक जीवन , प्राप्त झालेल्या कवचकुंडलांविषयी कर्णाला वाटणारी चिंता व त्याच्या अंतःकरणाला भेडसावणारी चिंता , कर्णाला अर्जुनाबद्दल सतत वाटणारा वैरभाव , कर्ण-दुर्योधनाच्या मैत्रीचे स्वरूप . कर्णाचे शरसंधान , कौशल्य व त्याचा अपमान , कर्णाबद्दल कुंतीच्या मनातील सल आणि वात्सल्य भावना . दुर्योधनाची सत्तालालसा , शिशुपाल वधाचा प्रसंग , द्रौपदी वस्त्रहरण प्रसंग , शिकारीच्या वेळी दुर्योधनावर ओढवलेले संकट , ब्रम्हास्त्र प्राप्तीसाठी कर्णाने केलेले प्रयत्न आणि नियतीचे उलटे पडलेले दान , श्रीकृष्णाचे कर्णाला पांडवांकडे वळवण्याचे प्रयत्न , कुंती-कर्ण भेट हे व असे कितीतरी प्रसंग सावंतांच्या लेखणीने रसपूर्ण चित्रदर्शी व सजीव केले आहे . प्रत्ययकारी प्रसंगरेखाटन हे मृत्युंजयच्या लोकप्रियतेचे एक महत्त्वाचे कारण आहे .

चित्रदर्शी , सौंदर्यपूर्ण , प्रवाही आणि अमूर्ताला मूर्त करणारी भाषा निवेदनाला चित्रमय रूप देते . तात्त्विक , चिंतनगर्भ आणि भावपूर्ण संवादयोजनेमुळे कादंबरीतील नाट्यपूर्णतेला उठाव मिळाला आहे . संवादामधील उत्कटता आवेग आणि प्रासादिकता यांमुळे वाचक खिळून जातो . युद्धात वापरल्या जाणाऱ्या बाणांची नावे , शस्त्रे यांच्या सूक्ष्मनिवेदनामुळे युद्धवर्णने प्रभावी ठरली आहे . लेखकाला असणारे भूप्रदेशांचे भौगोलिक ज्ञानही विशेष उल्लेखनीय आहे .

मृत्युंजय कादंबरीची समग्र रचनादृष्टी भारतीय संस्कृतीच्या अस्मितेवर उभारली गेली आहे . महाराष्ट्रातील तत्कालिन सुशिक्षितांचा एक गट ही अस्मिता पचवू शकला नाही . नवतेच्या पाश्चात्य तत्त्वज्ञानाने दिपून गेलेले , भारावून गेलेले , आधुनिकतेच्या चकमकीने दिपलेले , भारतीय मिथकथांकडे संशयास्पद वृत्तीने पाहणारे भारतीय वाचक ' मृत्युंजय 'चे खरे वाचक बनू शकत नाहीत .

मृत्युंजय कर्णाविषयी लेखकाच्या मनात असलेला आदर , आत्मीयता आणि गौरवाची

भावना , अपेक्षित वास्तव चित्रण , आशयाच्या आविष्काराला काही लक्षणे निश्चितपणे बाधक ठरली आहेत . अर्जुनाबरोबर झालेल्या युद्धात जवळजवळ प्रत्येक वेळी कर्ण हरतो . हे महाभारतातील सत्य लेखकाने फिके , धूसर केले आहे . कर्णाबरोबर झालेल्या वाक्‌युद्धाच्या वेळी कृपाचार्यांसारखे लढवय्ये लक्ष वेधून घेतात पण अशा वेळी कर्ण मूळ प्रश्नाला बगल देण्याचा प्रयत्न करतो . वास्तविकपणे अंतर्मुख वृत्तीच्या कर्णाने वेळोवेळी पराजयाचे विश्लेषण करायला हवे होते . परंतु लेखकाच्या मनातील कर्णाविषयीची आदरभावना लेखकाला तसे करू देत नाही . मूळ महाभारतातील कर्ण स्वतः दुर्योधनाला पांडवांविरुद्ध चेतावनी पण असे प्रसंगही कादंबरीकाराने टाळले आहेत . द्रौपदी वस्त्रहरणाचा प्रसंग रेखाटतानाही कर्णाच्या आंतरिक संघर्षाला उठाव देऊन कर्णाच्या प्रमादाची धार वरीच बोथट केली गेली आहे . कर्णाविषयी लेखक अधिक हळवा , भावुक असल्यामुळे मूळ महाभारतातील काही मूलभूत नैतिक प्रश्न आणि ऐतिहासिक सत्य प्रकट करणे कादंबरीकाराने टाळले आहे , एवढे निश्चित .

आज महाभारताकडे मागे वळून पाहणे म्हणजे आपली प्राचीन संस्कृती आणि परंपरा यांचे पुनर्मूल्यांकन करणे होय . महाभारत या आर्ष महाकाव्याने भारतीय कलावंतांमधील सृजनशीलतेला सतत आवाहन केले आहे . ऐतिहासिक वास्तवाचा नवा अन्वयार्थ लावण्याची संधी कवि-लेखकांना मिळाली आहे . मराठीतील अशा प्रकारच्या लेखनात ' मृत्युंजय 'चे स्थान महत्त्वपूर्ण आहे . कर्णाच्या व्यक्तित्वातील उदारता , त्याचा मोठेपणा , त्याचे सूक्ष्म मनोव्यापार यांचा मर्मस्पर्शी शोध सावंतांनी स्वतःच्या पूर्ण शक्तीनिशी घेतला आहे .

' मृत्युंजय 'चा विचार करताना हिन्दीमधील काही कलाकृतींचे स्मरण होते . महाभारताच्या आधारेच लिहिलेल्या ' कर्ण ' (केदारनाथ मिश्र) व ' रश्मिरथी ' (रामधारी सिंह ' दिनकर ') या दोन खंडकाव्यांची आठवण हिन्दी भाषिक वाचकांना निश्चितच होईल , लेखकाने या दोन्ही कवींचा कृतज्ञतापूर्वक उल्लेख प्रस्तावनेत केला आहे . या संदर्भात दुसरा उल्लेख धर्मवीर भारतींच्या ' अंधायुग 'चा कर्णाशी . अंधायुगशी तसा त्याचा संबंध नसला तरी भारतीय मिथकांवर आधारलेल्या प्रस्तुत नाटकात परंपरा आणि नवता यांच्यातील ताणतणाव वेगवेगळ्या पातळ्यांवर प्रकट झाले आहेत . भ्रष्टाचारी प्रतिष्ठित समाजाबद्दलची युवा पिढीच्या मनातील विद्रोहाची भावना विभिन्न स्तरांवर प्रतीकात्मक व सूचक भाषाशैलीत आविष्कृत झाली आहे .

' मृत्युंजय ' व्यक्ति केंद्रित कलाकृती आहे . त्यामुळेच तिच्यात काहीसा एकांगीपणा आला आहे . ' अंधायुग ' हे नाटक समकालीन जीवनातील वास्तव व त्यातील विसंगती-विरोध आणि वेगडीपणा याबद्दलच्या विचारांना चालना देते . उलट ' मृत्युंजय ' मधील व्यक्तिकेंद्रिततेमुळे कर्णाच्या मनोव्यापारांचा आस्वाद घेण्यात रसिक रमून जातो . ' अर्घ्यदान ' या ' मृत्युंजय 'च्या चौथ्या आवृत्तीमधील प्रस्तावनेत लेखक आपल्या कादंबरीला ' प्रदीर्घ भावकथा ' म्हणतो ते यथार्थ आहे . ' अंधायुग ' नाटक एका युगाची शोकांतिका उभी करते . ' मृत्युंजय 'मधील वाङ्मयीन गुणवत्तेच्या आपल्या मनावर होणाऱ्या तीव्र परिणामामुळेच की काय ह्या दोन कलाकृतींची तुलना करण्याचा मोह होत असावा !

( मूळ हिंदी लेखाचा अनुवाद- वि .शं . चौघुले , २० बी , आकाशदीप , मीलन सबवे , सांताक्रुझ (प .) मुंबई ४०० ०५४ )

( डॉ . चंद्रकांत बांदिवडेकर , शाकुंतल , साहित्य सहवास , वांद्रा (पूर्व) , मुंबई - ५१)





अनुक्रमणिका

# सिद्धान्त शिरोमणिप्रकाश

१८३६ साली प्रसिद्ध झालेला एक वैशिष्ट्यपूर्ण ग्रंथ

**प्रा. चंद्रकांत अभंग**

माळव्यातील सिहोर येथील सुवाजी वापू याने भास्कराचार्य व कोपर्निकस यांच्या भूगोल-खगोलविषयक सिद्धान्तांची तुलना करून 'सिद्धान्त शिरोमणिप्रकाश' हा ग्रंथ इ. स. १८३६ मध्ये प्रकाशित केला.

सुवाजी वापू हा भोपाळ राज्यात राहणारा मराठी ब्राह्मण होता. मराठ्यांच्या सत्ता विस्ताराच्या काळात अनेक मराठी लोक त्या भागात स्थायिक झाले आणि त्यांनी मराठी परंपरा तेथे चालू ठेवल्या. भोपाळचा इंग्रज पोलिटिकल एजंट मेजर विल्किन्सन याच्याशी सुवाजी वापूचा स्नेह होता. दोघांची ज्ञाननिष्ठा हा या स्नेहाचा आधार होता. बाळशास्त्री जांभेकरांशी सिहोरचे पोलिटिकल एजंट लॅन्सिलॉट विल्किन्सन यांचा पत्रव्यवहार उपलब्ध आहे. त्यात 'माझा वापू, माझा वापू' असा सुवाजीचा गौरवाने उल्लेख विल्किन्सनने केलेला आढळतो. तत्कालीन नवजागरणाने सुवाजी वापू प्रभावित झालेला होता. समकालीन असणाऱ्या बाळशास्त्री जांभेकरांप्रमाणेच पौर्वात्य परंपरा आणि पाश्चात्य आधुनिकता यांचा समन्वय घडवण्याची दृष्टी सुवाजी वापूमध्ये आढळते. सुवाजी भोपाळनिवासी असला तरी त्याचे पुस्तक मुंबईत प्रकाशित झाले. यावरून महाराष्ट्रात सुरू झालेल्या प्रबोधनाशी सुवाजीचे नाते जोडले गेले होते, हे उघड आहे. भावी काळात महाराष्ट्रातील प्रबोधनकारांपैकी वावा पदमनजी हे सुवाजी वापूजींच्या पुस्तकामुळेच विशेष प्रभावित झाले.

हा ग्रंथ तयार करण्यासाठी विल्किन्सनने सुवाजी वापूस आर्थिक मदत केली. तसेच त्याचे हस्तलिखित वाचून त्यात दुरुस्त्याही सुचविल्या. विल्किन्सन स्वतः ज्योतिष्य, खगोल व भूगोल यांचा अभ्यासक होता.

हा ग्रंथ सिहोर येथील सरकारी पाठशाळेत अभ्यासण्याकरिता लावण्यात आलेला होता. या शाळेत दर रविवारी परीक्षा घेतली जाई. परीक्षेत पास होणाऱ्यांना उंची वस्त्रे, रोख रुपये व पुस्तके वक्षीस म्हणून देण्यात येत. वक्षीस मिळविण्यात स्पर्धा सुरू झाल्याने अनेक हिंदू व मुस्लिम विद्यार्थी खगोल, भूगोल, ज्योतिष्य, गणित इ. विषयात प्रवीण झाल्याचे म्हटलेले आहे.

'ज्या भगवंताने हे ब्रह्मांड निर्माण केले त्या ब्रह्मांडाची वालकालाही सत्वर माहिती होईल यासाठी सोप्या भाषेतून माझ्या बुद्धीनुसार ही विचित्र जगरचना मी समजावून सांगण्याचा प्रयत्न करीत असल्याचे प्रारंभी म्हटलेले आहे.

भूगोलखगोलविषयक माहिती श्रीमद्भागवत, पुराण, महाभारतातील भीष्मपर्व या तसेच

तसेच वायुपुराण यात आलेली आहे. पण त्या माहितीपेक्षा वेगळी विरोधी माहिती भास्कराचार्यकृत सिद्धांत शिरोमणीत दिलेली आहे, ती गणितावर आधारित असल्याने अधिक खरी आहे असेही प्रस्तावनेत म्हटले आहे.

हे पुस्तक तयार करताना खालील प्राचीन ग्रंथांचा वापर केलेला दिसून येतो. १) सिद्धान्त शिरोमणी, २) गोलाध्याय, ३) मिताक्षर, ४) मरीचिव्याख्या, ५)भागवत पुराण, ६) श्रीधर टीका, ७) विश्वगुणादर्श चंपू, ८) धर्मविचार तसेच एलीवर (ऑलिव्हर) साहेबांनी (पाश्चात्यांनी) ज्या समुद्र सफरी करून प्रत्यक्ष नकाशे काढून माहिती दिलेली आहे; त्यानुसार कोणता विषय भूगोलासंबंधी कोठे व किती खरा आहे, हेही मी माझ्या बुद्धीनुसार आपल्यापुढे विचारपूर्वक ठेवित असून कुठे चुकले असल्यास संकोच न करता मला सांगावे असे सांगून प्रथम प्रकरण सुरू केले आहे (पृष्ठ ८). "जे आदितत्त्व परब्रह्म ते सर्वोत्कर्षे करून वर्तत आहे. पंचीकृत महाभूत समुदायापासून ब्रह्मांड झाले, ज्याचे जठरागत पृथ्वी तीचे पृष्ठभागी आहे. चतुरानन यापासून विश्व झाले." (पृष्ठ २).

पृथ्वी कमलपत्रासारखी वाटोळी आहे.त्यामध्ये जंबुद्वीप लक्ष योजन विस्तार आहे. या द्विपात नऊ वर्ष सांधितले. त्यांत मध्यभागी इलावृत्तवर्ष, त्याचे मध्यभागी पृथ्वीच कमल, त्यांस बीजकोशासारिखा मेरुपर्वत सुवर्णाचा आहे. तो लक्ष योजने समग्र उंच आहे. त्यांत सोळा सहस्र योजने पृथ्वी तगडून आहे. वरता चव्यांशी सहस्र योजने आहे. विस्तार खाली थोडा वरता बहुत असा धत्तूर पुष्पासारिखा आहे. त्याच्या चतुर्दिशास चार अवष्टंभ गिरी आहेत आणि सभोवते वरकड आठ वर्ष आहेत. अवष्टंभ पर्वतावर आंब्याचा, जांवुळीचा व वडाचा असे चार वृक्ष चहुगिरीवर एक एक अकराशे योजने उंच तितुकाच विस्तार आहेत. जांवुळीचे फळ एक एक हत्तीमारखे पिकून पर्वतावर पडून फुटते व त्यातून रस प्रवाह चालतो. त्याचा स्पर्श मृत्तिकेस जाल्यास सुवर्ण होते. म्हणोनच सोन्यास जांवुनद असे नांव आहे. द्विपाचेही नांव त्याच वृक्षाचे आहे. वरकड तीन नद्या तीन वृक्षापासून उत्पन्न झाल्या. तेथेही समस्त पदार्थ प्राप्त होतात. आणि मेरूचे चहुकडे चार ह्रद म्हणजे डोह आहेत, ते एक दुधाचा, एक मधु म्हणजे मदाचा, एक इक्षुरस म्हणजे ऊसाचे रसाचा, एक उदकाचा ऐसे आहेत. आणि मेरुभवताले ज़वळ कुरंग जठरादि पर्वत बहुत आहेत. काही दूर वर्ष मर्यादा गिरी आहेत. मेरुवरती ब्रह्मपुरी आहे. अष्टदिशाचे ठायी अष्टदिपाल पुरीवा सर्वही सुवर्णमणिमय आहेत (पृष्ट ९.१०)

जंबुद्विपाभोवती लवणसमुद्र लक्ष योजने विस्तार परिखाकार म्हणजे खंदकासारिखा आहे. त्याभावताले प्लक्षद्वीप द्विगुण म्हणजे दोन लक्ष योजने विस्तार तितकाच विस्तृत इक्षुरस समुद्राने वेष्टित आहे. त्यांत प्लक्षवृक्ष म्हणजे पाकडा जंवुवृक्षासमानच उंच विस्तार आहे. त्या झाडापासून द्वीपाचेही नांव तेच आहे. त्यांत सातच पर्वत, सातच नद्या आहेत. असेच वरकडही द्वीप एकापेक्षा एक द्विगुण विस्तारसमुद्रही द्वीपावरोवर वृक्ष जंवुवृक्षावरोवर नद्या व गिरी यांत सातच आहेत, त्यांची नांवे प्लक्षद्वीपानंतर इक्षुरस समुद्राचे पार शाल्मली द्वीप, त्याभवताली सुरासमुद्र त्या भवताले कुशद्वीप, मग घृतोद[illegible], मग क्रौंचद्वीप क्रौंचनामक पर्वत त्या द्वीपात आहे. त्याच्याने द्वीपाचेही नांव झाले. त्या भावताला क्षीरसमुद्र, मग शाकद्वीप शाकवृक्ष तेथे आहे; म्हणोन तेच नाव पडले. मग दधिमंडोधि ,मग पुष्करद्वीप कमलाचे

नाव द्वीपास आले. त्याभवताला स्वादुदक समुद्र पुष्कर द्वीपान मानसोत्तर पर्वत द्वीप मर्यादागिरी, त्यावर सूर्यरथ चक्र चालत असते. स्वादुदक समुद्राचे पलीकडे लोकालोक नामक पर्वत आहे. लोकालोक म्हणजे त्याला एकीकडे सूर्यादी प्रकाश, एकीकडे अंधकार आहे. म्हणोन लोकालोक असे नांव आहे. मानसोत्तर पर्वतापासून लोकालोकावरील मध्यभूमी सुवर्णमयी आहे. तेथे कोणी प्राणीमात्र नाही. लोकालोकांवर चतुर्दिशास दिग्गज आहेत. असा पन्नास कोटी योजनेचा विस्तार आहे आणि उंचही तितकाच आहे. त्याजवर भगवान आहे. त्याचे पलीकडे योगेश्वर गती बोलतात. द्यावा पृथ्वीचे अंतर पंचवीस कोटी योजने आहे.

भूमीखाली सात पाताललोक आहेत. त्यांत मय व मयपुत्र आणि वली वगैरे राक्षस, वासुकी आदि सर्प इत्यादिकांची स्थिती सांगितली आहे. सप्तपाताल एकास एक असून १०००० योजनांतराने आहेत (पृष्ठ ११). पृथ्वी मूलदेशी ३०००० योजनांतरी भगवान संकर्षण म्हणजे शेष पृथ्वीस धरून आहे.

पंडिवशेतुततो धस्तान्नरक स्थिती रुच्यते
पापिनोयत्र दत्धते यमदूतैर्यथायथम्॥

असे नरक वर्णन केलेले असून दक्षिण दिशेस भूमीखाली उदकावर पितृगण राहातात. अशी भागवतस्कंधात वर्णने केलेली आहेत.

थोडक्यात, भूमी कमलपत्रासारिखी मैदान आहे. आणि पन्नास कोटि योजनेविस्तार आहे. शेषाने धरली आहे. या सिद्धान्तावर सुबाजी बापूजीने आक्षेप घेऊन असे होऊच शकत नाही असे म्हटले आहे. त्यासाठी ते भास्कराचार्यांचा श्लोक पुढे देऊन म्हणतात : पृथ्वी मैदान असल्यास सूर्य आकाशी फिरत दूर गेला तरी अखंड सर्व लोकांस देवाला दिसल्यासारखा दिसायला हवा तसा तो का दिसत नाही? तसेच - जर मध्ये मेरुपर्वत येऊन रात्र करितो म्हणाल तर सूर्याचे व आपले मध्ये राहणारा मेरू आपणांस दिसावा. तो का दिसत नाही? अतएव मेरु म्हणजे उत्तर ध्रुवाखाली पृथ्वीचा अग्रभाग जो आहे त्या स्थानाचे नाव परंतु कैलासादि इतर पर्वतासारिखा पृथ्वीवर उंच मेरु पर्वत नाही. अस्तुमेरु पर्वत सत्य यापक्षीही मेरु आपणांस उत्तर दिशेस आहे का? सूर्याचा दक्षिण पर मकरसंक्रांत समयी दक्षिण भागी का उदय होतो? अतएव पृथ्वी मैदानच नाही. गोलाकार तोफेच्या गोळ्यासारखी आहे. तिचे उत्तर अग्राचे नाव मेरुस्थान. परंतु पर्वत उंच नाही. तिच्या भवतालचे सूर्यादि ग्रह क्रांतिवशाने फिरतात म्हणोन दक्षिणभागी उत्तरभागी उदय दिसतो असे स्पष्टीकरण केलेले आहे. (पृष्ठ १२).

मुसलमानी संकल्पनेत आकाश बिलोरी काचेचे आहे (पृष्ठ १४). इ. स. १४९२ कोलंबसाची अमेरिका सफर व इ. स. १४९८ मध्ये वास्को-द-गामाने हिंदुस्थानचा शोधलेला मार्ग, मॅगेलन व कुक हे संशोधक जंगली लोकांच्या हाती पडून मारले गेले. तर कॅप्टन रास याची उत्तर ध्रुवावरील कष्टपद मोहिम यांची माहितीही ते देतात. (पृष्ठ १५-१६).

पश्चिमेकडोन जो जातो त्याला मागरे आपल्या पहिल्या ठिकाणी येईपर्यंत एक प्रदक्षिणा होते. त्याला एक दिवस कमी होतो. असेच पूर्वेकडे जो जातो त्याला एक दिवस जास्त होतो. त्यावद्दलचे शास्त्रीय स्पष्टीकरण दिले आहे. (पृष्ट २२). पृथ्वीच्या ठायी आकर्षण शक्ती

पिकतात (पृष्ठ ३२) तसेच रामायणातील सीताहरणाच्या कथाही सांगितली आहे.

पर्वतामध्ये हिमवान प्रसिद्ध आणि त्याचा एक प्रदेश धवलगिरी नामक अडीच कोस उंच आहे. एवढा मोठा पर्वत कोणताही नाही. मलयाचल श्रीरामेश्वराकडे आहे. त्याचे योगाने देशाचे नाव हिलयाळ जाले. तेथे श्री चंदनवृक्ष आहेत. सह्याद्री पर्वत ताप्तीपासून समुद्राचे काठोकाठी रामेश्वरापावेतो गेला आहे. विंध्यपर्वत नर्मदेचे उत्तर तीराजवळच आहे. त्याजवरच माळवा देश आहे. (पृष्ठ ४१)

जलप्रलय झाला त्यावेळेसभग वंताने मनुआदिकास नावेवरच बसवून रक्षण केले. ते काही दिवस त्याजवरच होते. त्यानंतर जलप्रलय निवारण झाल्यावर त्यापासूनच सर्वांची उत्पत्ती झाली असे सर्व लोकांच्या शास्त्रात आहे. या संदर्भात मनू म्हणजे यहुदी प्रेषित नोहा असे मत सुबाजी बापू व्यक्त करतो. (पृष्ठ ४३)

अमेरिका म्हणजे केवळ भोगभूमी आहे. उन्हाळा जोगी, पावसाळा रोगी, हिवाळा भोगी अशी अमेरिकेबाबत म्हण प्रचलित असून तेथे सदासर्वकाळ हिवाळा असल्याने भोगच आहे. मद्यपान व नग्न जलक्रीडा तेथे कायम चालते. तसेच येथील स्त्रिया रूपवती, सुकुमार, चातुर्यवती, विद्यावती असून अप्सरांसारख्या सुंदर आहेत. (पृष्ठ ४५).

१९ व्या शतकामधील प्रबोधनाची प्रेरणा आणि तिचेच वेगळे स्वरूप म्हंजे राष्ट्रीय भावना या दोन्ही प्रेरणांचा परिणाम सुबाजी बापू यांच्यावर झालेला दिसतो. राजा राममोहन रॉय यांच्या कार्याचे व विचाराचे महत्त्व ओळखून त्यांच्या इंग्लंडमधील कार्याची दखल घेतली आहे. (पृष्ठ ४६) तसेच हिंदू व्यापारी व सावकार तेथे जाऊन अफूच्या व्यापारात भरपूर नफा मिळवतात असेही म्हटले आहे. (पृष्ठ ४७)

देशाटनाने स्वहित साधते व पुण्यपुरुषार्थ प्राप्त होतो. नवीन रोजगार उपलब्ध होतो. आर्थिक लाभ व स्नेहनिर्मिती होऊन हे विश्वचि माझे घर ही भावना निर्माण होते, असे म्हटलेले आहे. (४८)

मानस सरोवराजवळच कैलास पर्वत आहे. त्याजवर सांब आहे. गंगा आकाशातून सांबाचे जटाजुटात आली, तेथून मानस सरोवरी आली व तेथून हिमपर्वत फोडून निघाली. त्या स्थळाला गंगोत्तरी म्हणतात. हिन्दू लोकांत गंगेला खूप महत्त्व आहे (पृष्ठ ४९)

प्राचीन भारतीयांच्या मते सूर्य फिरतो व पृथ्वी स्थिर आह, असा जो समज आहे तो चुकीचा आहे. सूर्य अचल असून तो पृथ्वीभोवती फिरत नाही; तर सारे ग्रह सूर्याभोवती फिरतात. तसेच पृथ्वी साठ घटकात आपल्या आसाभोवती एक फेरा मारते. त्या फिरण्याने ज्या वाजूस सूर्य दिसतो तेथे दिवस व जेथे पृथ्वीची छाया पडते तेथे रात्र अशा दिनरात्री होतात असे सांगून पृथ्वीच सूर्याभोवती फिरते. (पृष्ठ ५०) हा सिद्धान्त सामान्य जनांना पटण्यासाठी निरनिराळी उदाहरणे (पृष्ठ ५० ते ५८) देऊन ज्याला आपण गुरुत्वाकर्षण शक्ती म्हणतो तिचा उल्लेख ते विक्षेपशक्ती असा करतात.

पंधराव्या शतकापासून भौतिक सृष्टीचे संशोधन विशेष जोमाने होऊ लागले. परिणामी 'वायबल'मधील निसर्गविषयक कल्पनांबद्दल लोक शंका घेऊ लागले. त्यामुळे संतप्त धर्मगुरूंनी शास्त्रीय संशोधकांवर शस्त्र धरले. पृथ्वी हा साऱ्या विश्वाचा मध्य असून सूर्यासह सर्व सूर्यमाला पृथ्वीभोवती फिरते असे वायवलचे मत होते. परंतु कोपर्निकस याने सूर्य हा विश्वाचा मध्य

असून पृथ्वीसह सर्व सूर्यमाला त्याच्याभोवती फिरते हे सिद्ध केले. त्याच्यावर चर्च कौन्सिलची इतराजी झाली. पण कोपर्निकसपर्यंत त्यांचे 'इन्क्विझिशन' चे शस्त्र पोचू शकले नाही. त्यामुळे कोपर्निकस वाचला. पण पृथ्वी सूर्याभोवती फिरते असे सांगणाऱ्या ब्रूनोला चर्च कौन्सिलने जाळून ठार मारले. गॅलिलिओने पृथ्वी सूर्याभोवती फिरते असे मत मांडले. पुढे मृत्युदंडाच्या भीतीने त्याने चर्च कौन्सिलला हवे तसे आपले मत बदलले; तरीही त्याला तुरुंगवास भोगावा लागलाच. (पृष्ठ ६० ६१) आयझॅक न्यूटनने लावलेल्या शोधाचीही तत्कालिन समाजाने दखल घेतली नाही. याबद्दल खंत व्यक्त करताना एक दोहा उद्धृत केला आहे.

"हिरे की ये कोठडी बार बार मत खोल
जब हिरे पारखी तब हिरे का मोल."

समुद्रमार्गे जहाजावरून प्रवास करताना होकायंत्र, कंपास, नकाशा, गोलाच्या साह्याने दिशा समजून घेणे व त्याचा वापर करणे याबद्दलची माहितीही दिली आहे. (पृष्ठ ६३ ते ६७)

भूमी गोलाकार आकाशात निराधार दोरतीने सूर्याभोवती फिरती इजवर सभवताली समग्र सृष्टी आहे समुद्र एकच क्षार समुद्र आहे. तोही एक दक्षिण भागीच मेखलेप्रमाणे नाही. दोही भागी भलत्याच रीतीने आहे. वरकड समुद्र दिसत नाहीत. द्वीप एक जंबुद्वीपच प्रसिद्ध आहे. वरकर द्वीप नावानेही प्रसिद्ध नाही.... त्यातील लोकांची उपासना अग्निसूर्य वगैरे लिहिले ते लोकमात्र पारसी लोक अग्निउपासक, जैन लोक सूर्यउपासक असे कोणी दिसतात."

पृथ्वीवर ३ वाटे समुद्र खाटे देश असून युरुप', आशिया, आफ्रिका, अमेरिका यात उत्तरखंड दक्षिण खंड उमरूम मिळूनच आहे. न्यू होलांड असे पांच मोठे प्रस्थ आहेत. तसेच यातील काही प्रमुख देशांची नावेही नमूद केलेली आहेत.

अशा तऱ्हेने पृष्ठ १ ते ६८ पर्यंत भूगोल विषयाची माहिती दिलेली आहे. शेवटी सुबाजी बापू लिहितात. "पृथ्वीचे दक्षिणोत्तर दोहीकडे ८० अंशाचे पैलीवर सारे बरफच डोंगरासारिखा दिसला. परंतु तेथे कोणाची रीघच नाही. तेव्हा कसे कळेल. यास्तव त्याचा निर्णय होत नाही."

या पुस्तकात भूगोल विषयाची शास्त्रीय चर्चा लोकांच्या जुन्या समजुती कशा चुकीच्या आहेत ते दाखविले आहे तसेच अक्षांश, रेखांश, कालमानाची रीत, हिंदु मुस्लीम इंग्रजी वारांची व महिन्याची नावे, नक्षत्रमान, दृश्य सौरमान मध्यम सौरमान, चांद्रमान, पृथ्वीचा आकार आकर्षणशक्ती ध्रुवोत्सार प्रेरणा इ. विषयांची माहिती देऊन भास्कराचार्यांच्या सिद्धान्ताचा जागाजागी उल्लेख करून लोकांच्या जुन्या कल्पना नाहीशा करण्याचा सुबाजी बापूचा उद्देश आहे

खगोलविषयी विस्तारपूर्वक लिहित नाही याची स्वतः सुबाजी बापू तीन कारणे देतात

१) ग्रंथाचा विस्तार होईल तर कोणी पाहणार नाही.

२) इतर ग्रंथातील माहिती या ग्रंथात लिहिली तर मूळ ग्रंथ कोणीही पाहणार नाही.

३) दुसऱ्या लेखकाचा विषय स्वतःच्या नावे लिहिणे हेही उचित दिसत नाही.

सुबाजी बापूने ऑगस्ट १८३५ मध्ये धूमकेतू दिसल्याबद्दलची माहिती (पृष्ठ ७१) दिली आहे. त्याचा खगोलविषयक सिद्धान्त थोडक्यात त्याच्याच भाषेत पुढीलप्रमाणे :

भूमीवरते प्रथमचंद्र, त्यावर शुक्र, त्यावर मंगळ, त्यावर सारे ग्रह ४ वेस्ता सेरेज पल्लास जुनो. त्यावर बृहस्पती समागमे ७ चंद्रासहित आणि शनि लोकांस एक वेष्टन आहे. त्यावर हर्षेल समागम ६ चंद्रासहित, त्यावर बहुत दूर नक्षत्र कक्षा असे आहेत.

हा क्रम आपण पृथ्वीवर राहतो म्हणोन आपल्या पाहण्यांत सारे ग्रह एकाच राशीवर असताना असे दिसतील म्हणोन लिहिला परंतु यातही बुध , शुक्र हे दोन ग्रह सूर्याचे आणि पृथ्वीचे मध्ये राहणारे . ते कोण्यावेळेस सूर्याचे वरतेही राहतात तेव्हा पृथ्वीवर प्रथम चंद्र , त्यावर सूर्य , त्यावर शुक्र , त्यावर मंगळादि वरकड ग्रह पूर्वील क्रमाप्रमाणे असाही क्रम होईल . या अर्थी हा सर्व कालिक क्रम होत नाही . आता सार्वकालिक नियतक्रमही लिहितो . प्रथम मध्यकेंद्रस्थानी सूर्य , त्याजवळ कक्षा वुधाची , त्याचे पैलीवर शुक्रकक्षा , त्याचे पैलीवर पृथ्वी एका चंद्रासी सहित इ . चे पैलीवर मंगळ कक्षा . त्याचे पैलीवर वेस्ता , सेरेज , पल्लास , जुनो , त्याचे पैलीवर वृहस्पती , ४ चंद्रासहित , त्याचे पैलीवर शनी ७ चंद्रासहित , त्याचे पैलीवर हर्शल , ६ चंद्रासहित , त्याचे पैलीवर वहुत दूर नक्षत्र कक्षा असा सार्वकालिक क्रम आहे .

यांत सूर्य अचल आहे . आपल्या आसाभोवती मात्र फिरतो . वरकड ग्रह आणि पृथ्वी हे आपल्या आसाभोवती फिरत सूर्याभोवती आपले मंद शीघ्र गती करून फिरतात . चंद्र आपल्या आसाभोवती फिरत पृथ्वीभोवती फिरतो आणि पृथ्वी समागमे सूर्याभोवती फिरतो . तारे सूर्याप्रमाणेच अचल आहेत . ग्रहणाचे कारण सूर्य ग्रहणी छादक चंद्र चंद्रग्रहणी छादक भूछाया राहू कारण नाही . राहू म्हणजे सूर्यक्रांतिमंडल व चंद्रविमंडलाचा संपाता आहे . ग्रह नोहे . चंद्र मंडलात पितृ लोक लिहिता याचा निर्णय होऊ शकत नाही . मेरुस्थानी राहणाऱ्यांस सहा महिने उत्तरायण दिवस , सहा महिने दक्षिणायन रात्र असा दिवस होतो . वरकड सर्वत्र दिनमान गणिताने लिहिलेच आहे . ब्रह्मदिनमानही लिहिले आहे हा खगोलाचा सिद्धांत यथामती झाला . शुभं भवतु (पृष्ठ ८०-८१)

सवाई जयसिंहाच्या कारकीर्दीत जयपूर राज्याने साहित्य , कला , संस्कृतीत मोठी प्रगती केलेली होती . स्वतः जयसिंह संस्कृत आणि फारसी भाषेचा विद्वान होता . देशातील निरनिराळ्या भागातून त्याने आपल्या राज्यात विद्वानांना आमंत्रित करून उदार आश्रय दिलेला होता . गणित , ज्योतिष्य , विज्ञान विषयात सवाई जयसिंहास रस असल्याने त्याने इ .स . १७२५ मध्ये ग्रह नक्षत्रांची शुद्ध सारिणी वनवून त्यास तत्कालिन मोगल वादशहा " जीज मुहम्मदशाही " हे नाव दिले . तसेच " जयसिंह कारिका " हा ज्योतिष्यशास्त्रावरील ग्रंथ लिहिला .

प्रसिद्ध विद्वान रत्नाकर भट्ट पुण्डरिक हा सवाई जयसिंहाच्या दरवारात आश्रयार्थ होता . त्यानेच धर्मशास्त्रात प्रसिद्ध असलेल्या ' जयसिंह कल्पद्रुम ' या ग्रंथाची रचना केली . तसेच उज्जैन व काशी या ठिकाणी वेधशाळा (जंतरमंतर) निर्माण करून इतिहासात आपले नाव अजरामर केले . (पृष्ठ १०४).

वावा पदमनजींनी " ईश्वराने प्राण्यावर जी दया केली " ती सांगण्याच्या हेतूने अरुणोदय हे आत्मचरित्र लिहिले (१८८४) . ख्रिस्ती धर्मस्वीकाराने जो प्रकाश आपल्याला दिसला तो इतरांनाही दिसावा यासाठी स्वप्रवृत्तीचा वेध घेत स्वतःच्या आयुष्यातील स्थित्यंतर त्यांनी व्यक्त केले आहे . ते म्हणतात , " मी फलज्योतिषावर पूर्ण विश्वास ठेवीत असे तरी काही काळाने माळव्यातील सिंहोरनगरस्थ सुभाजी वापू यांनी केलेला एक छापील ग्रंथ माझ्या हाती आला . त्यांत भास्कराचार्य व कोपरनिकस यांच्या ज्योतिषाचा मेळ घालून दिला होता व पौराणिक ज्योतिष आणि शकुन मुहुर्त इ . चा युक्तीने व हिंदु धर्मग्रंथाच्या आधाराने खंडण केले होते , ते वाचून माझा विश्वास वराच ढळला आणि ग्रहादिकांचे भय माझ्या मनातून कमी कमी होत

A

**COMPARISON**

OF THE
POORANIC SIDHANTIC
AND
COPERNICAN SYSTEMS
OF THE WORLD
BY

**SOOBAJEE BAPOO,**

OF
SEHORE, NEAR BHOPAUL
IN
MALWA,

---

*Lithographed by R. Prera,*
BOMBAY,
1836.

गेले . त्यांत एक संस्कृत श्लोक होता तो आता सर्व मला आठवत नाही . परंतु त्याचा आरंभ असा होतो ' एका दशरथे गोविंदे शरण्ये भक्तवत्सले किंकुर्वत्तिग्रहाः सर्वे शनिरंगारको गुरुः ' (पृष्ठ १०२) म्हणजे अकरावे इंद्रियाचे ठायी (वेदान्त मताप्रमाणे अंतःकरण हे इंद्रिय आहे) ईश्वर असला तर शनि , मंगळ इत्यादि ग्रह काय करणार आहेत ? हा श्लोक मी पाठ करून वारंवार म्हणावा व दुसऱ्यांसही म्हणून दाखवावा . हे पुस्तक आता कोठे दृष्टीस पडत नाही . ते कोणापाशी असेल तर पुनः छापले असता फार उपयोगी पडण्याजोगे आहे ."

यावरूनही सुबाजी बापू यांच्या कामगिरीचे महत्त्व स्पष्ट होऊ शकेल . हा ग्रंथ तत्कालीन प्रबोधनाचाच एक अर्थपूर्ण आविष्कार होता . मात्र हा आविष्कार बहुतांशी दुर्लक्षित राहिला .

निबंधात आलेले पृष्ठ क्रमांक खालील पुस्तकातील आहेत .

A Comparison of the Pooranic Sidhantic and Copernican Systems of the World By Soobajee Bapoo of Sihore, Near Bhopaul In Malwa, Lithographed by R Prera, Bombay, 1836



(चंद्रकांत अभंग , इतिहास विभाग प्रमुख , के . जे . सोमैय्या महाविद्यालय , कोपरगाव)

# बी. रघुनाथ यांचे कांदबरी लेखन

## ऱ्हासशील संस्थानी समाजाच्या स्थितिगतीचे प्रत्ययकारी चित्रण

वसंत आबाजी डहाके

१९३६ ते १९५४ या काळात बी. रघुनाथ यांच्या सात कादंबऱ्या प्रकाशित झाल्या. विभावरी शिरूरकर(हिंदोळ्यावर, १९३४), साने गुरुजी (श्यामची आई, १९३५), विश्राम बेडेकर (रणांगण, १९३९), र. वा. दिघे (पाणकळा, १०४०), बा. सी. मर्ढेकर ( रात्रीचा दिवस, १९४२), श्री. रा. बिवलकर ( सुनीता, १९४८), श्री. ना. पेंडसे (एल्गार, १९४९), हे बी रघुनाथ यांचे समकालीन कांदबरीकार. या काळातल्या कादंबरीलेखनातून साधारणपणे तीन प्रवृत्ती दिसतात : (१) मध्यमवर्ग आणि इतर यांच्यापासून दूर असलेल्या ग्रामीण, प्रादेशिक, वन्य जीवनातील विविध सुखदुःखात्मक प्रसंगाचं आणि विविध वृत्तिप्रवृत्ती असलेल्या व्यक्तींचं व त्यांच्या भोवतीच्या परिस्थितीचं चित्रण करणं. (२) माणसाच्या अथांग मनाच्या तळाचा, भावना, कल्पना, विचार, विकार यांचा वेध घेणं. आणि (३)व्यापक राष्ट्रीय अथवा जागतिक घटनांच्या पार्श्वभूमीवर मानवी जीवनातील उलथापालथीचं चित्रण करणं.

याच काळात कादंवरीची भाषा, निवेदनाची शैली यातही बदल घडू लागलेला होता. भाषा रोजच्या जीवनातील बोलीसारखी असावी, पात्र आणि प्रसंगाला समर्पक अशी असावी याकडे लेखकाचं लक्ष गेलेलं होतं. मराठी कादंबरी मनोरंजनप्रधानता आणि तंत्रकुशलता यांच्या चौकटीतून बाहेर पडू पाहात होती.

कादंबरीलेखनातूनही एक वेगळी वाट शोधण्याची. बी. रघुनाथ यांचा प्रयत्न होता हे दिसून येतं. निजामी राजवटीखालच्या मराठवाड्यातील मध्ययुगीन, संस्थानी जीवनाचं चित्रण हे एकूणच त्यांच्या कथात्म साहित्याचं व्यवच्छेदक लक्षण आहे. फडके, खांडेकर, माडखोलकर आदी लेखकांनी निर्माण केलेल्या अनुरंजनशील घाटांना मोडून थेट वास्तववादी रूपबंधाची घडण करणं हे आव्हान या काळातल्या विविध कादंवरीकारांना स्वीकारावं लागलं. कादंवरीसारख्या व्यामिश्र, बहुपेडी भाषिक संरचनेची मुळं आपल्या आसपासच्या प्रत्यक्ष जीवनात आहेत हे भान त्या काळातल्या ज्या काही थोड्या कादंवरीकारांना आलेलं होतं, त्यापैकी बी. रघुनाथ हे एक होत. 'भोगलेल्या वास्तवाला' कादंबरीतून आकार देण्याचा गंभीर प्रयत्न त्यांनी केलेला होता असं दिसतं.

आजपासून पन्नासेक वर्षांपूर्वीच्या लेखनकर्तृत्वाचा विचार करताना तत्कालीन वाङ्मयीन परंपरा, वातावरण, वाङ्मयीन लेखनाच्या संदर्भातील ऐतिहासिक वस्तुस्थिती लक्षात घेणं आवश्यक ठरतं. विशेषतः वाङ्मयाच्या इतिहासकारांनी एखाद्या ओळीत अथवा

स्पष्ट अनुल्लेखात अशा लेखनकर्तृत्वाचं मूल्यमापन केलेलं असताना ही जबाबदारी अधिकच वाढते . अशा लेखनकर्तृत्वाची पुन:स्थापना करताना त्याची जमेची बाजू आणि मर्यादा या गोष्टीदेखील व्यवस्थित तपासल्या पाहिजेत .

बी . रघुनाथ यांच्या कादंबरीलेखनाचं स्वरूप स्पष्ट करणं हा प्रस्तुत निबंधाचा मुख्य विषय आहे . या विषयाचं विवरण करीत असताना जमेची बाजू आणि मर्यादा यांचाही येथे विचार करावयाचा आहे .

निजामी राजवटीखालच्या मराठवाड्यातील मध्ययुगीन , संस्थानी जीवनाचं चित्रण बी . रघुनाथ यांच्या कादंबऱ्यात झालेलं आहे असं आधी म्हटलेलं आहे . या चित्रणविषयाच्या विविध बाजू पाहिल्या पाहिजेत . संपूर्ण भारत पारतंत्र्यात असताना साहजिकच मराठवाडाही पारतंत्र्यात होता , असं वर्णन करता येत नाही . इंग्रजी राजवट आणि तिचे जनजीवनावरील परिणाम आणि निजामी राजवट व तिचे जनजीवनावरील परिणाम यात अंतर आहे .एका अर्थानं हे वर्तुळात वर्तुळ आहे आणि आतलं वर्तुळ हे आक्रसलेलं आणि आवळलेलं आहे . धर्मभेद हा या सत्ताकारणातला एक महत्त्वाचा घटक होय . एकीकडे संस्थानी वातावरणाच्या विविध पातळ्या इथं असताना कारकुनी करणाऱ्या मध्यमवर्गीय पांढरपेशा समाजाचाही उदय झालेला आहे . मध्ययुगीन लढायांऐवजी विज्ञाननिर्मित अस्त्रशस्त्रांचा वापर करणारं संहारक युद्ध बाहेर आहे आणि त्याचे परिणाम संस्थानी राजवटीखालच्या प्रजेलाही भोगावे लागणार आहेत . मराठवाड्याबाहेरच्या भारतात राजकीय-सामाजिक जागृतीच्या प्रयत्नांना वाढतं यश येत आहे , तर इथं ते प्रयत्न मुळातच खुडून टाकले जात आहेत . स्वतः बंद वर्तुळाचं एक उदाहरण म्हणून पोर्तुगीज अमलातील गोव्याचं उदाहरण घेतलं जाईल. परंतु इंग्रजी राज्याव्यतिरिक्तच्या या दोन 'राजवटी एवढंच साम्य त्यांच्यात दाखवता येईल. भांडवलशाहीचा विकास होत असलेल्या युरोपीय साम्राज्यवादी देशाचीच गोवा ही एक वसाहत होती . निजामी राजवट हा पूर्वकाळातील इस्लामी राजवटीचा एक अवशिष्ट भाग होता . दैनंदिन वास्तव म्हणून त्याची प्रकर्षानं जाणीव होत असली पाहिजे .

निरंकुश राजकीय सत्ता पोलिसी दंडुकेशाहीच्या रूपानं प्रत्यक्ष जीवनात वावरत असते . मध्ययुगीन , संस्थानी जीवनशैली भोगविलासाच्या कृत्यांतून प्रकट होत असते . या दोन्हींची गुंफण ' हिरवे गुलाब 'मध्ये झालेली आहे . अमीर आणि जानकीराम या दोन व्यक्तिरेखा आहेत, तशाच त्या दोन प्रवृत्तीही आहेत. या कादंबरीची निवेदनपद्धती टीकात्मक वास्तववादी पद्धतीची आहे .

या कादंबरीच्या सुरुवातीलाच पुढील वर्णन येतं : "वजीराबादच्या कोपऱ्यावरली ही आठ नऊ घरांची रांग फार प्रसिद्ध होती . या घरांच्या बाजूला एक खोलगट तळं होतं . त्याचं जुनं , सुटसुटीत , मराठी नाव बदलून "चष्मे-इ-हुस्न" (सौंदर्याचा झरा) असं नवीन नाव देण्यात आलं होतं . वाटेल ती घाण बुचकळून टाकल्यामुळे हा सौंदर्याचा झरा अतिशय गढूळ झाला होता . तरी या मलिनतेची कोणाला शिसारी येत नव्हती . गावातले काही सपक आणि शामळू समाजसुधारक मधून मधून घसा ताणून व्याख्यानं देत, प्रसिद्धी आणि फंडासाठी इकडं तिकडं फिरत. सुधारणेची भाषा करीत . पण ' सौंदर्याच्या झऱ्या 'वरला पिढ्यानुपिढ्या तुडविला जाणारा हा चिखल मात्र कुणाला दिसत नव्हता . "ही दोन्ही विधानं

राजकीय आणि सामाजिक दृष्टीतून वाचता येतात. मध्ययुगीन, संस्थानी जीवनाविषयीची ही रूपकात्मक विधानं आहेत असं म्हणता येतं. दुर्व्यसन आणि बाहेरख्यालीपणा यातून अनियंत्रित सत्ता व्यक्त होते, तर मूल्यहीनता, मूल्यऱ्हास त्याकडे दुर्लक्ष करण्यातून भ्रष्ट पोलिसखातं अशा समाजाचा - दुर्व्यसन आणि मूल्यऱ्हासयुक्त समाजाचा एक अपरिहार्य आविष्कार असतो. बलात्कार, जबरीनं उपभोग घेणं हे अरेरावी सत्तेनं निर्माण केलेलं एक रूपक होय.

या कादंबरीतील अमीर आणि जानकीराम हे दोन्ही पोलिस नैतिक दृष्टीनं भ्रष्ट आहेत. निव्वळ पाशवी पातळीवर ते स्त्रीदेहांचा उपभोग घेत असतात. तरीही त्या दोघांमध्ये काहीएक भिन्नता आहे. "जलद सुरीच्या सहाय्यानं बकऱ्यांच्या अन् कोंबड्यांच्या माना निर्विकारपणानं कापण्याचा सराव असलेले अमीरचे हात कसल्याही अघोर कृत्याला सहज सिद्ध होऊ शकत होते. नोकरीखातर संशयित गुन्हेगारांच्या पाठी फोडू पाहणारे जानकीरामाचे हात असहायितासाठी झटू शकत होते" अशा शब्दात हा फरक लेखकानं दाखवलेला आहे. ही कादंबरी म्हणजे दोन पोलिसांच्या वासनापूर्तीच्या खेळांची कहाणी असं रूप तिला येऊ शकलं असतं. परंतु वी. रघुनाथ येथे वास्तवाचे विविध पैलू लक्षात घेतात. वास्तव कधीही एकपदरी नसतं, याचं भान त्यांच्या या व इतरही कादंबऱ्यांतून दिसतं.

फातेमाच्या देहाच्या आकर्षणात गुरफटलेल्या जानकीरामाचं धर्मांतर हा या कादंबरीतला महत्त्वाचा भाग आहे. "या धर्मांतरानं त्याला नोकरीत बढती मिळणार होती. फातेमाशी सुखाचा संसार थाटून राहता येत होतं. धर्मांतर म्हणजे काही प्राणसंकट नव्हतं. उलट दुराचरणी माणसावर करण्यात येणारी ती सर्वात मोठी मेहेरबानी होती" अशा शब्दात त्याला धर्मांतराचं महत्त्व पटवून देण्यात आलं होतं. धर्मांतराच्या प्रक्रियेतून जातानाची मन:स्थिती वी. रघुनाथांनी संवेदनशीलतेनं टिपलेली आहे : "जानकीरामासंबंधी काहीतरी होत होतं. अन् ते तो निर्विकार मनानं पाहात होता." धर्मांतराची प्रक्रिया यांत्रिकपणे सुरू होती आणि त्यात जानकीराम नव्हता. इस्लाम किंवा हिंदू धर्माची तत्त्वं जानकीरामाला ठाऊक नव्हती. परंतु पिढ्यानुपिढ्या संस्कार झालेल्या त्याच्या मनाला आतून विकलता आलेली होती. लौकिक पातळीवर आपण जाईपासून, आपल्या म्हटलेल्या माणसांपासून दुरावतो आहोत" ही एवढी एकच जाणीव या विकलतेला कारण होती असं नव्हे. वी. रघुनाथांनी समर्पक शब्दात लिहिलेलं आहे : "त्याचं आत्मकुसुम शुष्क झालं होतं."

भौतिक, शारीरिक पातळीवर जगणाऱ्या जानकीरामाला नैतिक आणि आध्यात्मिक पेच पडलेला होता आणि या पेचातून सुटण्याइतकी क्षमता त्याच्यात नव्हती.

या कादंबरीतून व्यक्त होणारा धर्मविषयक विचार कुठल्याही धर्माच्या बाजूनं नाही की विरोधी नाही, मात्र तो धर्माच्या अनुयायांच्या आचारांची चिकित्सा करणारा आहे. विविध प्रकारचं आयुष्य जगलेल्या जानकीरामाची शेवटची ओळख काय आहे ? "कौन भाई ? किसका इन्तेकाल हुवा ?" या प्रश्नाचं उत्तर दिलं जातं : "जानी मिया. धरणगावच्या दंग्यात मारला गेलेला पोलिस !" सत्तर पानांच्या मर्यादेत सभोवतीच्या स्थितीचंच नव्हे तर त्या स्थितीत जगणाऱ्या माणसाचं आशयहीन आयुष्य वी. रघुनाथ प्रकट करतात. राजसत्ता आणि धर्मसत्ता यांच्या जखडून टाकणाऱ्या चौकटीत व्यक्तीच्या आयुष्याला आलेली क्षुद्रता

या कादंवरीत प्रभावीपणे व्यक्त झालेली आहे .

हिरवे गुलाव ही श्री रघुनाथ यांची वर्षाचशी यशस्वी कादंवरी आहे . या कादंवरीत पूर्ववर्ती कादंवरीकारांच्या स्वप्नशीलतेचा भेद करण्याचा प्रयत्न त्यांनी केलेला आहे .

या कादंवरीच्या निवेदनशैलीमुळे कृतक सहानुभूती अथवा पतितांविषयीचा काव्यात्म कळवळा टाळला आलेला आहे अर्थात खुद्द लेखक यथातथ्यवाद आणि वास्तववाद यांच्या संभ्रमातून नेहमीच बाहेर पडू शकला आहे असं नाही .

हिरवे गुलावमध्ये अमीर आणि जानकीराम ही जशी मित्रांची जोडी आहे , तशीच वावू दडके या कादंवरीत बाबू दडके आणि अजीजुद्दीन रफीक यांची आहे . अर्थात अमीर जानकीराम यांच्याहून वावू-अजीजुद्दीन यांचा वर्ग वेगळा आहे . वृत्ति-प्रवृत्ती निराळ्या आहेत . दोन भिन्न समाजाचे प्रतिनिधी म्हणून ही पात्रं येत असली तरी मैत्री हा या दोन्ही कादंवऱ्यांचा विषय नाही . दोन समाजात तेढ असते , तसेच त्यांच्यात काहीएक सामंजस्यही असू शकतं . शिवाय जिथं वर्षानुवर्षे दोन समाज एकमेकात मिसळले-घुसळले जातात तिथं वावू-अजीजुद्दीन , अमीर-जानकीराम अशा जोड्या असणं वास्तवाला धरूनच आहे .

या कादंवरीचं निवेदन आरंभी उपहासयुक्त शैलीत सुरू होतं . खडाळं नावाच्या एका सर्वसामान्य गावातल्या दैनंदिन जीवनव्यवहारासंवंधीचं हे निवेदन त्यातली सामान्यता , क्षुद्रता , तोचतोपणा , कंटाळा , स्वारस्यहीनता , चाकोरीबद्धता , निरर्थकता उघड करीत जातं . आपल्या आईवापांचा पत्ता नसलेला वावू त्या गावात येतो तो आपल्या आयुष्याला काहीएक आकार द्यावा या हेतूनं . खडाळ्यात जेवणाची आणि पुढच्या शिक्षणाची सोय होईल अशा प्रकारचं एक परिचयपत्र तेवढं त्याच्या खिशात होतं . वाकी ज्यानं मूळातच सगळं काही गमावलेलं आहे आणि आता गमावण्यासारखं ज्याच्याजवळ काही उरलेलं नाही अशातला वावू एक होता . पुढं त्यानं न केलेल्या चोरीवद्दल त्याला शिक्षा होते , न केलेल्या अनैतिक कृत्यांवद्दल लोक त्याला दूषणं देतात तेव्हा त्याला यातना होतात . वावूनं खडाळ्यात काहीतरी मिळवलेलं असतं आणि ते त्याच्याकडून हिरावून घेतलं जातं . वावूनं पराभूत होऊन खचून जाणं शक्य होतं . परंतु वावू त्यातून उठतो आणि आपल्या क्षुद्र , अनौरस आयुष्याला एक विशाल परिमाण मिळवून देतो . मात्र या कादंवरीत वास्तवाच्या विविध पैलूंचं सूचन होत असलं तरी त्यांचा विकास किंवा विस्तार होत नाही , कादंवरी एकारलेलीच राहते तिचं कादंवरीतही रूपांतर होत नाही , ती एक दीर्घकथा बनते . बाबूला अपेक्षित काय होतं आणि त्याच्या वाट्याला काय येतं यातल्या विपरीततेनं वाचक वेचैन झाला असता . परं , कथानिवेदनात दोन अतिशय कच्चे दुवे राहून गेलेले आहेत . बेबीनं त्याच्याकडून प्रेमपत्र लि[illegible]न घेणं आणि श्यामनं चोरलेलं नोटांचं पुडकं वावूच्या खिशात कोंवणं या दोन गोष्टींमुळे [illegible] एक दुर्वर्तनी . दुःशील विद्यार्थी म्हणून ओळखला जातो आणि त्याचं पुढलं सगळं आयुष्य उद्ध्वस्त होऊन जातं त्यातून तो सावरतो तो नर्सनं दाखवलेल्या जिव्हाळ्यामुळे आणि अजीजनं जुलमी सत्तेविरुद्ध पुकारलेल्या लढ्यामुळे .

या कादंवरीचा जीव लहान आहे . तिला विविध परिमाणं प्राप्त होत नाहीत हे खरं आहे मात्र निवेदनातल्या काही जागा अशा आहेत की लेखक काळाच्या चौकटीबाहेर पडू पाहात आहे याची तीव्र जाणीव व्हावी . विशेषतः वावूचे ' वार ' ज्या कुटुंबांकडे लावलेले होत त्या

कुटुंबांचं वर्णन. मात्र ही कुटुंबं बाबूच्या कहाणीबाहेर राहून जातात.

मध्ययुगीन, संस्थानी जीवनचित्रणाचा एक अविभाज्य भाग म्हणजे स्त्री-पुरुषसंबंधाचं आणि विवाहसंस्थेचं चित्रण. 'हिरवे गुलाब'मध्ये लेखकानं लिहिलेलं आहे : "वासनेच्या पूर्तीसाठी विवाहसंस्थेसारखी आकर्षक नावाची, जन्मभर टिकणारी, थोडासा बिघाड झाल्यास पुन्हा दुरुस्त करता येणारी हक्काची अन् स्वतंत्र सोय असताना लोकांनी आडवळणाच्या या घराच्या पायऱ्या झिजवाव्या हे आश्चर्य होतं! वासनांचं स्वैर कौतुक करून घ्यावयाची तेथल्या रसिकांची जबरदस्त लालसा असावी. पण स्वैर कौतुकापर्यंत येऊन ठेपणारी ही वासना विकृत करण्याचा दोष विवाहसंस्थेत, सामाजिक जीवनात, जन्मजात संस्कारात की आणखी कशात होता?" बाबू दडके चे बार असलेल्या कुटुंबांच्या चित्रणातही या वाक्यांचे प्रतिध्वनी आढळतात. स्त्री ही उपभोगाची एक वस्तू आहे अशीच या समाजाची धारणा असावी. या चित्राला छेद देणाऱ्या काही स्त्री-प्रतिमा बी. रघुनाथांनी निर्माण केलेल्या आहेत. जाई (हिरवे गुलाब), आकाशी (बाबू दडके), नीला (उत्पात), नगीना (म्हणे लढाई संपली), शीतला (जगाला कळलं पाहिजे), वहिनी (आडगावचे चौधरी) या स्त्रिया मूल्यभ्रष्ट व्यवस्थेतही स्वत्व जपून आहेत. त्यातल्या नीला, नगीना यांना तडजोडी कराव्या लागतात. जाई, वहिनी यासारख्या स्त्रियांना सभोवतीच्या स्थितीचा भेद करता येत नाही. वासनेच्या आणि जातीय विद्वेषाच्या ज्वाळात शीतला बळी जाते. धर्मभावना आणि माणसांचं जगणं यांचा किती गुंतागुंतीचा संबंध असतो हेही बी. रघुनाथ यांनी दाखवलेलं आहे. फातेमा-जानकीराम ही अशा संबंधाची एक पातळी तर 'जगाला कळलं पाहिजे'मधील नाईक आणि बाई ही दुसरी पातळी. किंबहुना नाईक-बाई यांच्यातलं नातं या विविध कादंबऱ्यांतील विविध स्त्री-पुरुषसंबंधांहून निराळं उपटून पडतं. सत्तासंघर्षाचं एक रूप म्हणजे जेत्यांनी जितांच्या स्त्रिया पळवायच्या, सूड म्हणून जितांनी जेत्यांच्या स्त्रिया पळवायच्या. स्त्री ही एक वस्तू आहे हीच या मागची जाणीव. नाईक-बाईसंबंधात स्त्री ही एक व्यक्ती आहे याचं भान दिसतं. नाईक-बाई यांचं परस्परांवर गाढ प्रेम होतं, पण लौकिक बंधनांनी जखडलेल्या जीवनात या प्रेमाचा उघड आविष्कार अशक्य होता. हिंदुहितासाठी झगडणाऱ्या नाईकांनी मुस्लिम स्त्री बाळगावी, शीतला हे त्या स्त्रीपासून झालेलं अपत्य आहे हे दडवून ठेवायला लागावं हे व्यक्तींच्या मनांना लोकाचार, धर्माधर्म, लौकिक यांच्या नावाखाली दडपून टाकणाऱ्या समाजस्थितीतच शक्य आहे.

'जगाला कळलं पाहिजे' या कादंबरीत दोन जमातींमधील धार्मिक ताणतणावांचं चित्रण मुख्यतः आलेलं आहे. बॅरिस्टर नाईक ही या कादंबरीतली मध्यवर्ती व्यक्तिरेखा. लेखक नाईकांची व्यक्तिरेखा स्पष्ट करीत असताना वरसंगा नावाच्या गावातील लोकांची मानसिकताही स्पष्ट करतो. नाईक गीताभवन बांधायचं ठरवतात, त्यावेळी त्यांच्या घरामागची मशीद लोकांना दिसणार नाही या मुद्द्यावरून दंगल पेटण्याची वेळ येते, कोर्टात खटला चालतो. तिसऱ्या मजल्याचं काम तहकूब करावं असं ज्यांना वाटतं ते सत्तेचं साहाय्य घेतात. अखेर नाईक जिंकतात. त्याचवेळी स्वतःबद्दलच्या इतरांच्या मनातल्या द्वेषाला पीळ भरलेला असतो एक व्यक्ती. त्या व्यक्तीनं घर बांधणं इतकं हे साधं राहत नाही. नाईक दुसरा पीळ भरतात ते त्यांचे हाडवैरी डी. हनुमंतराव यांच्या विरुद्ध निवडणूक लढवून

या डी. हनुमंतरावांची गणना "अधिकाऱ्यांच्या सख्यत्वानं स्वजातियांची गळचेपी करून आपल्या अधिकाराचा आणि मानमरातबाचा सदुपयोग अन्यत्र जमातीला मुक्तपणानं करू देणाऱ्या स्वाभिमानशून्य "पुढाऱ्यांत होते. डी. हनुमंतराव आडवाट शोधून निवडणूक जिंकतात. निवडणुकीतील या पराभवानं नाईकांमध्ये मात्र आमूलाग्र बदल होतो. ते खऱ्या अर्थानं लोकांचं नेतृत्व करू लागतात. लोकांनाही त्यांचा आधार वाटू लागतो. परधर्मीयांची मनं एखादवेळी जिंकू शकतात, परंतु स्वधर्मीय त्यांच्या वाईटावर टपलेले असतात. "भिन्न धर्मांचे दोन ज्वलंत पुढारी हातात हात घालून" चालत असतात, तर दुसरीकडे नाईक आणि डी. हनुमंत यांच्यातून विस्तव जास्त नाही. पुढं ज्या मुस्लीम पुढाऱ्याच्या हातात हात घालून नाईक चालले त्याच पुढाऱ्याचा मुलगा नाईकांवर प्राणघातक हल्ला करतो. नाईकांचा त्यात अंत होतो. नाईकांना आपला आदर्श मानणारा शालीन "नाईकांच्या अंताचा सूड" घेण्याची भाषा बोलतो. दंग्यात शालीनचं घर जळालेलं असतं आणि त्यात त्याची आजारी आई जळून खाक झालेली असते. पुढे शालीननं ज्या धर्मपुरीला आग लावण्याची योजना आखलेली असते, त्या आगीत त्याची प्रेयसी शीतल नष्ट होते. दोन्ही जमातीत पेटलेल्या सूडाच्या आंधळ्या द्वेषाच्या थैमानात माणुसकी नष्ट होते, याची खंत करणाऱ्या कुलकर्ण्यांच्या शब्दांना काहीही अर्थ उरत नाही.

बी. रघुनाथ यांच्या कादंबरीत धर्मविषयक एक उदार दृष्टिकोण सतत व्यक्त झालेला आहे. 'जगाला कळलं पाहिजे'मध्ये कुळकर्णी म्हणतात, "इस्लामीयत्व किंवा हिंदुत्व ह्याच सर्वोत्कृष्ट गोष्टी नाहीत. ज्याच्याबद्दल अभिमान बाळगायला पाहिजे तो माणूसधर्म प्रसृत करण्यासाठी लक्षावधी सुधर्माश्रम स्थापन करणंच योग्य होईल ... स्नेहलतेनं, सांस्कृतिक मिश्रणानं उदयाची जी संस्कृती निर्माण होईल ती बाह्यतः धर्महीन असली तरी मानवधर्मावरच जगेल आणि वाढेल!"

कुलकर्ण्यांचं हे बोलणं म्हणजे निव्वळ शब्दच्छल नव्हता. नाईकांच्या जीवनात असा समन्वय झालेला होता. शेरखानच्या मुलानं ते समजून घेतलं नाही आणि शालीनलाही ते उमगलं नाही.

याच कादंबरीत मनस्वी अशा मास्तरांची व्यक्तिरेखा आहे. अराजकी चळवळीत तुरुंगात जाऊन आलेले. विफलतेनं ग्रस्त असलेले मास्तर शालीनचे वडील आहेत. हट्टी, हेकेखोर म्हणून ओळखले जाणारे मास्तर निःसंग आहेत. फटकळ आहेत. अन्याय करणाऱ्यांविषयी आणि तो सहन करणाऱ्यांविषयी त्यांच्या मनात तिरस्कार आहे. समोरच्या काळाशी त्यांचं जुळत नाही.

धार्मिक झुंडशाही आणि राजकीय सत्तेचं प्रतिनिधित्व करणारी पोलिसी दंडुकेशाही यांनी हातमिळवणी केली की कुणाचीही सुटका होत नसते. निरपराध जीवांचे बळी घेऊन घरादारांची राखरांगोळी करून दहशत निर्माण करायची, विरोधाचा आवाजच ठेचून टाकायची ही रीत अन्यायग्रस्तांच्या मनात सूडाची भावना पेटवते. दोन्ही पक्ष पुरते नेस्तनाबूत होईपर्यंत ही झुंज चालू राहू शकते. यात भाजून, भरडून निघतात ती सर्वसामान्य माणसं, मग ती कुठल्याही जमातीची असोत, मलं होतं ते केवळ राजकीय सत्तेचं, मग तिचा स्वघोषित धर्म कोणताही असो. अर्थात हे 'जगाला कळलं पाहिजे!'

'म्हणे लढाई संपली आहे'च्या शेवटी बी. रघुनाथ यांनी लिहिलं आहे : " . . या आपत्तीबद्दल आता वाईट वाटून घेण्यात काहीच अर्थ नव्हता. पिचलेल्या न खचलेल्यासाठी अनुकूल परिस्थिती टप्प्याटप्प्यानं पुढं येते आहे, असं ही आपत्ती सांगते आहे! लढाईनं आणखी एक गोष्ट सिद्ध केली आहे, चिरडलेले उत्थापित होऊ शकतात न् जगाला हलवू शकतात!" या वाक्यातील आशय प्रतिध्वनित करणारी वाक्यं 'जगाला कळलं पाहिजे' यातही येतात : "बंधनांना आपण ईश्वरी दंडक समजून ती करतील तशी जीवनाची वाताहत होऊ द्यावयाची अन् सहन करावयाची अशी दलित भावना आपण आता सोडली पाहिजे. अन्याय आणि जुलमाला वाचा फोडण्याचे 'गुन्हे' केले पाहिजेत."

राजसत्ता, धर्मसत्ता आणि अर्थसत्ता सर्वसामान्य प्रजेची कशी पिळवणूक करतात याचं चित्रण बी. रघुनाथांनी केलेलं आहे. जागतिक युद्धाचे सर्वसामान्य माणसाच्या दैनंदिन जगण्यावर होणारे परिणाम त्यांनी 'म्हणे लढाई संपली' या कादंबरीत दाखविले आहेत. कादंबरी हा शब्द इथं वापरलेला असला तरी २४/२५ पानांचं हे लेखन कादंबरीरूप होऊ शकलेलं नाही. तीन सुटी प्रकरणं एकापुढं एक अशी ठेवलेली आहेत. पहिल्या भागात गरीब, कष्टकरी वर्गाचं जीवन, दुसऱ्या भागात सरकारी आणि सावकारी जुलूम आणि तिसऱ्या भागात हताश सामान्यांचं स्वगत. हा तिसरा भाग एक स्वतंत्र तुकडा म्हणून विलक्षण आशयसंपन्न आहे. विसाव्या शतकातील सामान्यांचं स्वगत म्हणून.

'आडगावचे चौधरी'मध्ये चौधरी घराण्याच्या अनेक पिढ्या आहेत. जुलमी, क्रूर, भ्रष्ट, संपत्तीची अनिवार लालसा असलेले, ऐषारामाची आवड असलेले, जहागिरीवर जगणारे, वाटेल त्या हिकमती लढवून संपत्ती घशात घालणारे चौधरी, त्यांचं घराणं आणि त्याचं सर्व पातळ्यांवर होणारं पतन याचं या कादंबरीत चित्र रेखाटलेलं आहे. मध्ययुगीन, संस्थानी जीवनाची अखेर दाखवत असताना पुष्कळदा लेखक गतकाळाविषयीची सुप्त ओढ प्रकट करतो, तशी या कादंबरीत प्रकट झालेली नाही. 'आडगावचे चौधरी'मध्ये एका मोठ्या जुलमी, भ्रष्ट राजवटीचंच छोटं रूप व्यक्त झालेलं आहे. अशा आडगावच्या चौधऱ्यांना जन्म देणारी मोठी राजवटच आता पोखरून गेलेली आहे, आणि कोणत्याही क्षणी कोसळणार आहे अशा स्थितीत शेवटचे चौधरी जेव्हा गावात प्रवेश करतात तेव्हा तिथं कुणीही नसतं. "ज्या लोकांच्या डोक्यावर चौधरी पाय देऊन नाचू इच्छित होते ते लोकच गावातून नाहीसे झाले होते. चौधऱ्यांच्या मुक्त संचारासाठी त्यांनी सगळं गाव रिकामं केलं होतं न् मोकळं सोडलं होतं!"

अनिर्बंध सत्ता, संपत्तिलालसा माणसाला अनिर्बंध भ्रष्ट करीत जाते. 'आडगावचे चौधरी' मध्ये मध्ययुगीन 'वाडा-सत्ते'चं समग्र रूप स्पष्ट झालेलं आहे. मुख्य राजकीय सत्तेचं 'वाडा-सत्ता' हे लघुरूप असलं तरी प्रत्यक्षात मुख्य राजकीय सत्तेऐवजी सर्वसामान्यांना ही 'वाडा-सत्ता'च प्रत्ययाला येत असते. वरवर पाहता लोकांचं भलं करण्याकडे कल दिसला तरी तो निव्वळ देखावा असतो. जनतेची लूटमार नि पिळवणूक हेच वाडा-सत्तेचं मुख्य वैशिष्ट्य. दगडमातींनी बनलेली गढी किंवा वाडा अवतीभवतीच्या गावकऱ्यांसाठी रोज प्रत्ययाला येणारी निर्दय, निरंकुश सत्ता असते. दहशतीच्या मार्गानं वचक कायम ठेवला जात असतो. ही वाडा-सत्ता बाहेरच्या परिस्थितीत बदल झाल्यामुळे

कोसळते , तर्शाच ती आतूनही पोखरली गेलेली असते . एक चौधरी धनाच्या लालसेनं सबंध वाडा खणून काढतात . संपत्ती हाती लागत नाही . पुढं पुढं त्यांना भ्रम होतो . वाड्याच्या भिंती पाडून टाकाव्या , कारण भिंतीतच ते धन लपविलेलं आहे अशी त्यांची खात्री होते मरणाच्या दारी पोचण्यापूर्वी हे भाऊसाहेब कुदळ घेऊन भिंती खणायला निघतात . मृत्यू त्यांची आणि वाड्याची सुटका करतो . या वाड्यात अडकलेले रॉजाभाऊ देसाई हे खिन्न करणारं पात्र आहे . नानासाहेव चौधऱ्यांनी त्यांना बंदिस्त करून वाड्यात ठेवलं होतं . ते चौधरींचे जामात . त्यांच्या संपत्तीवर चौधरींचा डोळा होता . पायाला जडलेल्या रोगामुळे राजाभाऊ काही हालचाल करू शकत नसतात . सगळं सोनं-नाणं हाती आल्यावर चौधरी राजाभाऊंकडे दुर्लक्ष करतात . "एखाद्या अर्धमेल्या उंदराची शक्ती घेऊन राजाभाऊ जगण्याची धडपड करीत होते" असं वर्णन बी . रघुनाथांनी केलेलं आहे . खिडकीतून खाली पडून राजाभाऊंची अखेर होते . चौधऱ्यांची दुसरी मुलगी झुरून , खंगून मरण पावते 'आडगावचे चौधरी ' ही कादंबरी म्हणजे एखाद्या चित्रपटाच्या पटकथेची शक्यता असलेला पहिला खर्डा आहे .

चौधऱ्यांच्या वाड्यातल्या अंधारात कवडशासारखी वहिनींची व्यक्तिरेखा आहे . परंतु 'वाडा-सत्ते 'त स्त्रीला भोगवस्तूखेरीज अन्य काही महत्त्व नाही . वाडा आणि वहिनी यांची विविध रूपं नंतर मराठी कादंवरीत आढळतात . शेवटच्या पिढ्यांतले चौधरी काळ बदलत चाललेला आहे हे लक्षात घेत नाहीत . अमर्याद अधिकाराच्या नशेत असलेल्या रावसाहेव चौधऱ्यांची हत्या होते आणि विटंबना होऊ नये म्हणून वहिनी आत्महत्या करतात . ही कादंबरी वाचत असताना ' निशांत ' या चित्रपटाची आठवण झाली . या कादंवरीतले शेवटचे चौधरी जप्त झालेली जहागीर खटपट करून मिळवतात , परंतु गावकरी दुष्काळामुळे गाव सोडून गेलेले असतात . चौधरींच्या वाड्यात एका वृद्धेच्या सांगाड्याखेरीज काहीही नसतं . हा वाडा खणून काढला तर त्याच्या पायात दडपलेले , भिंतीत चिणलेले शेकडो सांगाडे सापडतील . ' आडगावचे चौधरी ' या कादंवरीत विविध व्यक्तिरेखा आहेत , परंतु त्यातील मध्यवर्ती व्यक्तिरेखा ' वरवाडा ' हीच आहे . या वाड्याचा , एका जीवनपद्धतीचा उदय आणि अस्त यांची कहाणी या कादंवरीत सांगितली आहे .

बी . रघुनाथ यांच्या " ओ ऽ " या कादंबरीचा आतापर्यंत विचार केलेला नाही . ती पत्रात्मक आहे हे तिचं एक वैशिष्ट्य आहे . मात्र तिच्यावर फडके-खांडेकर-माडखोलकरकालीन कादंवरीलेखनाचा दाट ठसा उमटलेला आहे . बी . रघुनाथांचं पृथागात्म कादंवरीलेखन ' हिरवे गुलाब ' पासून सुरू होतं , असं माझं मत आहे .

बी . रघुनाथ यांचं कादंवरीलेखन हा मराठी कादंबरीलेखनाच्या विकासातला एक महत्त्वाचा टप्पा आहे . त्यांच्या लेखनाचं मूल्यमापन त्यांच्या काळात किंवा नंतरच्या नजिकच्या काळात झालं असतं तर समाजचित्रणाचं एक वेगळं भान मराठी कादंवरीकारांना आल असतं .

एक कादंवरीकार म्हणून बी . रघुनाथ यांचं मूल्यमापन केल्यास त्यांना फारसं यश मिळालेलं नाही असं म्हणता येईल . त्यांचं लेखन बरंचसं विस्कळित , त्रुटित आहे . कथानकाचा विस्तार किंवा विकास त्यांना साधलेला नाही . वास्तवाच्या विविध पैलूंचं ते केवळ

सूचन करतात. निवेदन एकारलेलं राहतं. व्यक्तिरेखांच्या सर्व कडा स्पष्ट करीत नाहीत असे दोष दाखविता येतात. मात्र त्यांनी नवी कादंबरी घडविण्याचे प्रयत्न केले हे नाकारता येत नाही. आपल्या अवतीभवतीच्या वास्तवाचं भाषेत रूपांतर करणं हे त्यांचं साध्य होतं. १९४३ ते १९५३ या काळात त्यांनी या दिशेनं पावलं टाकली हे महत्त्वाचं आहे. भिन्न धर्मीयांची सत्ता, सरंजामशाही, धर्मद्वेष, राजकीय, सामाजिक, आर्थिक असुरक्षिततेत जगणारी प्रजा, साम्राज्यवादी देशांनी लादलेल्या युद्धात होरपळलेली सामान्य जनता, स्वातंत्र्याची आकांक्षा, आपलं स्वत्व टिकविण्याची धडपड करणारी माणसं, अनियंत्रित भोगलालसा अशा विविध पैलूंसह जे जनजीवन त्यांनी रेखाटलं आहे- त्यातून त्यांचा एक कादंबरीकार म्हणून पैस केवढा मोठा होता हे कळतं. सबंध चित्रफलक अर्थपूर्ण तपशिलांनी त्यांना भरता आलेला नाही, काही जागा मोकळ्याच राहून गेलेल्या आहेत हेही खरं. तथापि 'हिरवे गुलाब', 'जगाला कळलं पाहिजे', 'आडगावचे चौधरी' या त्यांच्या तीन कृतींमधून एक कादंबरीकार म्हणून त्यांचं वेगळेपण पुरेसं स्पष्ट झालेलं आहे. एका ऱ्हासशील समाजाच्या स्थितिगतीचं प्रत्ययकारी चित्रण म्हणून बी. रघुनाथ यांचं कादंबरीलेखन अभ्यसनीय ठरेल यात शंका नाही.

☆ ☆ ☆

## सामार पोच

★ आजोबांची कविता : श. श्री. नाशीकर, वाग्विलास प्रकाशन, औरंगाबाद पृष्ठे ५०. ऐक्याऐंशी रुपये.

★ वृद्धांसाठी निवडीचा हक्क : विनायक राजाराम लिमये. उन्मेष प्रकाशन, पुणे पृष्ठे १४२. सत्तर रुपये.

★ अस्त अस्मितेचा : सुरेश त्र्यंबक पाठक. अश्वमेध प्रकाशन, डोंबिविली. पृष्ठे २२५. एकशे पन्नास रुपये.

★ चतुरंग : दिलीप पुरुषोत्तम चित्रे, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई ३५. पृष्ठे १६४ एकशे पंचवीस रुपये.

★ पोर्ट्रेटस् ऑफ शरद दांडेकर : कॅम्लिन, अंधेरी ५९. पृष्ठे १२८. साठ रुपये

★ भारतीय स्वातंत्र्य संग्राम : पां. र. अंबिके. पुणे विद्यार्थी गृह, प्रकाशन. पृष्ठे ४४८. दीडशे रुपये.

**कुलस्वामिनी प्रकाशन, डोंबिवली.**

★ कर्तृत्ववान पोलिस अधिकारी : अरुण हरकारे. पृष्ठे ३४०. दोनशे रुपये.

**मीनल प्रकाशन, कोल्हापूर**

★ बुध्दिबळ : हेमंत देशमुख. पृष्ठे १२१. साठ रुपये.

★ ऑलिंपिक : शरद भाटे. पृष्ठे ६६. पंचवीस रुपये.

★ गोळाफेक : शरद भाटे. पृष्ठे ४७. वीस रुपये.

★ शाळेचे दिवस : मोहन जोशी. पृष्ठे ७०. पंचवीस रुपये.

★ गोष्ट खानसाहेबांची : मोहन जोशी. पृष्ठे २३. आठ रुपये.

# बी. रघुनाथांची कविता

## शृंगार, प्रणय, सौंदर्य, सामाजिक जाणीव हा स्थायी भाव

चंद्रकांत पाटील

बी. रघुनाथांच्या कवितेचा विचार करण्यासाठी त्यांचा काल व त्यांचे व्यक्तिमत्त्व याविषयीची माहिती करून घेणे आवश्यक ठरते.

बी. रघुनाथांचा जन्म १९१३ मध्ये झाला. त्यांचे बालपण सातोना या गावी गेले आणि नंतर विद्यालयीन शिक्षण हैद्राबाद येथे झाले. १९३० साली ते मॅट्रिक झाले. त्याच सुमारास त्यांचे लेखनही सुरू झाले असावे. वयाच्या १९व्या वर्षापासून ते पुढे १९५३ पर्यंत म्हणजे वयाच्या चाळीसाव्या वर्षापर्यंत ते नोकरी करीत होते. त्यांचे अकाली निधन झाले, तरीही या काळात त्यांनी लिहिलेले वाङ्मय तुलनेने विपुल आणि विविधांगी आहे.

बी. रघुनाथ ज्या काळात लिहीत होते तो काळ ऐन निझामी राजवटीचा असल्यामुळे मराठीत साहित्यनिर्मिती करण्यासाठी फारसा अनुकूल नव्हता. उर्दू ही राजभाषा होती आणि उर्दूचाच प्रभाव दैनंदिन जीवनातील घडामोडींवर व बोलीभाषेवर अधिक होता. बी. रघुनाथांचा निझामी राजवटीकडे बघण्याचा दृष्टिकोण हा त्या काळातील सर्वसामान्य माणसांप्रमाणे द्वैतबंधात्मक असावा. मुळात प्रचंड विरोधी दृष्टिकोण असणं, आणि तो उघड उघड व्यक्त न करता सूचकपणे, व्यवस्थेला फारसा प्रखर हादरा न देता व्यक्त करणं अशी ही अवस्था असावी, असे त्यांच्या साहित्यावरून अनुमान काढता येऊ शकेल. बी. रघुनाथांच्या सर्जनशील कालखंडाचा विचार करता त्या काळातील सामाजिक स्थिती स्थितिशील, आणि परंपरेत घट्ट रुतून बसलेली होती. धर्मसंघर्षाच्या या काळात समाज दुसऱ्या संस्कृतीच्या वर्चस्वापासून स्वसंरक्षण करण्यासाठी अधिकाधिक परंपरांनी व रुढींनी ग्रस्त असणे स्वाभाविक आहे. अशा वातावरणात व्यक्तीच्या स्वातंत्र्य कक्षेचर आणि व्यक्तीच्या संपूर्ण मनोव्यापारावर विलक्षण दबाव असणेही सहजच आहे. बी. रघुनाथांसारख्या अत्यंत संवेदनशील व्यक्तीला याही गुंतवळयातून रस्ता काढणे आवश्यकच होते.

राजकीय-सामाजिकदृष्ट्या अयोग्य आणि विरोधी वातावरणात सांस्कृतिक संपन्नता असणेही अवघडच आहे. त्याकाळी ज्या पद्धतीचे साहित्य लिहिले जात होते, त्यापेक्षा त्या अगोदरच्या रुढ व सहजपणे उपलब्ध होणाऱ्या साहित्याचाच बी. रघुनाथांवर अधिक प्रभाव असण्याची शक्यता आहे. हैद्राबादेतील वास्तव्याचा त्यांचा विद्यालयीन शिक्षणाचा कालखंड वगळता त्याकाळी महाराष्ट्रात निर्माण होणाऱ्या समकालीन साहित्याशी परिचित होण्यासाठी देखील त्यांना बराच संघर्ष करावा लागला असेल. बी. रघुनाथ परभणीतल्या सांस्कृतिक



अनुक्रमणिका

जीवनात बरेच रूतलेले होते असे दिसते. गीतरचना आणि नाटक या दोन सांस्कृतिक अंगांशी बी. रघुनाथांची बरीच सलगी होती असे त्यांच्या समकालिनांकडून नमूद करण्यात आलेले आहे. या प्रकारच्या सांस्कृतिक जडणघडणीचा बी. रघुनाथांच्या साहित्यावर परिणाम झालेला असणारच, असेही अनुमान काढता येऊ शकते.

बी. रघुनाथांचे व्यक्तिमत्त्व कसे असावे याविषयीची माहिती उपलब्ध आहे. बी. रघुनाथांच्या मानसिक जडणघडणीत सुरुवातीच्या खेड्यातल्या सुखद आठवणींनंतर हैद्राबादसारख्या 'महानगरातले' संस्कार, आणि मग उरलेल्या आयुष्यावरील प्रतिकूल आर्थिक - सांस्कृतिक - राजकीय परिस्थितीची गडद छाया सरमिसळलेली होती. अशा प्रतिकूल परिस्थितीत त्यांनी सर्जन केलेले आहे, ही गोष्ट मध्यवर्ती संदर्भासारखी सतत लक्षात ठेवणे आवश्यक आहे. या पार्श्वभूमीवर बी. रघुनाथांच्या कवितेचा विचार करावा लागेल आणि त्यांच्या समीक्षकांनीही तसा विचार केला असल्याचे दिसते.

बी. रघुनाथांनी सुमारे १५० कविता लिहिल्या आहेत, असे प्रस्तावनेत म्हटले आहे. प्रत्यक्षात पहिल्या खंडात फक्त १०९ च कविता आहेत. खुद्द बी. रघुनाथांनी ३-२-४९ रोजी भगवंतराव देशमुखांना लिहिलेल्या पत्रात त्यांना आवडणाऱ्या ज्या कवितांचा उल्लेख केलेला आहे, त्यात 'शापित सूर हे', 'राहुटी' यांची नावे आहेत. पण या कविता संग्रहात कोठेच नाहीत. याचा अर्थ आणखी सुमारे ३०-४० कविता तरी कुठेतरी असायला हव्यात. अर्थात या १०९ कवितांवरूनही बी. रघुनाथांच्या कवितेचा विचार होऊ शकतो.

बी. रघुनाथांच्या कविता या वयाच्या १६-१७ वर्षापासून ते ४० वर्षापर्यंतच्या कालखंडातील आहेत. बी. रघुनाथांची कविता पूर्वसुरींच्या कवितांनी संस्कारित झालेली आहे. याच्या खाणाखुणा संग्रहात विखुरलेल्या आहेत. साधारणतः ज्या कवींचा त्यांच्यावर परिणाम आहे त्यात गोविंदाग्रज, बालकवी यांच्या सोबतच कुसुमाग्रज, वा. भ. बोरकर, यशवंत, ना. घ. देशपांडे, वि. स. खांडेकर, गिरीश यांचीही नावे घेता येतील. 'अन्तराचे फाये' या कवितेवरून वा. रा. कान्त यांच्या एका गाजलेल्या कवितेची आठवण येते. प्रभावित होणे, आणि प्रभाव पचवून पुढे जाणे या सर्जनशील साहित्यातील अत्यंत सामान्य गोष्टी आहेत; आपल्याकडे मात्र प्रभावित होणे ही गोष्ट वर्तमानपत्री स्तरावर चर्चिण्याची बाब समजली जाते.

बी. रघुनाथ यांच्या कवितांचे विषय बहुविध असले तरी त्यात प्रीती, प्रणयाराधन आणि स्त्रीदेहाचे वर्णन यांचेच आधिक्य आहे. अध्यात्मविषयक अनुभवांचा यात अभाव आहे, मात्र आध्यात्मिक मते अधूनमधून व्यक्त केलेली दिसतात.

स्त्री देहाच्या शरीर अनुभवांसोबतच अशा प्रकृतीच्या कवींचा दुसरा महत्त्वाचा विषय निसर्ग असतो. बी. रघुनाथांच्या कवितांतही निसर्गपर कवितांचे प्रमाण लक्षात घेण्याइतके आहे. मात्र हा निसर्ग शुद्ध निसर्गाच्या स्वरूपात येत नाही; एक तर निसर्गाचे चेतनीकरण झालेले दिसते; किंवा मग निसर्ग 'रूपक' म्हणून येतो. पानझड, घन, दिस, निशा, प्रभात, चंद्र, दुपार, ऋतू, सांज, रात्र, निर्झर, पाखरू, बाभूळ, अंगा अशा निसर्गातल्या विविध गोष्टीही इथे प्रकर्षाने दिसतात. पण त्या एकतर स्त्रीदेहासाठी किंवा मग क्वचित आत्मभावावस्थेचे रूपकात्म चित्रण म्हणूनच येतात. 'हा ऋतु निराळा' ही कविता दुसऱ्या

महायुद्धाचे रूपक असावी . 'दुपार' सारखी एखादी उन्हाळ्यातल्या भयंकर दुपारचे वर्णन करणारी कविता पाहिली तर त्यातही 'धनिक करिती गणिकांच्या सुरतिचा विचार' अशी मध्येच एखादी ओळ येऊन जाते .

निसर्ग आणि स्त्रीदेहाकडून शुद्ध शरीर वर्णनाकडे जाणारी कविता असो की शारीर अनुभवाची कविता असो , वी . रघुनाथांची कविता सर्व प्रचलित संकेतांचा , प्रचलित लयींचा आणि प्रचलित अनुभवांचा वापर करताना दिसते . त्यांचे लयींवर विलक्षण नियंत्रण आहे , असे असले तरी लयींच्या नवनव्या प्रयोगांवावत ते फारसे क्रियाशील दिसत नाहीत . संपूर्ण संग्रहात फारशी प्रचलित नसलेली फक्त एकच लय आढळते ती 'मोरणीतला खडा' या कवितेत . ही लय रविकिरण मंडळाच्याही पूर्वीच्या कवींनी क्वचितच वापरलेली लय आहे .

शृंगार , प्रणय , स्त्रीदेह , सौंदर्य हाच वी . रघुनाथांच्या कवितांचा स्थायी भाव असावा असे वाटते . या संदर्भातील कवितांची यादी द्यायची तर ती फारच लांबलचक होईल . तरीही काही नावे द्यावयाची तर 'रंगाऱ्याचे गाणे', 'लहर', 'नेस नवी साडी', 'उन्हात वसली न्हात', 'वियोगातल्या पत्री', 'ज्वार', 'कशाला मुखी पुन्हा तांवूल', 'तुजवरि लिहितो कविता सजनी', 'दर्पणा', 'ते न तिने कधी ओळखले', 'प्रेमकहाणी', 'नगर भवानी', 'कवि आणि दीपक', 'त्या घराची लाट', 'आज रात्र मोठी', 'धूर', 'रात्र संपली तरी', 'धूळ', 'एकाकिनी', 'दग्ध', 'दुर्मुखलेली', 'ये मनात राया कधी', 'ती तुमच्यावर हसली रे', 'सय झाली ग', 'स्वप्न', 'ते आज विसरलो छंद' इत्यादींचा उल्लेख करावा लागेल . एका बाजूने प्रचलित मराठी काव्यपरंपरेचा प्रभाव , आणि दुसरीकडे परभणीसारख्या ठिकठिकाणी असलेली सरंजामशाही व्यवस्थेची पकड , त्यातही या व्यवस्थेने प्रत्यक्ष-अप्रत्यक्षपणे घालून दिलेले काव्यसंकेत यामुळेच कदाचित वी . रघुनाथांच्या वहुसंख्य कवितांचे स्वरूप वर निर्देशित केल्याप्रमाणे शृंगारप्रधान व स्त्रीकेंद्रित झाले असण्याची शक्यता आहे .

सौंदर्य आणि शृंगाराभोवती केंद्रित झालेल्या कवितांच्या खालोखाल वी . रघुनाथांनी सभोवारच्या सामाजिक - राजकीय परिस्थितीच्या संदर्भात लिहिलेल्या कवितांची संख्या आहे . एका आदर्श सामाजिक स्थितीचा संदर्भबिंदू मनात घेऊन संवेदनाशील मन जेव्हा आपल्या सभोवताली काय चालले आहे , याचा वेध घेऊ लागते तेव्हा आर्थिक असंतुलनामुळे निर्माण झालेल्या दरिद्री लोकांविषयी कणव निर्माण होणे स्वाभाविक आहे . भ्रष्टाचार , वाईट चालीरीती , गुन्हेगारी , संघर्ष , युद्ध , लाचलुचपत , समाजातील दुष्ट प्रवृत्तींचे प्रावल्य इत्यादी गोष्टींना वी . रघुनाथांनी काव्यविषय केलेले आहे . स्वातंत्र्य या विषयाला क्वचितच स्पर्शिणाऱ्या वी . रघुनाथांच्या सामाजिक गटातील कवितांवर मराठीतील अग्निसंप्रदायी कवींच्या कवितांची अधूनमधून छाया दिसते . या कविता कधी सरल वर्णनात्मक , तर कधी रूपकात्मक असतात , त्यांचे आशयसूत्र बऱ्याचदा सहजासहजी लक्षात येणारे तर कधी कधी 'पांढऱ्या पऱ्या' कवितेप्रमाणे उलगडण्यास कठिण असे असते . ज्यांना ढोबळपणे सामाजिक जाणिवेच्या कविता म्हणता येईल अशा कवितांमध्ये , 'रस्ता नागर झाला', 'पांढऱ्या पऱ्या', 'अन्नदेवता', 'मुद्रिका', 'राव अधिकारी झाले', 'धुराड', 'आज कुणाला गावे', 'कालिदूतांनो', 'ऐन गरजले ढगाळ', 'उजेड झाला', 'हे आकाश!', 'घुवडे', 'स्वस्त

धान्याचे दुकान', ' आले नवे पाणी', ' या जगताची तृषा भयंकर', 'उषा अशी मजला दिली', ' गरिबांचा संसार', 'देव आणि दरिद्री' इत्यादी कविता येतात.

वरील दोन गटांशिवाय बी. रघुनाथांच्या ज्या अगदीच मोजक्या कविता आहेत त्या आई, प्रेम, वात्सल्य, घर - कुटुंबाशी संबंधित आहेत. 'पश्चिमे तुझे नभ...', 'देखियला एक हिमाचल', 'पुन्हा नभाच्या लालकडा 'सारख्या आहेत. चिंतनगर्भ स्वरूपाचा, काळाविषयीची व मृत्यूविषयी चिंतनात्म भाष्य असणाऱ्या क्वचित काही कविता आहेत.

आत्मभावाचे प्रकटीकरण करणाऱ्या बी. रघुनाथांच्या कवितांची संख्या ( 'रे ओल्या काष्ठा', 'वर्ष नवे', 'अजुनि गाव दूर', चंदनाच्या विठोबाची, इ.) अगदीच अत्यल्प आहे.

बी रघुनाथांच्या बहुतेक कविता या त्या काळी प्रचलित असलेल्या काव्यसंकेतांतूनच निर्माण झालेली आहे. असे असूनही बी. रघुनाथांच्या कवितेत अधूनमधून जी भाषा येते ती त्यांचे कवी म्हणून सामर्थ्य दाखवण्यास पुरेशी आहे. ते ज्या प्रकारे शब्द वापरतात त्या शब्दांची काही उदाहरणे : 'सहज देहरंजनास बसले' मधील देहरंजन, रंगरंजने, चेटक्या, झुंजमुंजले, पाखरचिवचिवणी, अडंगी, रंगीभंगी, चवणा, श्रमाई, चांगा, अरसिक, दुर्मुख बांगा, धुलाऊचा चलाऊचा मात्र भरविता खिसा, कुतुके शेजारिणीची, स्वप्नात टाकशिल मज चुरूनी, गवाक्षातले वदन घोसाळ, एक थवा कोंग्यांचा इत्यादी इत्यादी. अधूनमधून बी. रघुनाथ विलक्षण शब्दबंध वापरतात. उदाहरणार्थ 'वर्ष नवे' मधील

नवता नाविन्य नवे ....
माझा थकला थकवा ....
.... गळलेल्या गात्रांतुन
भरले जुळवुन चेतन .....

' ते न तिने कधी ओळखीले' या कवितेतील एका तरल, सूक्ष्म अनुभवाची अभिव्यक्ती करणाऱ्या खालील सुंदर ओळी बी. रघुनाथांच्या सामर्थ्याची क्षमता दाखवण्यास पुरेशा आहेत.

'होते जेव्हा परस्परांच्या
पिसांत पंछी शहारले'

बी. रघुनाथांच्या कवितांत अधूनमधून खास परभणीचीच बोलीभाषा अवतरते तेव्हा वेगळाच सौंदर्याविष्कार जाणवतो. उदाहरणार्थ, परभणीत 'येतोस की' मध्ये जसा 'की' चा वापर करतात तसाच बी. रघुनाथांनी 'टिचकी' कवितेत केलेला आहे. या दोन ओळी पहाः

.... लोकात गलबला करतिल की
.... पाहशी फटीतुन टकमक की .....

'टिचकी' मध्ये सुरुवातीलाच' या पडक्या वाड्यात गाठुनी मजशि एकटिच की', 'सांज न टळली तोच सख्या तुझी दारावर टिचकी!' धृपदासारख्या येणाऱ्या या ओळी लावणीचा एक वेगळाच बाज वाचकांसमोर मांडतात. बी. रघुनाथांची आणखी एक प्रसिद्ध कविता 'पडली वघ झाकड, लागली जिवास घरची वड' मध्ये खास परभणीच्या आणि

एकूणच मराठवाड्यातील बीड-परभणीच्या अस्सल मराठी भाषेतील कितीतरी शब्द, ('झाकड', 'वड', 'तातड', 'गुचकी', 'शिन', 'वाढुळ' 'खिनभर', 'गुलमेंडी', 'धुऱ्याजवळ', 'खुड' इत्यादी) अतिशय सहजपणे कवितेत येतात, आणि बी. रघुनाथांचे वैशिष्ट्य प्रकर्षाने जाणवते. बी. रघुनाथांच्या कवितेत एकच गझल 'संगमानंतर', आणि एकच सुनीत, 'मेघ', आढळते. शिवाय मुक्तछंदात लिहिलेलीही फक्त एकच कविता 'धुराड' यां संकलनात आहे. बी. रघुनाथांच्या काव्यविषयक दृष्टिकोणाची कल्पना येण्यासाठी ही बाब उपयोगाची ठरू शकते. विसाव्या शतकाच्या पूर्वार्धातील स्वच्छंदवादी कवितेचे पारंपरिक मराठी रूप आणि त्या आधीची पारंपरिक शाहिरी रचना बी. रघुनाथांना जवळची वाटत असावी.

बी. रघुनाथांनी लावणी सदृश व गीतसदृश कविता लिहिल्या असल्या तरी जिला प्रगीतात्म (लिरिकल) म्हणता येईल अशी कविता फारशी लिहिलेली नाही. प्रगीतात्म कवितेसाठी प्राथमिक अट म्हणून 'स्व' ची, आत्मभावाची तरल अभिव्यक्ती आवश्यक असते. इथे आत्मानुभवाच्या असंख्य तरल व बहुविध छटांना अभिव्यक्त करावयाचे असते. त्या छटांमधील सूक्ष्म भेद सूचित करावयाचे असतात. सूक्ष्म व गुंतागुंतीच्या अनुभवांना संक्षिप्त, चिंतनगर्भ, आणि भाषिक अमूर्तनाच्या पातळीवर जाणाऱ्या भाषेतून अभिव्यक्त करण्याचे सामर्थ्य बी. रघुनाथांजवळ नव्हते असे नाही, मात्र त्याचा वापर त्यांनी अपवादानेच केलेला दिसतो. मूर्त रूपापासून दूर राहणारी, अर्थ उघडपणे विशद वा व्यक्त न करणारी आणि अर्थाचे सूचन करणारी भाषा भावात्मकतेच्या उच्च स्तराची निदर्शक असते. ही भावात्मकताच आपल्या विकसित रूपात आध्यात्मिकतेला स्पर्श करीत असते. बी. रघुनाथांची कविता हा स्तर गाठू शकली नाही असाच निष्कर्ष शेवटी काढावा लागतो. हे का घडले? आत्मभानाच्या तीव्र अभावामुळे, पारंपरिक काव्यसंकेतांच्या चक्रात अडकल्यामुळे, जगण्याच्या संघर्षातून विकसित होणाऱ्या काव्यविषयक दृष्टिकोणाच्या अभावामुळे की आणखी काही कारणामुळे?

बी. रघुनाथांजवळ सूक्ष्म भाषिक जाण होती, प्रतिभाशक्ती होती, अनुभवांच्या विविध रूपांना पेलण्याचे सामर्थ्य होते, याचा प्रत्यय अधूनमधून त्यांची कविता वाचताना येतो. तरीही बी. रघुनाथांची कविता अपेक्षित उंची गाठू शकली नाही. याचे कारण बी. रघुनाथांनी आपल्या सर्जन व्यवहारात कविता या वाङ्मय प्रकाराला प्राधान्य दिले नाही, कवितेचा 'अंतरिम वाङ्मय' प्रकार म्हणून वापर करून कथात्म साहित्यालाच सर्वाधिक महत्त्व दिले असावे, असे वाटते. निदान अशी शंका घेण्यास पुरेसा वाव आहे एवढे तर नक्कीच!



# बी. रघुनाथांची कथा

## काव्यात्म आणि चित्रदर्शी

के. ज. पुरोहित

चांगला लेखक अलक्षित, दुर्लक्षित राहण्याचा प्रकार प्रत्येक भाषेतल्या साहित्यात घडत आलेला आहे. त्याची कारणेही असतात. वाङ्मयाच्या इतिहासाचा अभ्यास करणाऱ्यांच्या दृष्टीने ती कारणे उद्बोधकही ठरतात. एक मात्र निर्विवाद की चांगला लेखक दुर्लक्षित राहिल्यामुळे त्या लेखकाचे जे नुकसान होते त्यापेक्षा कितीतरी जास्त नुकसान साहित्याचे होते. बी. रघुनाथ हे अशा लेखकांपैकी एक मोठे लेखक होत.

नवकथेचे प्रमुख शिल्पकार आणि भाष्यकार गंगाधर गाडगीळ यांनी आपल्या आत्मचरित्रात आणि बी. रघुनाथ यांच्या स्मृतिदिनानिमित्त ७ सप्टेंबर १९९४ रोजी केलेल्या भाषणात बी. रघुनाथांना मराठी नवकथेच्या संदर्भातले हे पायवाट करण्याचे श्रेय दिले. त्यांच्या मते 'आकाश' या बी. रघुनाथांच्या कथेत नवकथेची सगळी वैशिष्ट्ये दिसून येतात.

त्या पूर्वी गाडगीळांचे साथीदार नवकथाकार अरविंद गोखले यांनी दि. बा. मोकाशी यांच्या कथांच्या संपादनाच्या निमित्ताने असे लिहून ठेवले की "हळवा ध्येयवाद व फसवा बोधवाद कथेतून काढून कथा अंतर्मुख, काव्यात्म एकसंध व उत्स्फूर्त लिहिली जाऊ लागली. अशा प्रकारचे कथालेखन वामन चोरघडे, कुसुमावती देशपांडे आणि, बी. रघुनाथ आदी लेखक करू लागले. येऊ घातलेल्या नव्या कथेचा अंदाज या लेखकांच्या कथांवरून करू शकतो". ' गोखल्यांचे हे विधान गाडगीळांच्या विधानापेक्षा अधिक नेटके आहे. हे विधान १९८७ मधले आहे. खुद्द मी १९५६ मध्ये मला आवडणाऱ्या लेखकांत बी. रघुनाथांचा उल्लेख 'माझे कथालेखन' या लेखात केला होता. परंतु केवळ गौरवपूर्ण उल्लेख करण्यापलिकडे मीही गेलो नाही. हे सगळे घडले ते बी. रघुनाथांच्या मृत्यूनंतर म्हणजे १९५३ नंतर. किती तरी नंतर. मान्यता पावू लागणाऱ्या एकाही कथाकाराने बी. रघुनाथांच्या कथालेखनाची योग्य ती दखल त्यांच्या हयातीत घेतली नाही. ही बाब अत्यंत दु:खद आणि चिंत्य आहे. या बाबतीत असलाच अपवाद दर तो वि. स. खांडेकरांचा. खांडेकरांच्या कथालेखनासंबंधी कुणाचे काहीही मतभेद असले तरी बरोबरीच्या आणि नंतरच्या लेखकांच्या गुणांची नोंद करणाऱ्या त्यांच्या स्वागतशील वृत्तीबद्दल दुमत असणार नाही. अशा तऱ्हेचे विधान नवकथाकारांच्या गटाबद्दल, त्यांच्या पाठीराख्याबद्दल, नवकथाकारांच्या समकालीन लेखकाबद्दल करता येणार नाही. कथेच्या इतिहासालाच नव्हे तर कथेच्या वाढीलाही या वृत्तीमुळे नख लागते, असा माझा विश्वास आहे. बी. रघुनाथांच्या कथेकडे योग्य वेळी योग्य ते लक्ष देण्यात न आल्यामुळे एकूणच कथा साहित्याचे नुकसान कसे झाले हे पाहणे उद्बोधक ठरावे. त्यासाठी बी. रघुनाथांच्या कथासाहित्यात दिसून येणारी वैशिष्ट्ये लक्षात घेणे



अनुक्रमणिका

आवश्यक आहे. तसे करताना कथा लेखक म्हणून बी. रघुनाथांची भूमिका काय आहे हे पाहणे प्रस्तुत ठरेल.

'स्वत:विषयी' लिहिताना त्यांनी केलेली काही विधाने विचार करण्यासारखी आहेत.

"मी एक कथालेखक आहे, माझ्या कथाखेरीज मला वेगळा परिचय नाही."

"मी एक धटिंगण कथालेखक आहे." हा परिचय खरा पण अपुरा आहे. आपल्याला आवडलेल्या 'कंदील' या कथेविषयी लिहिताना ते सांगतात की ती कथा 'प्रकाश' नावाच्या साप्ताहिकात प्रसिद्ध झाली.

"त्या कथेमुळेच की काय कुणाला माहीत, प्रकाश प्रतिमावर आणि प्रकाश प्रतीकावर मी अतिशय लुब्ध होत गेलो. याचाच परिणाम म्हणून 'रात्रीचा रखेला', 'रात्रीचा रक्षक', 'रात्री रंगविणारा', 'रात्री जाळणारा', 'नगराला दिवस दाखविणारा', 'दिवसाच्या हालचालीवर डोळे मिटून वसलेला' अशी कल्पनावलये त्यांच्या भोवती 'माझ्या घरापुढील दिव्याच्या खांबा भोवती' आहेत.... 'लागले दिवे', ' लाव दिवा ग ऽ 'नवलाख दिवे' अशा प्रारंभाच्या कविताही मला आवडतात. 'दिव्याचे मनोगत' ही कांतांची कविता मला कल्पनातीत आवडली आहे......"

"गोष्टीची सुरुवात, मध्य, शेवट या विषयावर माझा अभ्यास मुळीच झालेला नाही, मला चांगली वाटली तीच सुरुवात! जिथे कथा संपवावी वाटली तोच शेवट! प्रकरणशः लिहिलेली कादंवरी मला आवडत नाही. गुंतागुंतीत आणि उकलीत गुंतणं न् गुरफटणं चांगलं काय? भरून आलेलं मन रिकामं झाल्यासारखं वाटणार नाही, तोवर पात्राच्या, प्रसंगाच्या किंवा दृश्याच्या वर्णनाचा ओघ का म्हणून थांववावा?"

"लांवलचक मथळेच मला चांगले वाटतात, अन् अशा मथळ्यांच्या कथा मी अगोदरच वाचतो! लिहून न झालेल्या गोर्ष्टींच्या आठवणीत रमण्याचा माझ्या मनाचा एक चाळा आहे... कथा साकार करणारी दृश्ये रोजच्या रोज दिसतात. माझं कथानक आणि ही दृश्ये वेगळी नाहीत..... काही चेहरे दिसले की, त्यांच्याशी निगडीत असलेली कथानक खळखळू लागतात. शव्दांच्या पलीकडे फुलून थांबलेलं हे वासंतिक वैभव एखाद्या लघुनिबंधाचा विषय करावा हा विचारही टाळता येत नाही."

"कारण समुद्र सपाटीपासून या परभणीची उंची एकूण साडे सतराशे फूट. येथे 'भव्य', 'दिव्य' असण्याची शक्यता आहे? मानवी समाजाला उच्चतर ध्येयं सांगायची अथवा नवी तंत्रं घोषवायची सवय येथे कशी लाभू शकेल? परभणीत काही असो किंवा नसो! जीवन मात्र आहे. येथल्या वातावरणात एखादा लेख न लिहिला तर उपाशी राहावं लागणार नाही, उपवास घडला तर आपल्याला एक नवा अनुभव मिळाला या आनंदात एखाद्या कथेची उभारणी होऊ शकेल. या भागातलं जीवन मध्ययुगीन, संस्थानी आहे, म्हणून त्याच्या अनुभूतीत आणि आविष्कारात काही पाप आहे काय? येथल्या वातावरणात अनाचार, क्रौर्य, आणि पशुता यांचं गडद आणि गढूळ मिश्रण झालेले 'अमीर' मला दिसतात, तसे दुराचारांच्या थरात आणि भरातही मानुषतेची छटा वागविणारे जानकीरामही आढळतात.... माझ्या कथा कोणत्या आणि मी आजवर अनुभवलेलं जीवन कोणतं, हे मला सांगता येत नाही."

बी रघुनाथांची ही स्वैर स्वगते त्यांच्या कथा समजून घ्यायला, त्यांचे मूल्यमापन

करण्याला अत्यंत उपयोगी ठरतील. पुष्कळदा एखाद्या लेखकाची तात्त्विक भूमिका आणि त्याचे सर्जनशील साहित्य यात फार अंतर असते. याचे कारण अशा लेखकाची तात्त्विक भूमिका त्याच्या वाचनातून व अभ्यासातून सिद्ध झालेली असते. बी. रघुनाथांनी अशा तऱ्हेचे काही वाचन केलेले नसेलच असे म्हणता येणार नाही. उलट या साध्या दिसणाऱ्या उद्गारातही तंत्रवादाचा त्यांनी सौम्यपणे उपहास केल्याचे जाणवते, तेव्हा त्यांनी तात्त्विक भूमिकांचा परिचय करून घेतला नव्हता हे म्हणणे अतिशयोक्तीचे ठरेल. त्यांची स्वतःची भूमिका ठामपणे अनुभवसिद्ध होती असे समजण्यास मात्र कोणतीही अडचण नाही.

बी. रघुनाथांनी स्वतःच्या शब्दात स्वतःविषयी जे सांगितले ते त्यांच्या कथांत कसे उमटले हे पाहण्याच्या दोन पद्धती असू शकतात. एक म्हणजे त्यांच्या समग्र कथांचा अभ्यास करून त्यातून निघणारा निष्कर्ष काढणे. ही पद्धत योग्य असली तरी तिला न्याय द्यायचा झाल्यास हा अभ्यास विस्तृत प्रमाणावर करावा लागेल. बी. रघुनाथांच्या कथांची संख्या साठाच्या आत असल्यामुळे हा विस्तार फार मोठा होणार नाही असे सकृत दर्शनी वाटले तरी या अभ्यासाची अंगे कमी नसतात. म्हणून असा प्रयत्न पदवी वा पदविकेच्या विद्यार्थ्याने करायला हवा. माझ्या सारख्याने ही पद्धत वापरू नये याचे कारण म्हणजे बी. रघुनाथ वाचक म्हणून, इतर कथाकारांचा वाचक म्हणून, स्वतः कथाकार म्हणून जाणतेपणाने व अजाणपणानेही माझी या बाबतीत काही मते बनलेली आहेत, ती विसरणे सोपे नाही. म्हणून मी दुसऱ्या एका पद्धतीचा अवलंब करीन. बी. रघुनाथांचे वाङ्मयीन व्यक्तित्व त्यांच्या कथांत कसे उमटते व त्यामुळे त्यांच्या कथेत कोणती वैशिष्ट्ये आली आहेत हे पाहणे; तसेच त्यामुळे काही मर्यादाही आल्या आहेत का याची नोंद घेणे ही ती दुसरी पद्धत होय.

बी. रघुनाथांच्या कथा वाचताना पहिला ठसा होतो तो त्यांच्या काव्यात्म व्यक्तित्वाचा. ही काव्यात्मकता तीन प्रकारे आविष्कृत होते. एक म्हणजे बी. रघुनाथांची कथा सुरुवातीला अनेकदा रूपककथा वा प्रतीक कथा म्हणून प्रकट होते. 'नंदादीप आणि पणती', 'कंदील' आणि 'बाभळीचे झुडूप' ही या प्रकारची काही उदाहरणे. या कथाप्रकाराचा मोह कोणाही कथाकाराला होणे स्वाभाविक आहे. त्याला जे सांगावयाचे आहे, त्यासाठी खरीखुरी वाटणारी माणसे आणि प्रसंग त्याला अपुरे व असमाधानकारक वाटतात. पण त्याची ही गरज प्रमाणाबाहेर वाढली तर लेखक म्हणून, जीवनाचा भाष्यकार म्हणून, तत्त्वचिंतक म्हणून तो मोठा होत जातो परंतु त्याच्या कथेतून ओळखीच्या माणसांचा आवाज लुप्त होत जातो. बी. रघुनाथांनी कथालेखनाच्या आपल्या प्रवासात हा धोका फार लवकर ओळखलेला दिसतो. बी. रघुनाथांनंतरच्या कथाकारांनी, बऱ्याच कथाकारांनी हे भान राखले नाही ही गोष्ट आधुनिक मराठी कथेच्या अभ्यासकांना मान्य करण्यास हरकत नसावी.

कथेच्या संदर्भात बी. रघुनाथांची काव्यवृत्ती अधिक दृश्य स्वरूपात प्रगट होते ती त्यांच्या भावनोत्कटतेद्वारे. ही भावनाशीलता त्यांच्या कथामध्ये जशी अंगरूप आहे तशीच ती त्यांच्या कथांचे भूषणही आहे. भावना आहे पण भावविवशता नाही. 'आभावती' या कथेचा शेवट या दृष्टीने पाहण्यासारखा आहे. '[illegible] जे पूर्वीच दिले होते ते आता जबरदस्तीने हिसकावून घेण्यात तरी काय स्वारस्य होते!' एवढे एक वाक्य मनाची संपूर्ण अवस्था साकार करायला समर्थ ठरते. 'फाऊन्टन पेन' सारखा विषय याच भावनोत्कटतेमुळे उजळून निघतो. याही कथेचा शेवट आहे साधा पण त्यातली चटका लावण्याची ताकद पाहण्यासारखी

आहे. 'एकीकडे त्या चमचमत्या क्लिपचे टोपण, एकीकडे पत्नी मोडून पडलेले नळकांडे, त्यातून फरशीवर एकदोनच पडलेले हिरव्या शाईचे बारीक थेंब, अशी फाऊन्टन पेनची अवस्था झाली''......''गुणाजी तेथून सरकला खरा, पण त्या विस्कळीत झालेल्या लेखणीबरोबर त्याच्या आशेच्या निव्वळ ठिकऱ्या ठिकऱ्या झाल्या होत्या!'' 'काश्मीरी गुलाब,' 'निळावंतीची लावणी', 'न पडणारे चांदणे', 'दोन चित्रे', 'निस्संग' इत्यादी कथांचे शेवट या दृष्टीने लक्षणीय आहेत.

सामान्यतः बी. रघुनाथांच्या भाववृत्तीतला मुख्य स्वर आर्ततेचा आहे, पिचलेल्याच्या मनाचा आणि शरीराचा आहे. याचा संबंध त्यांच्या वैयक्तिक जीवनाशी लावण्याइतपत पुरावाही उपलब्ध आहे. पण तसा संबंध लक्षात न घेतांही ही आर्तता आपल्याला जाणवते. वाचकाच्या दृष्टीने कथात्म झालेला अनुभवच महत्त्वाचा असतो व तो त्यांच्या कथा वाचकांपर्यंत हमखास पोहचवितात. या भावनेचे चाप ओढलेल्या अवस्थेमुळेच त्यांच्या कथांत जीवनरहस्याबद्दल जागोजागी चिंतन विखुरलेले असते. या चिंतनामुळे त्यांच्या कथांची प्रत उंचावते. ' स्वर्ग कुठं आहे'? 'सरत्या पावसाळ्यातील एक रात्र', 'आकाश' ही अशा कथांची काही उदाहरणे. परंतु ही चिंतने आणि भाष्ये, कथेशी एकरूप झाली नाहीत तर कथेचा तोल जातो, तिचा आशय मिश्रच नव्हे, विनाकारण संदिग्ध होतो. 'एका रात्रीचा प्रसंग' या कथेत असे झाले आहे. कधी कधी ही भाष्ये इतकी प्रबळ होत जातात की कथा कशाची आहे याचे भान वाचकाला येत नाही; याचे कारण ते लेखकालाच आलेले नसते. कथेला शीर्षक काय द्यावे असा गोंधळ निर्माण होतो. समग्र बी. रघुनाथ (खंड २ रा कथा) च्या संपादकांना शेवटची कथा शीर्षकाशिवाय छापावी लागली आहे, याचे कारण हेच असावे. या ग्रंथाचे संपादक इंद्रजित भालेराव आणि श्रीकांत उमरीकर यांना बी. रघुनाथांच्या कथा शिथिल वाटतात. त्यांचा हा अभिप्राय खरा आहे. तंत्राविषयी उदासीनता आणि पात्रांना स्वातंत्र्य देण्याची प्रवृत्ती या बी. रघुनाथांच्या वैशिष्ट्यामुळे कथा शिथिल झाल्या अशी त्यांनी दिलेली कारणमीमांसा आहे. ती चूक आहे असे नव्हे, पण मला अशी पुस्ती जोडावीशी वाटते की कधी कधी बी. रघुनाथ यांच्यातील कवी बी. रघुनाथ यांच्यातील कथाकारावर कुरघोडी करतात आणि कथा सदोष होतात. पण कवित्वामुळे बी. रघुनाथांच्या कथांची फार मोठी हानी झाली आहे असे मात्र मुळीच मला सुचवायचे नाही. एकूण विचार करताना काव्यात्म वृत्तीमुळे बी. रघुनाथांची कथा अधिक संपन्न झाली आहे, असाच निष्कर्ष काढावा लागेल. या संपन्नतेचे सर्वात महत्त्वाचे आणि आकर्षक लक्षण म्हणजे बी. रघुनाथांची भाषा. ते कवी होते म्हणजे त्यांची भाषा चित्रमय होती, चित्रवर्ती होती, हे ओघानेच आले. परंतु केवळ वर्णने करण्यात, स्थिर चित्रे रंगविण्यात ही भाषा खर्ची पडलेली नाही. एखादे चित्र उभे करता करता तिच्यातला भावनेचा, कथनाचा, चिंतनाचा विचार प्रवाही ठेवण्यात ही भाषा वापरण्यात आलेली आहे.

''कारण देवळातून बाहेर पडल्यावर प्रत्येकाच्या मुखावर जे चिंतेचं पटल, असमाधान आणि अतृप्ती दिसत होती ती, ईश्वराइतकीच अनादी असावी असं वाटत होतं, अन् एवढ्या वरही देवदर्शनासाठी झुंडीच्या झुंडी येत होत्याच.'' (नंदादीप आणि पणती)

''वीज तर रूपोन्मादानं हसत होती. भोवती किडयांचा गराडा पडला होता. 'उन्मत्त आणि अविचारी राजाच्या दरबारात तोंडपुज्या, अक्कल शून्यांची गर्दी व्हावी तसं वाटत

होतं. (कंदील).

"धुडके नेसून, ओढ्यावर स्नानासाठी आलेल्या जवळच्या शेतातील स्त्रीने पाण्यात उठविलेल्या तरंग-लहरी ते पाहत असते. जवळून गेलेल्या पाऊलवाटेने न्याहरी घेऊन जाणाऱ्या तरण्या शेतकरणींचे मोकळे हसणे, त्यांचे कंकणध्वनी, त्यांच्या चरणांचा निनाद त्याच्याभोवती सारखे घोटाळत असताना आणि निळ्या ढगांच्या मऊ मऊ शेजेवर निवांत निजणाऱ्या रात्रीचे नाजूक उच्छवास दरवळू लागले की उद्याच्या जीवनमूर्तीच्या रम्य स्वप्नांनी त्याची सारी रात्र व्यापली जाते." (वाभळीचे झुडूप)

"आभाळून आलेल्या रात्रीच्या मत्त अंधाराचे स्वरूप बाजूच्या खिडकीतून अतिशय काव्यात्म दिसत होते." (फूल आणि काटा')

"त्या राशीकडे तिचे पती मोठ्या अभिमानाने पाहात आहेत असे आढळे! मग त्या राशीतून आग भडकू लागे आणि ती तात्काळ जागी होई... अंधारांचं आता फिकट चांदणं झालं होतं, जणू अनंत आकाशाच्या शय्येवर झोपलेली तमोदेवता मातृत्वाच्या कल्पनेनं स्वप्नात हसत नाही." ('तीन संसार')

"या जगातून माझा मित्र नाहीसा झाला हे दुःखदायक तर खरंच! पण त्याच्या निधनाने कणही नाहीसा झाल्यासारखा सृष्टीला जाणवत नाही हे पाहणं, त्याहूनही अत्यंत दुःखदायक आहे." (थैली).

"पोलीसाच्या दंड्याखाली विविध अंगक्षेप करणारी, वकीलांच्या बडबडीतून आकार घेणारी, पैशापुढं कधी निःसंग होणार तर कधी सत्याच्या नावाने झिरझिरीत अन् धाकटं वस्त्र नेसणारी न्यायदेवता काही पेशा, काही तारखां झाल्यावर कोर्टाच्या कलमातून जिथं साक्षात होईल असं ते भव्य ठिकाण होतं." ('नागझरीचे पाटील')

"सुगी संपली की नागझरीच्या शिवारात आनंदोत्सव करण्याइतकं ऐश्वर्य तुडुंब भरत होतं. नागझरीभोवतालच्या रसाळ आंबराईचं अंतरंग प्रगट करीत मग वसंत-वारा नागझरीतून वाहत होता, जीवनसर्वस्व अशा काळ्याभोर रानांना तापविण्यासाठी आकाश तप करीत होतं. मग रसनिर्भर उरावरला पदर फडफडतो आहे अशी वर्षा पुंजमेघाच्या राशीतून चालत येत होती. मग हिरवं न् हिवाळ्याचं युग येत होतं न् ज्वारीची धाट कणसं धरू लागत होती." ('नागझरीचे पाटील')

"अलीचे उषामूक्त तसेच प्रदोष पूजेचे पाठही निराळे आहेत. सायंतनीचे पश्चिमाकाशातले क्षणोक्षणी रंग बदलणारे मेघखंड पाहावे आणि पानगृहातल्या पहिल्याच घोटासरशी झिंगत चालल्याची कल्पना करावी! तेथल्या प्रकाशाची उजळमावळ अवलोकन करता करताच नशेत बुद्धीला येणारी ग्लानी अनुभवावी! किंवा त्या रंगरागाचे संदेश घेऊनच गुत्त्याची वाट चालू लागावी." ('खाटकाची गाय')

"राजपेठेवर रजनीचा राग पसरू लागतो. पुंजक्यांनी जमलेले तंतू मेघ धूमिल आणि तांबूट होऊन फिरू लागतात. शरत्कालीन रसोत्सवासाठी इंद्रपुरीच्या रोखानं आकाशातून निघालेल्या गंधर्वांची आणि गंधर्व योषितांची विविधांगी वस्त्रं क्षणभर झळकून अस्पष्ट होऊ लागतात." ('माणसाला मरण नाही').

बी. रघुनाथांच्या भाषाशैलीचे वर दिलेले नमुने सहेतुक दिलेले आहेत. त्यातल्या 'माणसाला मरण नाही' या कथेतला नमुना बी. रघुनाथांचा भाषादोष दाखवण्यासाठी मुद्दाम

निवडलेला आहे भाषिक फुलोऱ्याच्या मोहामुळे ते भाषेचा कधी कधी अप्रस्तुत, असंगत उपयोग करीत असावेत हे या उदाहरणावरून स्पष्ट होईल, सुदैवाने अशी उदाहरणे बी. रघुनाथांच्या कथामृष्टीत फार कमी आहे. त्यांच्यातला कवी कथाकारावर कशी मात करीत होता याचे निराळ्या संदर्भातील हे आणखी एक उदाहरण.

असा एखादा अपवादात्मक अपवाद सोडला तर बी. रघुनाथांनी केलेला भाषेचा उपयोग नुसताच लक्षणीय नव्हे तर अभ्यसनीय व अनुकरणीय आहे. वर दिलेली उदाहरणे लक्षात घेतली वा 'बेगम सकीना' 'जिथं तांबड फुटायचं आहे', 'लंगड्याची दौलत', 'जनता लिंवेटाकळी' 'शेख मस्ताना' इत्यादी कथा वाचल्या तर भाषेचा बहुविध उपयोग बी. रघुनाथ कसा समर्थपणे करतात याचा सहज साक्षात्कार होतो. त्यांची भाषा केवळ भावुक, तरल राहत नाही; ती कणखर होते; उपहास, उपरोध यांची धार तिला चढते. याचे कारण म्हणजे बी रघुनाथांची आपल्या सभोवतालच्या समाजाची खोल, गडद जाण, त्यांच्या भाषेला कल्पनेचे, सौंदर्याचे पंख असले तरी तिची नजर घारीसारखी तीव्रपणे सामाजिक वास्तव पाहात असते. बी. रघुनाथांचे कथाविश्व जेथे घडते तो परिसर मुख्यतः परभणीचा, परभणीच्या आसपासचा परभणीच्या भूत आणि वर्तमानातला. परंतु त्यांची कथा कुठल्याही अर्थाने प्रादेशिक बनत नाही. त्यांनी दाखवलेल्या पायवाटेवरून पुढची कथा गेली असती तर आधुनिक कथेत आलेले वास्तव सामाजिक दृष्ट्या थिटे राहिले नसते. या दृष्टीने बी. रघुनाथांच्या कथांकडे योग्य वेळी लक्ष गेले नाही. ही मराठी कथेच्या दृष्टीने दुर्दैवाची घटना होय.

एखाद्या कथाकाराचे समग्र योगदान काय, त्याचे कथावाङ्मयात स्थान काय हे ठरवण्यास त्याच्या कथांची संख्याही पुरेशी असणे आवश्यक आहे. 'ही एकच कथा जरी त्यांनी लिहिली असती तरी त्यांचे नाव अजरामर झाले असते.' असे म्हणण्याचा प्रघात असला तरी अशा नऱ्हेचे विधान अतिगौरवाचे, अतिशयोक्तीचे होते. बी. रघुनाथ संख्येच्या दृष्टीनेही महत्त्वपूर्ण भर टाकत असतानाच त्यांचे निधन झाले. त्यांच्या लेखनाची श्रीमंती वाढत असतानाच त्यातले दोष लुप्त होत असतानाच त्यांची कथायात्रा संपली. मर्यादा नव्हती असे नाही बी. रघुनाथांनी विविध तऱ्हेची माणसे, प्रसंग जिवंत केले; त्यांचा शोध घेतला जीवनातली संगती विसंगती पाहिली दाखवली पण आश्चर्य व्यक्त करण्यापलीकडे ते पुष्कळदा जाऊ शकले नाहीत. 'मुरली' सारखी कथा सोडली तर माणसाच्या वागण्याचा तळ ते दाखवू शकत नाहीत. ते असे करू शकले असते असे वाटते न वाटते तोच सगळे संपले. त्यामुळे माणसाच्या वागण्याच्या मुळाशी असलेली चमत्कृती पुष्कळदा कलाटणीसारखी त्यांच्या कथांत व्यक्त होते 'काळेमस्ताच्या आठवणी' 'जग कुठं चाललंय', 'हंगामी जागा' 'प्रधानांचा दौरा', या कथा बी. रघुनाथांच्या मर्यादा दाखवणाऱ्या आहेत. परंतु अशा कथा थोड्या आहेत 'नाल', 'काळी राधा' सारख्या कथा भरपूर आहेत, आणि त्याच त्यांचे बलस्थान दाखवितात. बी. रघुनाथांनी अशा कथा लिहिल्या आहेत की त्यांचा योग्य संस्कार, योग्य प्रभाव समकालीनांवर व पुढच्या पिढीतील लेखकावर पडला असता तर वाचकांकडे पाठ फिरवणारी, वाचक जिच्यावर पाठ फिरवितात अशा कथांचे मराठी कथाविश्वात काही काळ टिकलेले नाणे मुळीच चालले नसते.



# शेजवलकरांचे साहित्यविषयक विचार

**मो . वि . भाटवडेकर**

श्री . त्र्यं . शं . शेजवलकरांचे साहित्यविषयक लिखाण मोजकेच पण मार्मिक आहे . १९२५ ते ५२ पंचवीस वर्षांच्या कालावधीत एतद्विषयक त्यांचे एकूण आठ लेख प्रसिद्ध झाले . त्यातील सहा परीक्षणाच्या स्वरूपाचे होते . एक त्रोटक आणि अपुरा राहिलेला लेख , 'वाङ्मय , लेखन आणि जीवित' या विषयावर असून 'विभावरी वाङ्मयाच्या निमित्ताने' ही त्यांची प्रदीर्घ प्रस्तावना , विभावरीबाईंना लाभलेला विशिष्ट सांस्कृतिक वारसा आणि त्यांची सामाजिक चौकट , यांच्या प्रक्षोभक अशा चर्चेला वाहिलेली आहे .

वर उल्लेखिलेल्या आठ लेखांपैकी सहा लेख १९२७ ते ३० या कालावधीत प्रकाशित झाले . त्यानंतर सात वर्षांनी 'वाङ्मय , लेखन आणि जीवित' हा लेख प्रसिद्ध झाला आणि त्यानंतर बारा वर्षांनी 'विभावरी वाङ्मयाच्या निमित्ताने' ही प्रस्तावना लिहिली गेली . अशा रीतीने खंडीत स्वरूपात हे लिखाण झाल्याने एकसंध , सलग लिहिलेल्या लिखाणात आढळून येणारी सुसंगतता आणि एकसूत्रीपणा येथे आढळून येत नाही . मात्र हे सर्व लेख एकत्रितपणे आणि जिज्ञासापूर्वक वाचल्यास , शेजवलकरांचे साहित्यविषयक विचार समजून घेण्यास फारशी अडचण पडत नाही .

वाङ्मयाकडे पहाण्याची शेजवलकरांची दृष्टी वाङ्मयक्षेत्रापुरती मर्यादित नसून ती फार व्यापक होती . ते लिहितात , "साहित्याविषयाची तळमळ माझ्यात मुदलीच अस्तित्वात नाही . देशाचे पारतंत्र्य कसे जाईल हा माझ्या विचारांचा मुख्य विषय . पारतंत्र्य का व कसे आले , हे समजून घेण्यासाठी मी इतिहास , राजनीती , समाजशास्त्र , अर्थशास्त्र इत्यादींचा अभ्यास केला . या सर्व शास्त्रांचा एतद्विषयक पुरावा वाङ्मयातच सापडत असल्याने त्याचाही अभ्यास मी त्या अनुषंगाने केला ." थोडक्यात , मानवी जीवन आणि मानवी व्यवहार समजून घेण्याचे वाङ्मय हे एक साधन आहे अशी शेजवलकरांची धारणा होती .

एकदा ही भूमिका मनात ठसली की शेजवलकरांचे अन्य वाङ्मयीन विचार समजून घेणे सोपे जाते .

केवळ कल्पनारम्य , स्वप्नाळू असे वाङ्मय शेजवलकरांना टीकाविषय वाटते . त्यासंबंधी त्यांची एक उपपत्ती होती , ती त्यांच्याच शब्दांत सांगणे इष्ट ठरेल . " मनुष्याचे जगातील पहिले कर्तव्य . . . पूर्णतया जगणे , प्रत्येक क्षण पूर्णतया जोसात जगणे हे आहे . असे जीवित जगात कितीजण जगतात ? फारच थोडे . शरीरदृष्ट्याच बहुतेक इतके कमकुवत असतात की , त्यांना जोसात जगणे शक्यच नसते . हा कमकुवतपणाच माणसाला विचारांकडे

वळवतो .... याचा अर्थ नैसर्गिक कृतीकडे असणारा मनुष्याचा आल्हादजनक व्यापार मोडून त्या वदली सौख्याकडे वळून त्यातून आनंद उत्पन्न करू पाहतात. वस्तुतः हा आंवटशौक असतो. त्यात खरे सौख्य, खरा आल्हाद, खरी तृप्ती, खरे समाधान कसे लाभणार? पुढे जाऊन शेजवलकर लिहितात, "आजच्या सिनेमाला जाणाऱ्या शहरातील झुंडीची मनोरचना आंवटशौकीपणाची, म्हणजे कल्पनेत श्रीमंती, सौख्य, विलास, भोगू पहाणारी रोगट जातीची नाही काय?"

एकदा 'कलेसाठी कला' ही भूमिका सुटली आणि 'मानवी जीवन समजून घेण्याचे एक साधन' ही भूमिका आली की वाङ्मय हे वास्तववादी असले पाहिजे हे शेजवलकरांचे मत तर्कसुसंगत असेच ठरते आणि हे त्यांचे मत त्यांच्या विविध परीक्षणांतून व्यक्त झाले आहे.

कादंबरीतील पात्रे कल्पनेतील नसावीत तर वास्तवातली असावीत असे शेजवलकरांचे स्पष्ट मत, आणि कादंबरी आकर्षक करण्याची कला पूर्णपणे अवगत नसली म्हणजे मग असामान्य गुणांची पात्रे निर्माण करणे, भावनाप्रक्षोभक प्रसंगांचा अंतर्भाव करणे, उदार विचार, वक्तृत्वपूर्ण भाषा अशा गोष्टींचा लेखक अवलंब करतो, असा त्यांचा युक्तिवाद होता. 'माझे रामायण' या कादंबरीवरील परीक्षणात ते लिहितातः "कादंवरीतील दोन मुख्य पात्रे, उषाताई व सरलानंद आपल्याला रस्त्याने सहज जाताना भेटणाऱ्या वर्गातील नव्हेत, अर्थातच तितक्या प्रमाणात ती असंभवनीय कोटीत जातात. त्यामुळे कादंवरीवाचनाने करमणूक झाली तरी कादंवरी वाचून संपल्यावर आपण स्वप्नसृष्टीतून या मर्त्य लोकी उतरल्याचा भास होतो व कादंवरीचा बोध मनावर ठसत नाही. कादंवरी हे असणाऱ्या जगाचे प्रतिविंव असले पाहिजे. आपणाला हवेसे वाटणाऱ्या जगाचे चित्रलेखन उपयोगी नाही."

अशी आणखी पुष्कळ उदाहरणे देता येतील. पण विस्तारभयास्तव तो मोह टाळून, ऐतिहासिक कादंबऱ्यांचे वावतीत शेजवकरांनी व्यक्त केलेल्या विचारांकडे वळतो.

वाङ्मयाला त्या त्या संस्कृतीची पार्श्वभूमी असली पाहिजे. तसे नसेल तर ते वाङ्मय समाजाचे योग्य प्रतिबिंव असे म्हणता येणार नाही, हे आपले मत दाखले देऊन सिद्ध करताना शेजवलकर लिहितात, "सर वॉल्टर स्कॉटच्या स्वराष्ट्राच्या उत्कट, रोमरोमांत भिनलेल्या अभिमानाने ज्या कादंबऱ्या झाल्या त्यांचे अनुकरण वंगालमध्ये वंकिमचंद्र प्रभृतींनी व महाराष्ट्रात हरिभाऊ आपटे सारख्यांनी केले. महाराष्ट्रात मराठ्यांच्या इतिहासाचा धागा असल्यामुळे हरिभाऊंचा उषःकाल मराठ्यांना प्रलोभक ठरला तरी, त्यातील ऐतिहासिक वर्णने वहुधा काल्पनिकच वाटली. कारण तशी पार्श्वभूमी युरोपीय संस्कृतीतच शक्य होती आपल्याकडे कोठून असणार? पण हा महत्त्वाचा मुद्दाही वहुतेक टीकाकारांच्या नजरेतून निसटला आहे. वंकिमचंद्रांची दुर्गेशनंदिनी तर वंगाली लोकांच्या इतिहासात सांप्रत कालात वीररसाचा अभाव असल्यामुळे, केवळ कादंवरीच ठरली. मात्र आपल्या भाषेच्या विलासाने, त्यांनी त्या परिस्थितीतही आपल्या वैशिष्ट्यांचा ठसा वाचकांच्या मनावर उमटविला ... पण साहित्याचा समाजशिक्षणाकडे जो नकळत उपयोग होत असतो तो मात्र येथे त्या अर्थाने प्रकट होणे शक्य नव्हते."

असे वाटते की शेजवलकरांचे मनात साहित्याकडे पहाण्याचा अवाङ्मयीन दृष्टिकोण, 'प्रगती' वंद झाल्यावर साकारला असला पाहिजे. कारण १९२७-३० या कालावधीत जी

परीक्षणे प्रसिद्ध झाली त्यांत प्राधान्येकरून कलात्मक अगाचाच विचार केला आहे. कादंबरीचा आकार, पुस्तकाची छपाई व सजावट. भाषा व शुद्धलेखन, रचना आणि तंत्र. स्वभावचित्रे. समाजचित्रे. लेखकाची पार्श्वभूमी, या सर्व गोष्टींकडे शेजवलकरांचे लक्ष असे आणि लेखकाला न्याय देण्यावर त्यांचा कटाक्ष असे. स्वाभाविकच त्यांची परीक्षणे दीर्घ (१० ते ३० पृष्टे) विस्तृत असत: त्यांच्या विवेचनात शिरण्याचे कारण नाही, मात्र नमुना म्हणून काही उदाहरणे सांगणे इष्ट ठरेल.

"रा. तुळजापूरकर हे गडकऱ्यांच्या भाषेत शब्दवेल्हाळ आहेत. थोड्याशा काळजीने ग्रंथाचा आकार बराच कमी करता आला असता."

"सुशीलेचा देव ही कादंबरी फक्त पावणेतीनशे पानांचीच आहे. टाईपही बारीक नाही आणि एवढ्या लहान जागेत पुष्कळ गहन प्रश्न खचून भरलेले आहेत. तरीही कादंबरी नीरस झालेली नाही."

"पुस्तकाची सजावटही डोळ्यांत भरण्यासारखी आहे. मराठी वाङ्मयातील लेखक स्वतः या बाबतीत लक्ष घालताना क्वचित दिसतील. या गोष्टीला सुखठणकर हे पहिलेच अपवाद दिसतात. गोष्टींतील कथानकाशी जुळणारी त्या त्या प्रदेशाची सूचक अशी चित्रे मुद्दाम करवून घेऊन छापविण्यात ग्रंथकाराने मोठी रसिकता व समर्पकता दाखविली आहे."

"रा. तुळजापूरकरांची भाषा वर्तमानपत्रांत वाङ्मययोग्य वाटण्यासारखी असली तरी वाङ्मयात वर्तमानपत्राचीच वाटते."

"सुशीलेचा देव ही कादंबरी भाषादृष्ट्या पहिल्या दर्जाची ठरण्यासारखी नाही. ग्रंथकर्त्याचे विचार व्यक्त करण्यास समर्थ असली तरी ग्रंथाच्या महत्त्वाला शोभण्यासारखी नाही असे आम्हाला वाटते. भाषा रोजच्या बोलाचालीची आहे. तींत रसाळपणा फारसा दिसून येत नाही."

"या (शुद्धलेखनाच्या) बाबतीत हल्ली मराठीत थोडा गोंधळच माजल्यासारखा झाला आहे. पुढे विभक्ती प्रत्यय लागल्यामुळे शेवटचे ऱ्हस्व अक्षर दीर्घ होते. हा नियमही सर्वत्र पाळण्यात आलेला नाही. या वरून एक तर वामनरावांना या गोष्टीबद्दल काही वाटत नाही किंवा विकल्पाने ऱ्हस्व दीर्घ वाटेल तसा रूढ व्हावा असे त्यांस वाटते किंवा हा सर्व हलगर्जीपणाचाच किंवा छापखान्याचा दोष असावा असे अनुमान निघते."

"या कादंबरीत जी समाजचित्रे काढली आहेत ती वास्तवाशी इमान राखून फार छान काढली आहेत. वामनरावांनी मवाळ, जहाल व ज्वलज्जहाल यांच्या सन १९०७-८ सालच्या सुमाराच्या मनःस्थितीचे जे चित्र रंगविले आहे त्यावरून आजच्या वाचकांस ते वयाने मोठे असल्यास त्या काळची आठवण होईल व लहान असल्यास त्या काळातील समाजचित्र डोळ्या समोर उभे राहील. राजकीय मतमतांतराचे इतके निःपक्षपाताने काढलेले सुंदर चित्र आमच्या पहाण्यात नाही. पंचवीस वर्षापूर्वीच्या वर्तमानपत्रांच्या फायली चाळून त्या काळाची जी कल्पना येणार नाही ती वामनरावांनी अगदी थोडक्यात आणून दिली आहे."

"रा. तुळजापूरकर हे मूळचे संस्थानातील रहिवासी आहेत व म्हणूनच त्यांस संस्थानाच्या स्वराज्याचा प्रश्न जिव्हाळ्याचा वाटतो. एरवी संस्थानांची स्थिती, संस्थानिकांची वृत्ती व एकंदर तत्संबंधी प्रश्न यांस.... एवढी मोठी जागा मिळाली नसती.... तसेच

ग्रंथकाराच्या धंद्याचे प्रतिबिंब ग्रंथात सगळीकडे पडलेले दिसते."

अशी आणखी पुष्कळ उदाहरणे देता येतील. पण तसा विस्तार करण्याचे कारण नाही. मात्र शेवटच्या अवतरणाच्या अनुषंगाने हे सांगितले पाहिजे की वाङ्मयेतर गोष्टींचा उपयोग करून घेण्याची वृत्ती छुपेपणाने या सर्व परीक्षणांतून आढळून येते.

केवळ सामाजिक दृष्टिकोणातून वाङ्मयकृतीचे परीक्षण करण्याचा प्रयत्न त्यांनी केला तो 'विभावरी वाङ्मयाच्या निमित्ताने' या गाजलेल्या प्रस्तावनेत.

या प्रस्तावनेचे पहिले वैशिष्ट्य असे की एका पुस्तकाची अशी ती प्रस्तावना नसून विवेचन आहे. एका लेखिकेच्या वाङ्मयाचे आणि दुसरे वैशिष्ट्य वर म्हटल्याप्रमाणे असे की ह्या विवेचनात केवळ सामाजिक दृष्टीचा वापर केलेला आहे. शेजवलकर लिहितात. "तात्यासाहेब केळकरांना विभावरी वाङ्मयाबद्दल अत्र्यांशी मतैक्य आहे असे जाहीर सभेत सांगावेसे वाटले. त्यांना पुस्तकाची लेखिका महाराष्ट्र वाङ्मयात अत्यंत उच्च दर्जाची वाटली व तिचे सार्वत्रिक अभिनंदन होणे जरुर आहे" ही गोष्टही पटली. एवंच सर्व साहित्यिकांच्या मते विभावरी कृती मराठी वाङ्मयाला भूषणभूत ठरल्या. त्यांच्या साहित्यिक मतांबद्दल आम्हाला काहीही म्हणावयाचे नाही, तर त्या कृती समाजाला हितकारक ठरल्या किंवा काय हेच बघण्याचा आमचा मानस आहे."

अशी भूमिका स्पष्ट करून, विभावरी ज्या विशिष्ट संस्कृतीत आणि परंपरेत वाढली, त्या सामाजिक चौकटीची, आपल्या खास शैलीत शेजवलकरांनी सविस्तर छाननी केली. त्या विवेचनाच्या तपशीलात शिरणे वा त्याच्या सत्यासत्यतेबद्दल लिहिणे येथे अप्रस्तुत ठरेल पण या सामाजिक विश्लेषणाच्या पार्श्वभूमीवर विभावरी वाङ्मयाची कारणमीमांसा केल्यावर शेजवलकर ज्या निष्कर्षापर्यंत येतात ते मात्र सांगितले पाहिजेत.

१) विभावरीने वैशाखाचा निरोप घेतला, काही काळ आलेल्या विषण्णतेने निःश्वास टाकले आणि मग आपणाला आधी वाटले ते एक स्वप्न होते असे तिला वाटले. हे असे घडणे अपरिहार्य होते. कारण जग हे अशा, जगाची तमा न बाळगता, वैराग्याच्या आणि त्यागाच्या मार्गाने जाणाऱ्या आणि आपले आयुष्य चुकत ठेचकाळत पुढे जाणाऱ्या अपूर्ण मानवांचेच ईश्वराने बनविलेले आहे. त्यांच्याकडून मार्ग निघण्याची आशा असते. पण आपला वैयक्तिक ठसा उठवू पहाणाऱ्या उठवळ माणसाकडून नसते."

२) वैयक्तिक जगाची कल्पना सदाशिवपेठी संस्कृतीतच उगम पावते, स्वयंकेंद्रित स्वार्थी माणसांच्या जातीवर उमटू शकेल.... सहाजिकच त्यांची संख्या एका झाडाच्या फळावर जगू शकणाऱ्या पाखराइतकीच भरते..... विभावरीबाईंच्या नायिकेचे सदाशिव पेठेतील किंवा नारायण पेठेतील ..... मास्तरणी नायिकांचे जग केवढेसे मोठे असणार? याची जाणीव खुद्द लेखिकेला सुद्धा आहे. त्यातून बाहेर भरारी मारण्याची ध्येयवत्ता त्या संस्कृतीतच नाही त्याला बाई तरी काय करणार?

३) प्रथम जनाचा किंवा मनाचा कोणताही आडपडदा न ठेवता आपले मन नायिकांच्या रूपाने जगासमोर मांडणाऱ्या विभावरीबाई पुढे रोहिणीचा बुरखा घेऊन " म्हणून मी बोलणार नाही आणि उघडणार नाही माझे मन " असे म्हणावयाला लागलेल्या दृष्टीस पडतात. प्रथम टराविकाच्या पलीकडे जाणाऱ्या. लौकिकी कडक औदासिन्याने पहाणाऱ्या वैशाखाकडे त्यांचे

मन ओढले, पण त्याला दुरूनच नमस्कार करावयाचे ठरविले..... त्यांना अखेरपर्यंत वैशाख सामान्य माणसांपेक्षा कित्ती कित्ती वेगळा वाटत होता. पण त्याला आपल्या पचनी पाडून घेण्याचे धैर्य त्यांना झाले नाही. . . म्हणून त्यांनी त्या देवाचे विसर्जन केले.

या निष्कर्षांचे वैशिष्ट्य असे की आपल्या सामाजिक विश्लेषणापासून ज्या निष्कर्षांपर्यंत पोचले आणि विभावरीबाईंचे वाङ्मयीन चित्रण यात साम्य आढळून येते. आणि म्हणून त्या विवक्षित समाज संस्कृतीतले सत्य जाणून घेण्यास एकमेकाला पूरक ठरतात.

मानव हा कळप करून राहणाऱ्या प्राण्यांच्या वर्गात मोडतो. तो पूर्णपणे स्वावलंबी नसतो. तो समाजाचा एक घटक असतो आणि कमीअधिक प्रमाणात परावलंबी असतो. म्हणून प्रत्येक वाङ्मयीन कृतीला वैयक्तिक आणि कलात्मक बाजू असते. सामाजिक परिमाण असते. समाजाच्या प्राथमिक किंवा अविकसित अवस्थेत वैयक्तिक आणि कलात्मक बाजूला प्राधान्य दिले जाते. पण समाज विकसित होत जातो तसे त्याचे परावलंबित्व वाढते आणि सामाजिक बाजूला प्राधान्य मिळते. माणसाकडे एक व्यक्ती म्हणून पहाण्यापेक्षा समाजाचा एक घटक म्हणून पहाण्याची गरज भासू लागते.

आधुनिक दळणवळणाची साधने अस्तित्वात नव्हती, शिक्षण मर्यादित होते आणि छापखान्याचा शोध लागला नव्हता तेव्हा आपली जात, आपला गाव म्हणजेच समाज असे गृहीत धरले जात असे आणि अशा समूह जीवनात एकजिनसीपणा बऱ्याच प्रमाणात आढळून येई. अशा परिस्थितीत प्रेम, द्वेष, संशय, असूया, राग, निष्ठा अशा मूलभूत मनो-व्यापारावर आधारलेले वाङ्मय निर्माण होणे स्वाभाविक असते आणि अशा कलाकृतीला व्यक्तिगत अंगांनी प्राधान्य मिळते आणि सामाजिक परिमाण पुसट असते.

पण भांडवलप्रधान उत्पादनपद्धती आणि तज्जन्य वितरणपद्धती एखाद्या देशाने स्वीकारावयाचे ठरविले की जे सामाजिक परिवर्तन घडून येते ते सर्वव्यापी, सर्वंकष आणि अटळ असते. भारताने आता ही भांडवलप्रधान पद्धती स्वीकारलेली आहे आणि ती अंमलात आणण्यात महाराष्ट्र अग्रेसर आहे. म्हणून मराठी वाङ्मय, विशेषतः ललित वाङ्मय व त्यांतील सामाजिकता भविष्यकाळात बदलून जाणे अपेक्षित आहे. तसे झाले नाहीतर प्रत्यक्ष जीवन आणि वाङ्मय यांत तफावत निर्माण होईल. असे होऊ नये म्हणून लेखक आणि टीकाकार यांना या परिवर्तनाची जाणीव व्हायला हवी. लेखनातील सामाजिक आशय अधिक विस्तृत, अधिक गहिरा होत जाईल अशी काळजी लेखकांनी घेतली पाहिजे. आणि ललित वाङ्मयात व्यक्त होणारा सामाजिक आशय योग्य मार्गावर आहे किंवा नाही. वाङ्मयेतर ज्ञानशाखांच्या अभ्यासकांनी वेळोवेळी तपासून पाहिले पाहिजे.

शास्त्र हे कृतीच्या पश्चात निर्माण होते म्हणून भविष्यकाळाचा वेध घेण्यात शास्त्रकार बहुधा असमर्थ ठरतात. पण कलावंताची गोष्ट वेगळी. तो आपल्या प्रतिभेच्या दिव्यचक्षूने सभोवती घडून येणाऱ्या परिवर्तनाचे दृश्य रंगवून, प्रत्यक्षात ते घडून येण्याला सहाय्यभूत होऊ शकेल. असे काही घडले तर कला आणि शास्त्र यांचे साहचर्य समाजाला उपकारक ठरेल आणि असे काही घडले नाही तर अर्थातच भावी प्रगतीचा मार्ग सुकर होण्याऐवजी दुष्कर होईल.

शेजवलकरांचे लेखन वाचीत असताना असा अनुभव आला की माझ्यासारख्या सामान्य आणि वय झालेल्या माणसालाही विचारप्रवृत्त करण्याची ताकद त्यांच्या लेखणीत आहे. माझ्याप्रमाणेच इतरांना असा अनुभव आला तर शेजवलकरांच्या लेखनाचे ते एक मोठे वैशिष्ट्य ठरेल.

(मो. वि. भाटवडेकर, ३ चैत्राली अपार्टमेंट्स्, प्रभात रोड, ५ वी गल्ली, पुणे ४)



## साभार पोच

- पूर्वा : जयंत भिडे, सिग्नेट प्रकाशन, पुणे. पृष्ठे ७२, पंचेचाळीस रुपये.
- प्राक्तन : द. र. पुरंदरे, संदर्भ प्रकाशन, पुणे. पृष्ठे १२८, साठ रुपये.
- तुकाराम गाथा : डॉ. एस्. एस्. भोसले व प्रा. डी. पी. कांबळे, प्रगती प्रकाशन, मुंबई. पृष्ठे २२७, पंचावन्न रुपये
- ओंजळीतली फुले : प्रमोद प्रभुणे, सुरभी प्रकाशन, पुणे. पृष्ठे ६०, साठ रुपये.
- राजकुमारी डायना : रा. सो. सराफ, श्रीविद्या प्रकाशन, पुणे. पृष्ठे १०३, सव्वाशे रुपये.
- घुसमट : डॉ. प्रफुल्लता सुखटणकर, योगीराज प्रकाशन, मुंबई. पृष्ठे ४६, चाळीस रुपये.
- शायरी पुण्याची : संपा. सुरेशचंद्र सुरतवाला, सैय्यद आसिफ, प्रकाशक सुरेशचंद्र सुरतवाला, पृष्ठे १८४, ऐंशी रुपये.
- दिपवा : निरंजन उजगरे, भावना प्रकाशन, मुंबई. पृष्ठे ६२, पन्नास रुपये.
- शेरी : मधुवंती सप्रे, प्र. शुभांगी श्रीनिवास कारंडे, पृष्ठे ५४, तीस रुपये.
- हसले आधी कुणी : मधुवंती सप्रे, प्र. शुभांगी श्रीनिवास कारंडे, मुंबई. पृष्ठे ४७, वीस रुपये.
- घाशीराम एक वादळ : दीपक घारे, ग्रंथाली, मुंबई. पृष्ठे १५१, शंभर रुपये.
- अंतार्जीची खबर : नंदा खरे, ग्रंथाली, मुंबई. पृष्ठे १८७, दोनशे पन्नास रुपये.
- शिक्षण - चित्र : प्रा. राम जोशी, ग्रंथाली, मुंबई. पृष्ठे २१८, दीडशे रुपये.
- महाराष्ट्रातील सत्तांतर : राजेंद्र होरा, सुहास पळशीकर, ग्रंथाली, मुंबई. पृष्ठे १३०, शंभर रुपये.
- प्रकाश पाझर : राम कदम (तळवेलकर), शारदा प्रकाशन, ठाणे. पृष्ठे ६८, चाळीस रुपये.
- काने कोपरे : व्यंकटेश वळसंगकर, मराठी साहित्य मंडळ, स्टेशन बझार, गुलबर्गा. पृष्ठे ३७, पंचवीस रुपये.
- शिवारमाथा : प्रभाकर गुंडाळे, प्रतिभास प्रकाशन, जिंतूर. पृष्ठे ३२, वीस रुपये.
- उगवले नारायण : इंद्रजित भालेराव, प्रतिभास प्रकाशन, जिंतूर. पृष्ठे ३२, वीस रुपये.
- भिंगुळवाणा : इंद्रजित भालेराव, प्रतिभास प्रकाशन, जिंतूर. पृष्ठे ७१, साठ रुपये.
- महाभारताचे वरदान : श्री. रं. भिडे, राजहंस प्रकाशन, पुणे. पृष्ठे ४७६, तीनशे रुपये.
- अणू विवेक : दिलीप कुलकर्णी, राजहंस प्रकाशन, पुणे. पृष्ठे १४१, साठ रुपये.

**परिवर्तन प्रकाशन, परभणी.**

- मनोरंजक कोडी : अशोक कुरडे, पाच रुपये.
- छान छान कविता : अशोक कुरडे, सात रुपये.
- मजेदार कोडी : अशोक कुरडे, सात रुपये.

द्विदल : डॉ. द. भि. कुलकर्णी

## मर्ढेकरांचे काव्यशास्त्र आणि काव्य यांचा संबंध

डॉ. स. त्र्यं. कुळी

आंध्र प्रदेश साहित्य परिषदेने प्रकाशित केलेले 'द्विदल' हे डॉ. द. भि. कुलकर्णी यांचे पुस्तक मर्ढेकरांवरील एक महत्त्वाचे पुस्तक आहे. कै. डॉ. ना. गो. नांदापूरकर व्याख्यानमालेत 'मर्ढेकर: काव्यविचार आणि काव्य: अन्योन्य संबंध' असा अनवट विषय त्यांनी निवडला होता.

समकालीन साहित्याचा दीपस्तंभ असणाऱ्या मर्ढेकरांवर स्वतंत्र ग्रंथनिर्मिती कमी प्रमाणात झाली. 'मर्ढेकरांचे सौंदर्यशास्त्र : पुन:स्थापना' करणाऱ्या दभिंनी मर्ढेकरांचे काव्य व काव्यशास्त्र यातील संबंध प्रथमच उलगडून दाखविला आहे. या दृष्टीने पुस्तकाच्या विषयाचे वेगळेपण नजरेत भरते. मर्ढेकरी काव्य व काव्यशास्त्र याविषयीचा दभिंचा व्यासंग आणि त्यांचे मर्ढेकर प्रेम सर्वश्रुत आहे. शिवाय पुस्तक व्याख्यानाच्या स्वरूपात असल्याने रूक्ष सैद्धान्तिक विवेचन असे त्याचे स्वरूप न राहता त्यात उत्स्फूर्तपणा व जिवंतपणा आला आहे.

मर्ढेकरांच्या अभ्यासकांना वेगळी दिशा दाखविणाऱ्या त्यांच्या काव्य व काव्यविचाराचे नवीन अर्थन करणाऱ्या या पुस्तकातील सर्वच सिद्धान्त सर्वांना मान्य होतील असे नव्हे; किंबहुना आजवरच्या रूढ समजुतीला दभिंनी धक्का दिल्याने त्यांनी मांडलेल्या मतांविषयी मतभेदच होण्याची शक्यता जास्त आहे. प्रस्तुत लेखकालाही 'द्विदल' हे मौलिक पुस्तक वाटत असल्याने त्यातील महत्त्वाच्या सिद्धांतांविषयी मतभेद व्यक्त करून विरोधी भक्ती प्रकट करीत आहे.

'मर्ढेकरांचा काव्यविचार' या पहिल्या प्रकरणात पुढील मुद्दे सांगितले आहेत :

(१) सौंदर्य पाहिल्यानंतर सौंदर्यनिर्मितीची प्रेरणा होते हे मर्ढेकरांच्या सौंदर्यशास्त्राला मान्य नाही. कलावंताच्या अंत:करणामध्ये एक अमूर्त सौंदर्यसंवोध असतो. जीवनातील विद्रूपतेच्या प्रयत्नाने कवीच्या अंत:करणाला, त्याच्या सौंदर्यवृत्तीला जो प्रतिकूल हेलकावा बसतो, त्या प्रतिकूल हेलकाव्यातून काव्यनिर्मितीचा प्रारंभ होत असतो.

(२) सौंदर्यकल्पनेला धक्का बसून कवी जीवनाचे मर्मदर्शन घेतो त्यावेळी त्याची अनुभूती कधीही एकेरी नसते, ती द्विदल असते. या द्विदल अनुभूतीतील एक पद नेहमी अध्याहृत आणि दुसरे पद प्रकट असते.

(३) कवीचा अनुभव भाषांकित असला पाहिजे; म्हणजे अनुभवाला भाषारूप द्यायचे नाही तर भाषेच्या माध्यमातूनच अनुभूती कवीला आली पाहिजे.

खरे म्हणजे सुंदर असो की असुंदर, त्याच्या दर्शनाने तात्काळ काहीच निर्मिती होत नाही. कालांतराने दोहोंच्याही अनुभवाने काव्यनिर्मिती होऊ शकते. केवळ असुंदराच्या प्रयत्नानेच निर्मितीची प्रेरणा मिळते असे नाही तर रम्य ते बघूनही मनात गाणे जागे होऊ शकते. खुद्द मर्ढेकरांच्या अनेक कविता. शिव-सुंदराच्या दर्शनाने निर्माण झालेल्या नाहीत का? उदा. 'आला आषाढ श्रावण', 'शुभ्र-तिमिर-मोहक-वसना', 'न्हालेल्या जणू गर्भवतीच्या', ह्या निसर्गपर कविता; 'अभ्ररम्य पश्मिनी मोकळ्या', 'दवांत आलीस भल्या पहाटे' ह्या आणि 'शिशिरागमा'तील प्रेमकविता; 'ह्या गंगेमधि गगन वितळले', 'भंगु दे काठिन्य माझे', 'पोरसवदा होतीस' इत्यादी भाव जागृत करणाऱ्या कविता शिव आणि सुंदर यांच्या दर्शनातून चिंतनातून निर्माण झाल्या नाहीत का?

तसेच मर्ढेकर म्हणतात त्याप्रमाणे सौंदर्यवृत्तीला नव्हे तर कवीच्या मनातील नैतिकभावाला, जीवनमूल्यभावाला धक्का बसतो आणि त्याच्या भावना उचंबळून येतात. कलावंताच्या मनात एक मूल्यव्यूह असतो. शिवाच्या आणि मांगल्याच्या दर्शनाने हा मूल्यव्यूह प्रभारित होऊन मानवाच्या मंगल जीवनाची आदर्श स्वप्ने तो रेखाटतो. ज्ञानेश्वरांचे 'पसायदान', केशवसुतांचा 'नवा शिपाई', मर्ढेकरांचे 'नव-पसायदान' (भंगु दे काठिन्य) ही त्याची उदाहरणे होत.

मर्ढेकरांच्या मते कवीची अनुभूती म्हणजे भावनानिष्ठ समानतांची प्रस्थापना, अनुभूतीतील घटकांमध्ये सौंदर्यभावनेच्या साह्याने संबंध प्रस्थापित करणे म्हणजे भावनानिष्ठ समानता निर्माण करणे.

मर्ढेकरांच्या यांत्रिक रूपवादामुळे प्रतिमानिर्मितीच्या प्रक्रियेतील एक महत्त्वाची बाब त्यांच्या लक्षात आली नाही. दोन पदांतील संबंध हा संवाद-विरोध असा लयतत्त्वानुसार प्रस्थापित होतो असे ते म्हणतात परंतु दोन पदांमध्ये संबंध प्रस्थापित करण्यासाठी लेखकाचे काही प्रयोजन असते, हेतू असतो. एकाच वेळी त्याची जाणीव आणि नेणीव कार्य करते. जाणिवेच्या पातळीवर लेखकाच्या जीवनविषयक जाणिवा, त्याची जीवनदृष्टी, त्याचा वैचारिक - तात्त्विक अभिप्राय आणि नेणिवेच्या पातळीवर त्याचे व्यक्तिमत्त्व, त्याच्या अप्रकट भावना, वासना आणि मनःकोषातील स्मृती कार्य करीत असतात. मर्ढेकर त्यांच्या आकृतिवादी भूमिकेनुसार दोन पदांतील संबंध जीवननिरपेक्ष असा केवल, निर्लेप सौंदर्यतत्त्वानुरूप, लयतत्त्वानुरुप निर्माण होतो म्हणतात. प्रत्यक्षात त्यामागे अंतःकरणातील दीर्घकालीन वासना व आवेग असतात. एका दीर्घ आत्मसंघर्षाची व भावनात्मक परिपक्वतेची ती परिणती असते.

भाषेच्या माध्यमातूनच कवीला अनुभूती येते, हे मर्ढेकरांचे म्हणणे व्यवहाराला धरून नाही. अनुभूती ही आधी भावरूप असते आणि मग तिला भाषारूप मिळते.

'मर्ढेकरांच्या काव्यातील नवीनता' ह्या प्रकरणात डॉ. दभिंनी मर्ढेकरी काव्याचे वेगळेपण व नावीन्य कशात आहे ते स्पष्ट केले. यंत्रयुगाचे संदर्भ त्यांच्या काव्यात आहेत, उद्योगसंस्कृतीवर ते भाष्य करतात, म्हणून ते नवकवी नाहीत. ही कालसापेक्ष अशी आधुनिकता आहे मर्ढेकरांच्या कवितेतील नवीनता प्रतिभासापेक्ष आहे हे विशद करताना 'ओठावर आली पूजा', 'पोरसवदा होतीस', 'भटकत फिरलो भणंग आणिक',

'ह्या गंगेमधि गगन वितळले' ह्या कवितांचे अंतरंग मर्मज्ञतेने आणि रसिकतेने दभिंनी उकलून दाखविले, आहे.

'ओठावर आली पूजा' या कवितेतील 'रात्रही का वैऱ्याचीच / घालशील गा जन्माला?' या ओळीतील 'रात्रही' 'रात्रसुद्धा' हा शब्द आतापर्यंत आम्ही 'रात्र ही' (ही रात्र / दर्शक सर्वनाम) असाच वाचत होतो. पण दभिंसारखे साक्षेपी समीक्षक सूक्ष्मतेने कवितेचे अवलोकन, आकलन करतात आणि कवितेच्या अर्थाचा मोहराच बदलवून टाकतात.

'पोरसवदा होतीस' या कवितेतील अर्थसौंदर्य बारकाव्यानिशी त्यांनी स्पष्ट केले. त्या कवितेत आलेले काळाचे आणि अवयवाचे संदर्भ यांनी अनुभव कसा जिवंत आणि व्यामिश्र झाला आहे हे मार्मिकपणे दाखविले. इथे मी एवढीच पुस्ती जोडतो की, काल-आज-उद्या यातून काळाचे आणि जीवनप्रवाहाचे सातत्य कवीला दाखवायचे आहे. स्त्रीच्या मातृत्वाचा व सृजनशीलतेचा गौरव हा या कवितेचा आशय आहे. निसर्गाने स्त्रीवर पुढच्या पिढीच्या निर्मितीची, जीवनसातत्याची जबाबदारी टाकलेली आहे. हे तिचे कालप्रवाहाशी समांतर असलेले जीवनप्रवाह निर्मितीचे सातत्य कवीला यातून दाखवायचे आहे.

दुसरे म्हणजे यातील 'काल' आणि 'उद्या' यांनी केवळ कालांतर सुचविले नाही तर अवस्थांतर सुचविले आहे. सिद्धार्थ, यशोधरा आणि राहुलचा त्याग करून निघून जातो. अनेक वर्षांनंतर आता तो बुद्ध बनून भिक्षा मागण्यासाठी स्वतःच्या घरी आला आहे. अजिंठ्याच्या चित्रकाराने हे चित्र रंगवताना (आध्यात्मिकदृष्ट्या) उंच, विराट बुद्ध आणि त्याला भिक्षा घालणारे (सामान्य मानवी पातळीवरचे) छोटे यशोधरा व राहुल रंगवले आहेत. याही कवितेत कालची अल्लड पोर उद्या माता बनून येईल तेव्हा ती साधी स्त्री न राहता नवनिर्मितीचे प्रतीक जगन्मातेचे एक रूप बनून येईल. तिच्या या विराट रूपाने आश्चर्यमुग्ध झालेला कवी तिच्या पायाचे तीर्थ घेण्याची इच्छा व्यक्त करतो!

'भटकत फिरलो ....' या कवितेतील 'सांडावी जशी थेंबांची सर । चांदण्यात कुणी झाडावरली' या ओळीतील प्रतिमा त्या कवितेच्या अर्थभांडाराची व सौंदर्य-खजिन्याची गुप्त कळ आहे. निदान मी तरी आतापर्यंत या ओळीचा अर्थ कवितेतील प्रेयसीच्या सौंदर्याशी व माधुर्याशी जोडला होता. मुशाफिराच्या जीवनात आलेल्या या नव्या स्त्रीचे सौंदर्य कसे आहे, तर चांदण्यात झाडावरून ओघळणारी पाण्याची सर जशी सुंदर व मोहक दिसेल त्याप्रमाणे. पण दभि या प्रतिमेत असलेला 'तिळा उघड'चा मंत्र म्हणतात. आपल्याला दाखवून देतात की, या ओळींमध्ये एक दृश्य प्रेमकहाणी ('रणांगण' मधील चक्रधर व हॅर्टा यांच्या प्रेमकहाणीला समांतर जाणारी?) दडलेली आहे.

भणंगासारखे भटकत फिरणारा 'मिळेल तिथे व मिळेल ते पाणी प्यालेला' मूल्य न जाणणारा, केवळ तात्कालिक सुख घेणारा हा मुशाफिर. प्रथमच त्याला खराखुरा अनुभव येतो.

शिंपित आलीस तोच माधुरी
सहज नाचऱ्या डोळ्यांमधली,

सांडावी जशी थेंबांची सर
चांदण्यात कुणी झाडावरली.

ज्यांची मने जुळलेली आहेत, असे दोघेजण. चांदण्या रात्री फिरायला निघालेले. अचानक पावसाची सर येते. एका छोट्या झाडाखाली ते थांबतात. पाऊस निवून गेला, पानांवर पावसाचे पाणी साकळलेले आणि ते झाड प्रिय व्यक्तीने खोडकरपणाने हलविले. पानांवर साकळलेल्या पाण्याच्या थेंबांची सर त्या चांदण्या रात्री मुशाफिराच्या अंगावर सांडते आणि एका अननुभूत, अपूर्व अनुभवाची शिरशिरी त्याच्या शरीराला व जीवनाला येते. प्रेमाच्या साक्षात्काराने त्याच्या व्यक्तिमत्त्वाचीच पुनर्घटना होते, त्याचा मनःकल्प होतो. त्याची कालची तहान (वासनेची) मरते. गळ्यात आज दुसरीच कोरड (खऱ्या प्रेमाची) उरते. अवघे शरीर, अवघे अस्तित्वच आता तहानलेले झाल्याने (वासनेच्या) ओंजळीने तहान शमविण्याचा प्रयत्न व्यर्थ आहे. कालचा (आसक्तींचा) ओठ वाळला; आज त्यावर (उत्कट प्रेमाची) निराळीच लाही आहे आणि उत्कट प्रीतीची प्रचंड तहान भागविण्यासाठी अवघ्या 'अंतरा'ने (हृदय / अवकाश) 'आ' वासलेला आहे!

एखादा सुज्ञ समीक्षक रसिकतेच्या मंत्राने वाङ्मयकृतीच्या अंतरंगातील सौंदर्य-भांडार कसे उघडे करतो याचे हे उत्तम उदाहरण आहे.

असेच दुसरे उदाहरण 'ह्या गंगेमधि गगन वितळले' कवितेचे. ही कविता महात्मा गांधींवर आहे असा समज पुष्कळ संपादकप्रकाशकांचा झाला. दभिंच्या मते मर्ढेकरांना गंगेच्या सहवासात अलौकिक सौंदर्यानुभूती आली. ती इतकी अपार्थिव होती की, असं वाटत होतं की, अर्ध्या हाकेवर बुद्धगयेचा वारा उतरला आहे

ह्या गंगेमधि गगन वितळले
शुभाशुभाचा फिटे किनारा;
अर्ध्या हाकेवरी उतरला
बुद्धगयेचा पिवळा वारा.

मर्ढेकर गगन 'विरघळले' म्हणत नाहीत 'वितळले' म्हणतात. कारण त्यांना अनुभवाचे निवेदन करायचे नाही तर अनुभवाची निर्मिती करायची आहे. ही रात्रीची वेळ आहे. चांदणी रात्र, टिटवीचे ओरडणे. चांदण्याच्या प्रकाशातील निळे आकाश आणि गंगेचे विशाल पात्र असे वाटत की, पाणी नाही तर आकाशच वितळून वाहात येत आहे. एक दिव्यानुभूती कवीला होते आणि शुभाशुभाचे, जीवनातील द्वैताचे किनारे फिटतात; बुद्धाचा करुणाभाव मनात निर्माण होतो.

दभिंचे या कवितेवरील विस्तृत भाष्य मुळातूनच वाचले पाहिजे. प्रस्तुत लेखकाचे या कवितेसंबंधीचे स्वतंत्र आकलन येथे नोंदवतो:

या कवितेतील अनुभूती सौंदर्यानुभूती नसून आध्यात्मिक अनुभूती आहे आणि मर्ढेकरांच्या आध्यात्मिक प्रवासातील शिखरस्थानी असलेली ही कविता आहे. बौद्धगयेच्या ज्ञानमय आसमंतात पवित्र गंगेच्या काठी कवी उभा आहे. गंगेत निळसर आभाळ वितळले आहे. 'वितळले'च का? 'ओघळले', 'मिसळले' का नाही? कारण ह्या स्थिर, अचल, वेदरकार आकाशाशीच 'मी'ने वैर मांडले होते. ज्या आभाळाची भिवई दगडी

आहे, मग्रूर आहे, जी कधी चळत नाही. 'मी'चा जन्मभराचा जिवाचा आकांत पाहून, भोळा भक्तिभाव पाहून जणू 'तो' द्रवतो, त्याची उग्र. विस्फारलेली, कधी न चळणारी भिवईही चळते, वत्सल बनते. आभाळाचा कधी न झुकणारा, तुटणारा कर्मठ सांधा भोळ्या भक्तीच्या गंगेत 'वितळून' जातो. आभाळाचे हे अवजडपण, कर्मठपण, पोलादीपण दर्शविण्यासाठी 'वितळले' हा शब्द. 'गगन'च का? 'आकाश', 'आभाळ' का नाही? गगन केवळ अनुप्रास साधण्यासाठी नव्हे, तर 'गंगा-गगन' यांचे ऐक्य दर्शविण्यासाठी. गगन ह्या शब्दातून निर्माण होत जाणाऱ्या ध्वनिलहरींनी गगनाचे अफाटपण लक्षात येते. गगन-गंगेच्या एकरूपतेची प्रचीती येते. स्वर्ग-धरेचे पार्थिव-अपार्थिव मीलन होते. या उदात्त आध्यात्मिक अनुभवाने कवीचे व्यक्तिमत्त्व उन्नत होऊ लागते. शुभ-अशुभ, पाप-पुण्य ही द्वंद्वे नाहीशी होतात. 'ह्या गंगेमधि....' ही कविता मर्ढेकरांच्या आध्यात्मिक प्रवासातील महत्त्वाचा (आणि शेवटचाही) टप्पा आहे. म्हणून मर्ढेकरांच्या आणि एकूण मराठी कवितेत तिला एक वैशिष्ट्यपूर्ण आणि मोलाचे स्थान आहे.

'द्विदल'च्या तिसऱ्या व अखेरच्या प्रकरणात मर्ढेकरांच्या काव्यातील महात्मता कशात आहे, हे सांगितले आहे. दभिंच्या मते मर्ढेकरांचे काव्य जीवनसन्मुख, समाजमनस्क आहे. त्यांच्या अनेक कवितांत द्वितीय महायुद्धोत्तर वाताहतीचा आशय आहे. मर्ढेकरांचे काव्य हे असे वेदनेचे काव्य आहे. ही वेदना मानवसंहाराची तशीच मूल्य-संहाराचीही आहे. दभि म्हणतात "त्यांच्या कवितेला अंतिम जीवनमूल्यांचेच वेध लागले आहेत परंतु त्यांचे आकलन नाही यासाठी ती व्याकुळ आहे. त्यांच्या या अपार्थिव वेदनेनेच कवितेचे रूप धारण केले आहे. सैगलचा दर्दभरा सुरेल आवाज तसेच अंतिम जीवनमूल्याच्या साक्षात्कारासाठी व्याकुळ झालेली मर्ढेकरांची सुंदर वेदना हीच त्यांची कविता."

अशा प्रकारे कवितारूप प्रास्ताविकापासून परिशिष्टापर्यंत मर्ढेकरांच्या कवितेचे अभिनव दर्शन लेखकाने घडविले आहे. काव्यात्म प्रस्तावनेत मर्ढेकरांच्या व्यक्तिमत्त्वाचे व त्यांच्या कार्याचे यथार्थ मूल्यमापन केले आहे. परिशिष्टातही मर्ढेकरांच्या काव्यातील अनोखे अलंकार प्रकट केले आहेत. एका परिशिष्टात 'फलाटदादा' कवितेतील फलाटदाद व त्याच्याशी बोलणारा कोण एक, याचे विवेचन आले आहे. डॉ. प्रभा गणोरकर (आणि इतरही समीक्षक) यांनी फलाटदादाशी बोलणारा रेल्वेस्टेशनवरील हमाल असा अर्थ लावला आहे. हमाल हा तर्काला पटणारा अर्थ असला तरी दभिंनी या कवितेचा एक हृद्य अर्थ सादर केला आहे. खेड्यातून किंवा झोपडपट्टीतून आलेला बेवारशी मुलगा आणि त्याचा आप्त-मित्र, गुरू, दादा असलेला फलाट यांच्या निर्मळ नात्याची, आकांक्षांची ही कविता आहे, असा हृदयस्पर्शी अर्थ त्यांनी लावलेला आहे.

सारांश, उण्यापुऱ्या शंभर पानांच्या पुस्तकात लेखकाने मर्ढेकरांचे व्यक्तिमत्त्व, त्यांचे काव्य आणि काव्यमीमांसा याबद्दल इतके महत्त्वाचे मुद्दे आणि अभिनव निरीक्षणे सादर केली आहेत की, त्यांचा विस्तार हा मोठ्या ग्रंथाचाच विषय व्हावा.

**असे असले तरी या पुस्तकातील मुख्य प्रतिपाद्याशी मतभेद नोंदवणे आवश्यक आहे. द्विदल मधील प्रमुख प्रतिपाद्य असेः मर्ढेकरांचा काव्यविचार आणि त्यांचे काव्य जीवनसन्मुख आहे. मर्ढेकर आकृतिवादी, रचनावादी नाहीत. मर्ढेकरांचे**

काव्य जीवननिष्ठ, समाजनिष्ठ आहे आणि त्यांचा काव्यविचारही रूपवादी नसून जीवनमूल्यनिष्ठ समाजमनस्क आहे.

प्रस्तुत लेखकाच्या मते मर्ढेकरांचे काव्य जीवनवादी, आशयवादी, समाजमनस्क आहे; तर त्यांचा काव्यविचार रूपवादी, आकृतिवादी, जीवनविन्मुख असा आहे. दि. के. बेडेकर, शरच्चंद्र मुक्तिबोध व इतर पुरोगामी समीक्षकांनी मर्ढेकरांवर हाच आक्षेप घेतला आहे.

प्रस्तुत लेखकाचे मर्ढेकरी कवितेविषयीचे आकलन असे: मर्ढेकरांची कविता ही युगांताची कविता आहे. त्यांच्या कवितेला भारतीय व जागतिक परिस्थितीच्या उभ्या आडव्या अक्षांश-रेखांशाची पार्श्वभूमी आहे. दोन महायुद्धे, भारतीय स्वातंत्र्य, भीषण दंगली, भांडवलशाहीची पतितावस्था, बेसुमार शहरीकरण, यांत्रिकीकरण, मूल्यांचा ऱ्हास, विज्ञानातील विलक्षण शोध यांच्या ताणाने थरथरणारा हा कालखंड होता.

प्रबोधन युगात मध्यमवर्गाच्या नेतृत्वाखाली व्यक्तिस्वातंत्र्य व मानवी समता यावर आधारलेले विश्वबंधुत्वाचे भव्य स्वप्न पाहिले गेले. विसाव्या शतकाच्या मध्यावर उभे राहून मर्ढेकर पाहतात तेव्हा त्यांना या स्वप्नाचे तुकडे विखुरलेले दिसतात. हा दारूण स्वप्नभंग, त्यातून आलेले वैफल्य आणि त्यामुळे निर्माण होणारा आत्मदुरावा हा मर्ढेकरांच्या कवितेचा गाभा आहे.

मर्ढेकरांचे मोठेपण यात आहे की, ते या युगाशी समकक्ष झाले. मध्यमवर्गीय चौकटीत पाय जखडलेले असूनही करुणेच्या विशाल बाहूंनी त्यांनी समष्टीला पोटाशी धरले. विसाव्या शतकाच्या भर मध्यान्ही चाललेला मानवतेचा आक्रोश त्यांनी शब्दबद्ध केला. दुःखी मानवतेची करुण विलापिका आपल्या काव्यातून आळविली!

मर्ढेकरांची काव्यमीमांसा मात्र आकृतिवादी, जीवनविन्मुख आहे. निखळ रूपवादी व स्वायत्ततावादी असलेली ही भूमिका जीवनदर्शनाला, मूल्यभावाला विरोध करते; कलेला जीवनापासून वेगळी करते.

सौंदर्य हे सत्यासारखे केवलमूल्य असून त्याचा जीवनार्थाशी कोणत्याही प्रकारचा संबंध नाही, असे मर्ढेकर म्हणतात. लयतत्त्व हे जीवनार्थनिरपेक्ष असे सौंदर्यतत्त्व होय. वाङ्मयीन संघटनेचे घटक जरी भावार्थयुक्त असले तरी तिचे सौंदर्य तिच्या लयनिष्ठ संघटनेत शोधायला हवे, असे त्यांचे मत आहे. जीवनमूल्यांचा व कलामूल्यांचा संबंध ते नाकारतात.

'सृष्टी, सौंदर्य आणि साहित्यमूल्य' मध्ये शरच्चंद्र मुक्तिबोध म्हणतात त्याप्रमाणे रसिकाची चित्तवृत्ती, ललित वाङ्मयाचे आकलन करताना संवादविरोध संबंधांवर स्थिर न राहता त्या घटकांमधील एकात्म अर्थाचा प्रत्यय प्राप्त करून घेते आणि त्यातून जीवनसत्याचा साक्षात्कार करून घेते. मर्ढेकरांनी संवेदनानुभवाच्या घटकांची संघटना व भावार्थांची संघटना यांमधील भेदाचा विचारच न केल्याने त्यांचा वाङ्मयविषयक सौंदर्यविचार चुकीच्या वळणावर गेला.

आशयातील, भावानुभूतीतील घटकांच्या लयबद्ध रचनेतून वाङ्मयीन कलाकृती साकार होते, असे मर्ढेकर म्हणत असले तरी इथे एक गफलत आहे. आशयाचे सर्व

जीवनसंदर्भ त्यांनी वाद केले असल्याने, भावानुभूतीतील घटकांना अर्थनिरपेक्ष स्वरूप दिले असल्याने शेवटी या सर्वांना मर्ढेकरांनी संवेदनेच्या पातळीवर आणून बसविले आहे.

दुसरे असे की, भावनावेगाच्या, स्फूर्तीच्या, निर्मितीच्या दावाखाली आशयाचा, भाव-विचार-संवेदना-कल्पनांचा, अनुभवाचा रस त्या त्या कलाकृतीचा विशिष्ट, अनन्यसाधारण आकार, रूप, घाट धारण करतो. परंतु मर्ढेकर मात्र प्रत्येक वाङ्मयकृतीच्या या आशयाच्या विशिष्ट आकृतीकडे अनुभवाच्या अनन्य रूपाकडे दुर्लक्ष करून सतत त्याला संवाद-विरोध-समतोल यांच्या ठराविक साच्यात बसवण्याचा प्रयत्न करतात. त्यांच्या या यांत्रिक व गणिती साच्यामुळे कलाकृती वैशिष्ट्यपूर्ण न राहता साच्यातून काढलेल्या शाडूच्या गणपतीसारख्या दिसू लागतील.

लयतत्त्व हे वाङमयकृतीचे संघटकतत्त्व आणि चैतन्यतत्त्व आहे, असे मर्ढेकर म्हणतात. स्वतःच्या गुणधर्मानुसार रंग किंवा नाद जवळ येताच त्यांच्यामध्ये संवाद विरोधाचे नाते उत्पन्न होऊ शकते. परंतु भावार्थाचे घटक स्वतंत्रपणे परस्परांशी संवादी किंवा विरोधी असू शकत नाहीत. समजा आपण काही उत्कृष्ट कलाकृतींमधील भिन्न भिन्न रसाचे घटक घेऊन ते लयतत्त्वानुसार जुळविले तर? 'एकच प्याला'मधील करुण प्रसंग व 'संशयकल्लोळ'मधील विनोदी प्रसंग यांच्या 'विरोध लयीतून' सौंदर्य निर्माण न होता 'एकच हास्यकल्लोळ' तयार होईल. तात्पर्य, ललितकृतीमधील घटकांमध्ये संवाद-विरोध संबंध निर्माण होतात ते वाङमयकृतीला व्यापणाऱ्या एकार्थामुळे.

कलावंताची जाणीव व बाह्यविश्व यांच्या परस्पर समावेशनातून कलाकृतीचा आशय निर्माण होतो. या आशय केंद्राभोवती कथानक, पात्रे, प्रसंग व अनुभवाचे सर्व घटक गुंफले जातात. लयतत्त्व हे केवळ प्रमाणबद्धतेचे, सौष्ठवाचे बाह्यतत्त्व आहे. मुक्तिबोध म्हणतात त्याप्रमाणे लयतत्त्व हे सृष्टीचेच तत्त्व आहे. लयबद्धता ही साहित्यकृतीची अवश्योपाधी आहे. लयनिष्ठता हे निसर्गशास्त्रीय तत्त्व आहे, सौंदर्यशास्त्रीय नाही. कलाकृतीची आंतरिक रचना लयतत्त्वानुरोधाने होते. अनुभवांच्या घटकांचे व भावार्थांचे संघटन होते ते आशयकेंद्राभोवती. कलाकृतीच्या कालक्रमानुसारी व घटनाक्रमानुसारी वाचन / अवलोकनानंतर रसिकाला कलाकृतीच्या समग्रतेचा, एकात्मतेचा प्रत्यय येतो असा सुट्या घटकांचा व त्यांच्या संबंधाचा प्रत्यय येत नाही. असा एकात्म प्रत्यय घेऊन वाङ्मयकृतीच्या आशयकेंद्राकडून तो आशयाच्या परिघाकडे येतो आणि पुन्हा आशयकेंद्राकडे जातो. या प्रक्रियेत तो कलाकृतीचे आकलन, आस्वाद व मूल्यमापन करतो.

कलावंताला जीवनाचा जो भावप्रत्यय आलेला असतो तो कलाकृतीत व्यक्त होतो. हा उत्कट जीवनप्रत्यय, भावप्रत्यय रसिकालाही येतो. कलाकृतीचे चैतन्यतत्त्व, सजीवपण यात आहे.

तात्पर्य, मर्ढेकरांचा काव्यविचार हा केवळ संवेदनेच्या पातळीवरचा, जीवनार्थनिरपेक्ष, आकृतिवादी विचार असून त्यांचे लयतत्त्व गणिती थाटाचे आहे. स्वतः मर्ढेकरांनी लयतत्त्वाच्या आधारे केलेली रसग्रहणे कृत्रिम, शब्दबंबाळ उतरली आहेत. (उलट दभिंनी मर्ढेकरांच्या कवितांची आशयानुगामी केलेली रसग्रहणे अप्रतिम आहेत.)

मर्ढेकरांचे काव्य आशयवादी, जीवनवादी आणि काव्यविचार आकृतिवादी, रूपवादी

असा अंतर्विरोध का? याचे कारण मर्ढेकरांच्या व्यक्तिमत्त्वाचे दुभंगलेपण आहे.

अनागर जीवनाची ओढ असलेले, खानदेशाच्या मातीत मुळे रूजलेले, तेथील निसर्गात व भावड्या माणसांत रंगून गेलेले, मर्ढ्याला जाऊन बैलांची जोडी घेऊन शेती करू म्हणणारे, परंपरेचे संचित व लोकभाषा यांतून जीवनरस घेणारे आणि भारतीय परंपरेतील संतसाहित्याशी नाते जोडून उदंड मानवता व्यक्त करणारे मर्ढेकर एका बाजूला तर युरोपातून वैफल्यग्रस्त, तुच्छतावादी पाश्चिमात्य जाणिवा घेऊन आलेले, मुंबई महानगरीतील अत्याधुनिक शहरी संस्कार स्वीकारलेले, पाश्चात्य नवकवी व विचारप्रणाली आत्मसात केलेले, मानवी जीवनाबद्दल अहंकेंद्रित, सिनिक दृष्टिकोण व्यक्त करणारे मर्ढेकर दुसऱ्या बाजूला.

पत्राच्या शिरोभागी 'श्रीराम समर्थ' लिहिणारे, एकुलत्या मुलाचे नाव हनुमंत ठेवू इच्छिणारे व नंतर राघव ठेवून रामभक्ती प्रकट करणारे, रामदासी परंपरेच्या घराण्यात जन्मलेले आणि सकाळी जाग आल्यावर आईच्या व रामदासांच्या प्रतिमेला नमस्कार करून मगच पलंगावरून उठून जमिनीवर पाय ठेवणारे सश्रद्ध, पारंपारिक वृत्तीचे मर्ढेकर एका बाजूला. तर पहिल्यांदा चुलत बहिणीवर, नंतर पाटणकरांवर अयशस्वी प्रेम करून, होमाय नल्लासेठ या पारशी विद्यार्थिनीशी विवाह करून आणि त्यातही अपयश आल्यावर अंजना सयाल या पंजाबी स्त्रीशी विवाह करणारे मर्ढेकर दुसऱ्या बाजूला. विज्ञानाच्या शोधांचा उपभोग घेऊन विज्ञानाला वाकुल्या दाखविणारे आणि त्याचबरोबर त्याच्या सामर्थ्याने स्तिमित होऊन सामान्य माणसाच्या सुखासाठी विज्ञानाचा वापर होत नाही म्हणून तळमळणारे मर्ढेकर सांद्र भोळा उत्कट भक्तिभाव व्यक्त करून 'दुसरा तुकाराम' या पातळीपर्यंत जाणारे मर्ढेकर एका बाजूला आणि उपरोध, भय, करपट उपहास विनोदमिश्रित विकट भक्तिभाव प्रकट करून हॉपकिन्सशी नाते सांगणारे मर्ढेकर दुसऱ्या बाजूला. मर्ढेकर स्वतःच्या दुभंगलेल्या व्यक्तमत्वाविषयी म्हणतात ते खरे आहे -

एकला असून । मनी दोन झालो
आता मात्र भ्यालो । मला मीच

सहज जाता जाता जीएंशी खालील संदर्भात मर्ढेकरांची तुलना करावी.

समकालीनत्वाच्या चंचल लहरींनी विचलित न होणारे, पूर्व-पश्चिम किंवा नागर-अनागर या ताणानी कंपित न होणारे, सख्ख्या बहिणींच्या मृत्यूनंतर मावसबहिणींना निरपेक्ष माया देणारे, त्यांच्यासाठी प्रसंगी परदेशगमनाची संधी सोडणारे व शेवटी संपत्तीही देणारे, प्रेमभंगाची जळती जखम उरात दाबून व्रतस्थासारखे अविवाहित राहणारे, द्वंद्वात्मक जीवनदृष्टीचे जीए.

परिस्थितीच्या वावटळीत पानाप्रमाणे गिरक्या घेणारे तरल, संवेदनशील मनाचे मर्ढेकर तर सुळक्याप्रमाणे स्थिर, अचल, गंभीर वृत्तीचे जीए. वृत्तीच्या निरागसतेने व चंचलतेने बहुविध जीवनानुभवांना सामोरे जाणारे, विविधतेने नटलेल्या बहुआयामी वाङ्मयाची निर्मिती करणारे मर्ढेकर तर प्रौढतेच्या परिपक्वतेच्या डोहात पाय सोडून जगाकडे औदुंबरसारख्या तत्त्वज्ञ जीवनसाक्षीच्या भूमिकेतून पाहणारे जीए.

समकालीन साहित्यातील या दोन प्रतिभावंतांची तुलना दोघांच्याही साहित्याच्या

आकलनासाठी अर्थपूर्ण ठरू शकेल.

आतापर्यंतच्या विवेचनाचे सार असे की, मर्ढेकरांचे काव्य व त्यांचा काव्यविचार ही दोन दले एकजीव नसून अलग आहेत. म्हणून दभिंचे 'द्विदल' मधील मुख्य प्रतिपाद्य विवादास्पद ठरते.

प्रस्तुत लेखकाने द्विदलच्या प्रतिपाद्याविषयी आपले प्रामाणिक मतभेद मांडले. हा वैचारिक दृष्टिकोणाचा प्रश्न आहे. त्याचबरोबर द्विदलचे मोलही प्रस्तुत लेखकाला मान्य आहे. मर्ढेकरांवरील उत्तम पुस्तकांपैकी ते आहे. त्याचा बाज पढिक पांडित्याचा नसून काव्यातील सूक्ष्म सौंदर्य उलगडून दाखविणाऱ्या रसज्ञतेचा आहे. दभिंच्या बहारदार वक्तृत्वाचे, रसिकतेचे आणि विद्वत्तेचे दर्शन त्यातून घडते. मर्ढेकरांचे एक नवे अर्थन सादर करणारे 'द्विदल' वाचकांच्या विचारांना चालना देते आणि रसिकतेला तृप्त करते.

( प्रा. स. त्र्यं. कुळी, क्षितिज, जिजामाता नगर, बुलढाणा - ४४३ ००१.)

## कमल पाध्ये

एक ज्येष्ठ सामाजिक कार्यकर्त्या व लेखिका श्रीमती कमलताई पाध्ये यांचे रविवार दि. १९ मे रोजी हृदयविकाराने निधन झाले. मृत्यूसमयी त्यांचे वय ७६ वर्षांचे होते.

एका परंपराप्रिय ब्राह्मण कुटुंबात जन्मलेल्या कमलताईंनी शिक्षण पूर्ण झाल्यावर श्री. प्रभाकर पाध्ये यांच्यासारख्या समाजवादी व पुरोगामी विचारांच्या पत्रकाराशी विवाह केला आणि त्यांनतर त्यांची एकूण जीवनदृष्टीच बदलून गेली. सेवादलासारख्या संघटनेत विशेषतः कलापथकात त्यांनी सुरुवातीला बरेच काम केले. त्यानंतर एक नगरसेवक म्हणूनही त्यांनी दादर भागातील नागरिकांचे प्रतिनिधित्व केले. आंतरराष्ट्रीय लेखक संघटनेचे चिटणीस म्हणून श्री. पाध्ये यांची नियुक्ती झाल्यावर त्यांना दिल्लीला जावे लागले. तिथेही तिबेटी निर्वासितांच्या पुनर्वसनाचे कार्य करणाऱ्या संघटनेमध्ये त्यांनी काम केले.

पुण्यात स्थायिक झाल्यावर कमलताई समाजवादी महिला सभेच्या कामातही हिरीरीने पडल्या आणि अनेक प्रकल्प- विशेषतः महिलांचे प्रशिक्षण करणाऱ्या अनेक पुस्तिका प्रकाशित करून- त्यांनी कार्यक्षमतेने पार पाडले. त्यांच्या कामातील टापटीप आणि शिस्त वाखाणण्याजोगी असे. स्त्रियांच्या प्रश्नांवर त्यांचे चिंतन, मनन सतत चालू असे. ज्या धर्माने आपल्या समाजात स्त्रीला दुय्यम स्थान दिले त्या धर्माच्या रूढी, परंपरा, अंधश्रद्धा यांच्यापासून स्त्रियांनी दूरच राहिले पाहिजे आणि स्वतंत्रपणे स्वतःचे व्यक्तिमत्त्व जोपासण्याचा प्रयत्न केला पाहिजे असा त्यांचा आग्रह असे. स्त्रियांच्या व इतर प्रश्नांच्या संदर्भात त्यांनी बरेच लिखाण केले. अलीकडेच त्यांचे 'बंध-अनुबंध' हे आत्मनिवेदन प्रसिद्ध झाले. त्याला मराठी साहित्यातील सन्मानाचा विखे-पाटील पुरस्कारही प्राप्त झाला होता. त्यांच्या या पुस्तकावर महाराष्ट्रात अनेक ठिकाणी चर्चाही घडवून आणल्या गेल्या.

एक डोळस, कार्यतत्पर व स्त्रियांच्या प्रश्नांवर अव्याहत सक्रिय राहिलेले हे व्यक्तिमत्त्व आता काळाच्या पडद्याआड गेले आहे. कमलताईंच्या कार्यकर्तृत्वाला विनम्र श्रद्धांजली.

मनाली ते कुंभमेळा : बाळकृष्ण बन्नोरे

## आंतरिक व बाह्य जीवन यांचे संमिश्र भान

डॉ. सुलभा हेर्लेकर

बाळकृष्ण बन्नोरे यांचा हा तिसरा काव्यसंग्रह ! कवितेतच गर्क असणाऱ्या या कवीचे यापूर्वीचे 'दीर्घा' व 'कालपात्र' हे दोन संग्रह. कवितांच्या शीर्षकांवरून हे काव्यसंग्रह वेगळे आहेत हे जाणवतं ! अंतर्मनात चाललेल्या संघर्षाचे, तिथल्या भावस्पंदनाचे आणि अंतःचक्षूंनी पाहिलेल्या जगातल्या भ्रष्टाचाराचे विविध अनुभव ते कवितेत मांडतात. डोळ्यांनी पाहिलेले जग स्वतः अनुभवून लिहिलेल्या कविता आणि आता अंतर्मनाच्या चक्षूंनी पाहिलेले जग हे त्यांच्या 'मनाली ते कुंभमेळा' या संग्रहात दिसून येते. मनालीचे निसर्गसौंदर्य आणि कुंभमेळ्यातील माणसांची जत्रा व जगण्याला मिळालेले कुंभजळ, येथील आतषबाजी असे विलक्षण चित्र या संग्रहात टिपलेले दिसते. अपरिहार्यपणे त्यांच्या कविता दीर्घ झाल्यास नवल नाही. बन्नोरे या कवितेतून व्यक्त होणारी संवेदनवृत्ती ही आजच्या शहरी संस्कृतीत वाढलेल्या, गुंतागुंतीचे जीवन जगणाऱ्या लोकांची आहे. म्हणूनच अशा मनातील ताणतणाव, संघर्ष, त्यांच्या कवितेतून व्यक्त होतात. व्यक्तीचे आंतरिक भावविश्व व बाह्य संवेदनाविश्व, म्हणजेच अंतर्विश्व व त्याचे प्रकट जीवन यांच्या संघर्षातून स्फुरणारी ही कविता आहे. ते म्हणतात,

नरोटीला घट्ट बिलगलेला
ओल्या नारळाचा गर सोलता सोलता
'अंतरमनाचीही व्हावी कुतरओढ
अनारम्भांचे काय हे गौड-बंगाल ?

कवीच्या अनुभवविश्वाच्या केंद्रस्थानी असलेला विवक्षित गाभा हा जीवनाच्या दुःखमयतेची, शोकात्मतेची जाणीव करून देतो. स्वतःशी व स्वतःभोवतीच्या जगाशी त्याचा जो सतत संघर्ष चालू असतो त्यातून ही जाणीव उद्‌भवते. बाह्यविश्व आणि अंतर्विश्व या दोहोंच्यातील विराट दरी ओलांडावीशी वाटले. हे करीत असताना ह्या दोन्ही मार्गांची विफलता, माणसाचा अंतिम एकाकीपणा त्यांना जाणवतो आणि मानवी जीवनातील वैफल्याचा शाकात्मतेचा दुःखाचा सूर वाढत वाढत एक विशाल प्रवाह होतो. त्यातूनच त्यांची कविता एकाच विकसित दिशेचा सतत वेध घेते.

अनागताने येथे यावे तोडून बंधन कल्पांताचे !
युगायुगांच्या नगराजीशी गंगोत्रीचे जुळवित नाते

यात निसर्गच माणसाला व्यापकता प्राप्त करून देतो. असा भाव असला तरी

माणसाची निसर्गाकडे ओढ असते.

आशय आणि अभिव्यक्ती ह्या दोनही दृष्टींनी विचार करता, या कवितेचा आवाका बराच, व्यापक वाटतो. लहान कवितेचा फार्म अपुरा वाटू लागला आणि प्रसरणशीलतेची गरज भासू लागली. त्यातूनच त्यांची दीर्घ कविता जन्माला आली. जीवन स्पंदनातील सूक्ष्मातिसूक्ष्म छटांचे पीळ नेहमीच्या छोट्या कवितेच्या आकाराला पेलवेनासे झाले की अपरिहार्यपणे दीर्घ कविता जन्माला येते. ही अपरिहार्यता 'दीर्घ' या संग्रहापासून प्रत्ययाला येते. आशयाच्या सर्व बाजूंनी वाढणाऱ्या ताणाला अभिव्यक्त करण्यासाठी दीर्घ कवितेच्या आकृतिबंधाची गरज कवीला भासली असावी. संपूर्ण कवितेचा अनेकांगी तरीही सलग एकात्म प्रत्यय येणे हे जे दीर्घ कवितेचे बलस्थान आहे ते येथे दिसून येते. तिच्यातील अनुभवाचा पल्ला मोठा आहे. शिवाय तो संमिश्र आहे. तो व्यक्त करण्यासाठी दीर्घ कवितेचा आधार तसाच नवीन प्रतिमांचाही शोध घ्यावा लागला.

त्यांच्या प्रतिमासृष्टीमधे आदिम संस्कृतीची छाप जाणवते. वेद वाङ्मय, संस्कृत वाङ्मय, पाश्चात्य वाङ्मय यांच्या अभ्यासाने त्यांच्या प्रतिमा या विविध स्तरावर विविध मंत्राने प्रेरीत झाल्या आहेत.

व्यक्तीचे आंतरिक जीवन व बाह्य जीवन यांचे संमिश्र भान व एकाचवेळी वावरणारे हे दोन प्रवाह त्यांच्यातील ताण यांचे दर्शनच जणू कवी घडवतो. जीवन हे स्वप्न व काल या दोन परिमाणात गतिशील असल्यामुळे त्याचे रूप सारखे वदलत असते. त्यावेळी जी स्पंदने जाणवतात त्यांची अनेक रूपे या कवितातून पहायला मिळतात. 'माफी' या कवितेत ते म्हणतात

त्याहूनी बरवा तसाच व्रण हा<br>
तळात वणवण घुमत रहावा<br>
दंश सारखा विसळत पसरत<br>
वंश तयाचा वाढत जावा . . . (माफी पृ. ४८)

जागृत सुप्त मनातील भावना संवेदना, इच्छा, विचार, विकार व कल्पना यांचा एक गुंतागुंतीचा गतिमान भावनाप्रवाह 'माफी' या कवितेत प्रत्ययाला येतो.

भावनावेगात स्वतःला सोडूनही हलकेच वर हेलावणारी मनःस्थिती कवी व्यक्त करतो.

तू सोडिल्यास नावा ओटीत सागराच्या<br>
ते शोधिता किनारे डोळे गळून पडले (पृ. ५६)

एका बाजूला भूतकाळातल्या उघड्या डोळ्यांनी पाहिलेल्या जगातील स्मृती आणि दुसऱ्या बाजूला अटळपणे मांडले जाणारे हेतूशुन्य भविष्य यांच्यातील लोंवकळणाऱ्या वर्तमानाची ही कविता आहे. कुंभमेळ्यात ते म्हणतात,

पुन्हा एकदा आत्मीका भौतिकाचा<br>
तपासून घे पाठ कालांतराचा<br>
पडावातले शीड का आदिमांचे<br>
जळी टाकतो डाव मन्वंतराचा

किंवा

दिसे आड खाली तसे पोहरे ही
कशानी भराव्या रिकाम्या पखाली ?
जिथे चेहऱ्याचेच ना नाव - गाव
तिथे आरशाचा असे कोण वाली ? . . (कुंभमेळा पृ. ३०)

इथे भूत - भविष्य - वर्तमान यांचा वाहणारा कालाचा प्रवाहच खंडित होतो. आणि कालाच्या एका निराळ्याच परिमाणाची जाणीव होते. केवळ संवेदनाच्या पातळीवर अनुभवलेले विश्व साकार होते. माणसामाणसामधले परस्परसंबंध व वाताहत हा चिंतनाचा विषय आहे. या अनुभवविश्वाच्या रेषेवर उभे राहून कवीने संबंधाकडे पाहिले आहे. वर्गीय आत्मीयता त्यातूनच निर्माण झालेल्या सामाजिक कविताही इथे भेटतात. मात्र बन्नोरे यांच्या काही कविता सोडल्या तर इतर सहजपणे समजत नाहीत. कुंभमेळ्यात बऱ्याच ठिकाणी दुर्बोधता आढळते. मग वाटते कवीने ही जाणीवपूर्वक तर आणली नाही? पण असे नसावे. कारण त्यांच्या काही प्रतिमांनी सजलेल्या कविता गहन असूनही समजतात. वड आणि पिंपळ, कुंडली इत्यादी. मात्र एक सांगावेसे वाटते, की मोठमोठ्या चिंतनवादी प्रतिमा व शब्द वापरल्यामुळे कवितेतील कवित्व कमी होते. ती जास्त शब्दाळू बनते. प्रोझैक होते. आणि तरलता गमावते. तिची धाव वैचारिकतेकडे अधिक आहे. दिलीप चित्रे, अरुण कोलहटकर यांच्या कवितेतील श्रीमंती बन्नोरे यानाही बऱ्याच प्रमाणात लाभली आहे. त्यामुळे रसिकांपासून दूरस्थ असले तरी अंतःस्थ कवितेमुळे ते गर्भश्रीमंत झाले आहेत एवढे निश्चित !

( डॉ. सुलभा हेर्लेकर अभ्यंकर रोड, धंतोली, नागपूर - ४४००१२. )

**प्रयोगशील नाटककार : डॉ. मधुकर हसमनीस**

## डॉ. शंकर शेष यांच्या नाट्यकृतींचे विवेचन

**डॉ. अशोक कामत**

डॉ. मधुकर हसमनीस हे बत्तीस शिराळ्याचे. हिंदी आणि मराठी अशा दोन्ही भाषांत उच्च पदवी घेतल्यानंतर ते सातत्याने समीक्षा लेखन करीत राहिले आहेत. काही कथासाहित्यही त्यांनी लिहिले आहे. एक विद्यार्थीप्रिय प्राध्यापक म्हणूनही त्यांचा चांगला लौकिक आहे. 'डॉ. शंकर शेष के नाटकोंका अनुशीलन' हा त्यांच्या हिंदी पीएच्. डी साठी लिहिलेल्या शोधप्रबंधाचा विषय. 'प्रयोगशील नाटककार डॉ. शंकर शेष' हे त्याच स्वीकृत प्रबंधाचे पुस्तकरूप.

गेल्या तीन दशकांत हिंदीत जे नाट्यलेखन झाले, त्यात डॉ. शंकर शेष यांचे नाव अनेक कारणांनी गाजले. बदलत्या कालमानपरिस्थितीप्रमाणे जी नवी मूल्ये आली आणि

जुनी मागे पडली त्यांचे सुस्पष्ट प्रतिबिंब डॉ. शेष यांच्या कृतीतून पहावयास मिळते. विशेषकरून नव्या पिढीवर जे परिणाम अलीकडे झाले विज्ञान, तंत्रज्ञान, औद्योगीकरण इत्यादीतून जो बरावाईट प्रभाव सामान्य जनांवर पडला, त्यातून बुद्धिवादिवृत्तीला जी चालना मिळाली ती आपल्या नाटकांतून दाखविण्याचा एक प्रांजळ प्रयत्न डॉ. शेष यांनी केला. नवशिक्षितांचा एकाकीपणा, व्यक्तिवादी वृत्ती, नोकरदार स्त्रीपुरुषांच्या पारिवारिक जीवनातील ताणतणाव, शिक्षणासारख्या पवित्र क्षेत्रातील शोषण आणि भ्रष्टाचार, मध्यमवर्गीयांची अनेक क्षेत्रात झालेली कुचंबणा, अशा तुम्हाला आम्हाला जवळच्या वाटणाऱ्या विषयांवर डॉ. शेष यांनी आपले 'नाटक' उभारले.

असे हिंदीत त्यांच्यापूर्वी अगदीच झाले नाही असे नाही. पण डॉ. शेष यांनी हे व्हावे म्हणून बहुअंगांनी जी विलक्षण धडपड केली ती लक्षणीय होती. पण ती एकप्रकारे अलक्षितच राहिली.

डॉ. हसमनीस यांच्या प्रस्तुत पुस्तकामुळे डॉ. शेष यांचे कार्यकर्तृत्व स्पष्ट होण्यास मदत झाली आहे. आता यापुढे हिंदी वाङ्मयेतिहासात शेष यांच्या कार्याची अधिक दखल घ्यावीच लागेल. यासाठी प्रथम लेखकाचे अभिनंदन करायला हवे. पीएच्. डी. चे प्रबंध बहुतेक वेळा ग्रंथालयातच रहातात. त्याची कारणेही बरीच असतात. डॉ. हसमनीस यांनी आपला प्रबंध निर्धाराने सर्वासमोर ठेवून अशा प्रकारच्या कामांचे महत्त्वमापन करण्याची संधी दिलेली आहे म्हणूनही त्यांची पाठ थोपटली पाहिजे.

डॉ. शेष यांनी एकूण एकवीस नाटके लिहिली. त्यांच्या अनेक कलाकृती अपुऱ्याही राहिल्या. जी नाटके रंगभूमीवर आली त्यात वस्तू, शैली, शिल्प, रंगमंचीयता यांच्या संदर्भात त्यांनी वेळोवेळी केलेले प्रयोग हा समकालीन नाट्यलेखक आणि समीक्षक यांच्या विशेष चर्चेचा विषय ठरला.

डॉ. शंकर शेष यांनी बहुविध अंगाने साहित्य निर्मिती केली. कथा, कविता, कादंबरी, बालनाट्य, एकांकी, अनुवाद, आकाशरूपक, संशोधनपर प्रबंध, चित्रपटकथा, दूरदर्शनकृती असा त्यांचा बराच मोठा लेखनप्रवास आहे. पण त्यांना अधिक यश मात्र नाट्यलेखनांत मिळाले. ते देखील नाट्यकृतींची चर्चा, मंचन, प्रयोग यात अधिक रमले. नागपूर, भोपाळ, दिल्ली आणि मुंबई या महानगरातील कलाप्रेमी जगतात त्यांना अतिशय आपुलकीने ओळखले जाई.

हिंदी नाटक साहित्याची परंपरा मराठी इतकीच जुनी आहे. ऐतिहासिक विषयावरील जयशंकर प्रसादांची नाटके बरीच गाजली. पण ती मंचावर कमी आली. भरपूर वाचली मात्र गेली. प्रसादांच्या नंतर उदयशंकर भट्ट, लक्ष्मीनारायण मिश्र, उपेंद्रनाथ अश्क, भुवनेश्वर प्रसाद मिश्र, राजकुमार वर्मा, जगदीशचंद्र माथुर इत्यादी अनेक मान्यवर रचनाकार आले. हिंदी नाटकापेक्षा एकांकिका वाङ्मय अधिक समृद्ध होत राहिले. रंगमंचाच्या दृष्टीने अगदी अलीकडे काहीना यश मिळाले. त्यात मोहन राकेश डॉ. शंकर शेष आदि मोजकीच नावे घेता येतील. एक और द्रोणाचार्य, रक्तबीज, चेहरे, खजुराहोका शिल्पी, पोस्टर अशा आपल्या कृतीतून काही नवे श्रवणीय, प्रेक्षणीय असे डॉ. शेष यांनी सादर केले.

स्वातंत्र्योत्तरकालीन हिंदी नाटककारांत विपुल आणि प्रयोगशील रचना करणारे एक समर्थ लेखक म्हणून डॉ. शेष यांचा बोलबाला बराच झाला पण त्यांचा व्हावा तसा सन्मान झाला नाही; अभ्यासही झाला नाही. डॉ. हसमनीस यांनी ही उणीव भरून काढली आहे. अलिकडच्या दशकातील आपले सामाजिक प्रश्न, धार्मिक, राजकीय पैलू डॉ. शेष यांनी ध्यानी घेतले. अत्याचार, शोषण, यातना, छळ इत्यादींना वाचा फोडली हे डॉ. हसमनीस यांनी तपशीलवार स्पष्ट केले आहे.

डॉ. शेष यांचे वेगळेपण केवळ समकालीन विषयांचे भेदक चित्रण करण्यापुरते मर्यादित नाही. ते तर त्यांनी सामर्थ्याने केलेच, परंतु श्रोत्यांच्या अभिरुचीचे भान ठेवून नाटक लिहिण्याची त्यांची हातोटी, चातुर्य आणि उत्साहही दाद देण्यासारखे आहेत.

महाविद्यालयीन स्नेहसंमेलनासाठी रुचेल पचेल असे नाटक, दूरदर्शनसारख्या घरोघरी बसून पाहिले जाणारे परिवारमाध्यमासाठी लिहावयाचे नाटक, आकाशवाणीसारख्या शासनसंबद्ध श्रवणमाध्यमातून सादर करता येईल असे आकाशरूपक, नौटंकीसारख्या उत्तरभारतीय ग्रामीण परंपरेने संबंधित विधेशी जवळीक असणारे नाटक, मिथकांना प्राधान्य देऊन लिहिलेले नाटक अशी डॉ. शेष यांच्या लेखनाची अनेक वैशिष्ट्ये डॉ. हसमनीस यांनी बारकाईने टिपली आहेत. या दृष्टीने चेहरे, घरौंदा, अरे मायावी सरोवर, राक्षस, रक्तबीज, कोमलगांधार, आधी रातके बाद, इत्यादी कृतींची लेखकाने चर्चा केली आहे. रोहिणी हट्टंगडी, अरविंद व सुलभा देशपांडे, सत्यदेव दुबे, बी. व्ही. कारंथ यांच्यासारख्या जनमान्य दिग्दर्शकांनी डॉ. शेष यांच्या काही कृतींना कसा न्याय दिला हे देखील साक्षेपाने दाखवले आहे.

मध्यमवर्गीयांच्या जीवनातील कानकोंडेपणा, क्वचित प्रसंगी उघड होणारा त्यातील अमानुष व्यवहार, बौद्धिक शोषणाची वृत्ती यांना नाटकासारख्या लोकमाध्यमातून वेशीवर टांगणे हे एक जबरदस्त आव्हानच म्हणायला हवे. डॉ. शेष यांनी हे साहसाने स्वीकारले, यात त्यांनी आपल्या लेखणीचे कौशल्य जसे दाखविले तसेच त्यांनी नाटकांचे प्रयोगमूल्यही सतत समोर ठेवून त्यादृष्टीने काही नवीन करण्याचा प्रामाणिक प्रयत्न केला. डॉ. हसमनीस यांनी यावर विशेष प्रकाश टाकला आहे.

डॉ. हसमनीस यांच्या या ग्रंथात अगदी सहजपणे हिंदी नाट्यसाहित्य आणि मराठी नाट्यवाङ्मय यांचे तौलनिक दर्शन घडू शकते. किंबहुना तुलनात्मक अध्ययनाचा एक यशस्वी प्रयत्न म्हणूनच त्यांच्या या मूल्यमापनाकडे पाहावयास हवे. इथे तुलनेसाठी तुलना नाही, लेखनात ठोकळेबाजपणाही नाही.

डॉ. शेष यांना नोकरीनिमित्त गावोगावी राहावे लागले. लेखनाचा त्यांचा झपाटा मोठा. त्यांना निवांतपणा असा मिळालाच नाही. ते मूळचे मराठीभाषक. यामुळेही कदाचित त्यांची थोडी उपेक्षा झाली असावी. डॉ. हसमनीस यांनी हे सारे सूचित केले आहे. प्रस्तुत पुस्तकाच्या सहाव्या अध्यायात त्यांनी शेष आणि समकालीन मराठी नाट्यजगत् यांची मार्मिक चर्चा केलेली आहे.

(प्रयोगशील नाटककार : डॉ. मधुकर हसमनीस सावली, इस्लामपूर, पृष्ठे १६+१९८ शंभर रु.)

(डॉ. अशोक कामत, विभाग प्रमुख, नामदेव अध्यासन, पुणे विद्यापीठ, पुणे)

समग्र लोकमान्य टिळक : खंड आठवा

# लोकमान्यांच्या उर्वरित साहित्याचे साक्षेपी संपादन

श्री. पु. गोखले

१९९५ मध्ये लोकमान्य टिळकांना स्वर्गवासी होऊन पाऊणशे वर्षे झाली. त्या पुण्यतिथीला मुख्य निवडणूक आयुक्त श्री. टी. एन. शेषन यांच्या हस्ते लोकमान्यांच्या समग्र साहित्याचा आठवा खंड प्रसिद्ध करण्यात आला. यापूर्वी पहिले सात खंड साधारण वीस वर्षांपूर्वी पंतप्रधान इंदिरा गांधी यांच्या हस्ते प्रकाशित करण्यात आले होते. स्वातंत्र्यपूर्व काळाची गरज म्हणून ते राजकीय क्षेत्रात उतरले असले तरी टिळकांचा मूळ पिंड अभ्यासकाचा आणि संशोधकाचा होता. त्यामुळे त्यांचा संचार तत्त्वज्ञान, गणित, ज्योतिष, इतिहास, शिक्षण, प्राच्यविद्या अशा विविध क्षेत्रात चाले. राजकारणाबरोबरच या विषयांवरील चिंतनातून आणि लिखाणातून त्यांची वाङ्मयीन मूर्ती घडलेली आहे. स्वातंत्र्यानंतर झपाट्याने घसरणीला लागलेल्या तरुण पिढीला योग्य मार्गावर चालायला मदत करून नवे नवे प्रांत पादाक्रांत करण्याची स्फूर्ती देण्यासाठी त्यांची वाङ्मयसंपदा अत्यंत उपयुक्त होईल.

साधारणपणे प्रत्येकी हजार पानांचे सात खंड प्रसिद्ध होऊनही आठव्या, नव्याने प्रसिद्ध झालेल्या, खंडाने सुमारे दीड हजार पाने व्यापली आहेत. या पूर्वीच्या भागांत त्यांचे इंग्रजी व मराठी ग्रंथ, केसरीत आणि इतर ठिकाणी प्रसिद्ध झालेले लेख, न्यायालयातील आणि सार्वजनिक भाषणे, पत्रे, मुलाखती प्रसिद्ध करण्यात आलेल्या आहेत. या साक्षेपी प्रकाशनानंतरही काही साहित्य त्यात समाविष्ट झाले नसल्याचे जिज्ञासू मंडळींनी निदर्शनास आणले. सरकारी फायली आणि इतर मार्गांनी काही साहित्य उपलब्ध होत गेले. लोकमान्यांच्या कार्याचा व्यापच प्रचंड मोठा असल्याने प्रस्तुतचा सर्वात मोठा खंड विश्वस्तांनी सरस्वतीच्या दरबारात सादर केला.

टिळकांसारख्या महान व्यक्तीच्या लिखाणाचा शोध निरंतर चालू ठेवावा लागतो. टिळकांच्या काळात तात्यासाहेब केळकर, खाडिलकर, आगरकर यांच्यासारखे रथीमहारथी केसरी - मराठा या पत्रांतून लिहीत असल्याने नेमके हे अमक्याचे लिखाण असे म्हणणे फारच अवघड काम असते. या निवडीला अर्थातच टिळकांची लेखनशैली; त्यांचे अभ्यासाचे व आवडीचे विषय; सोपी पण ठाशीव भाषा, आग्रही आणि प्रेरक प्रतिपादन, सखोल अभ्यास, संस्कृत सुभाषिताने लेख सजविण्याची पद्धत आणि चपखल शीर्षक, इंग्रजी मराठी भाषेवरील प्रभुत्व हा गुणसमुच्चय मार्गदर्शक असला तरी काही वेळा संभ्रम सोडवू शकत नाही. या शिवाय जुन्या आणि काळाच्या ओघात जीर्ण झालेल्या कागदपत्रांचे (विशेषतः हस्तलिखित)

वाचन करणेही कठीणच असते.

येथे प्रसिद्ध झालेली काही माहिती उद्धृत करण्यासारखी आहे.

**गुप्त परिपत्रक** - टिळक १९१४ ला मंडालेच्या तुरुंगातून सुटले. त्यावेळी इंग्रज सरकारने पुढील आशयाचे गुप्त पत्रक काढले होते. टिळक सुटले असले तरी त्यांचे मार्ग वदललेले नसल्याने त्यांच्याकडे ब्रिटिश सरकारचे शत्रू म्हणून बघावे. विद्यार्थ्यांना त्यांच्याशी सहकार्य करू देऊ नये!

**योगाभ्यास** - टिळक रंगूनला छत्रे यांच्या सर्कशीला गेले होते. त्याचे मालक केरूनाना छत्रे आणि फर्ग्युसन महाविद्यालयाचे विद्यार्थी स्वामी भास्करानंद हे बरोबर होते. स्वामी टिळकांना १२ वाजता एका खासगी खोलीत योगाभ्यासाचे धडे देत असत.

**विरोध** - २९ एप्रिल १९१९ च्या सरकारी दप्तरात असा उल्लेख आहे की 'सत्यशोधक समाजिस्टांनी टिळक पर्स फंडाला पैसे देऊ नयेत. टिळक ब्राह्मणांसाठी कार्य करीत असल्याने जे अब्राह्मण निधी देतील त्यामुळे स्वजातीयांच्या राजकीय व सामाजिक प्रगतीचा उत्साह भंगेल!' हे वाचताना टिळकांनी इंग्लंडमधील मजूर पक्षाला दोन हजार पौंडांची, रवींद्रनाथ ठाकूर यांना पन्नासरुपयांची, लाला लजपतरायांना पाच हजार डॉलर्सची निरपेक्ष पाठविल्याची नोंद सापडते. भालाकार भोपटकरांच्या 'भाला' पत्रावरील दावा लढविण्यासाठीही त्यांनी मदतीचा हात पुढे केल्याची उदाहरणे साहजिकच आठवतात.

**केसरीचे धोरण** - केसरीच्या धोरणासंबंधी टिळक म्हणतात की, केसरी माणसांचा अभिमानी नाही; मतांचा अभिमानी आहे. त्यांचे असे कडक धोरण असले तरी मृत्यूलेख लिहिताना ते कोठेही भावनाप्रधान न होता उत्तम विवेचक रीतीने त्या व्यक्तीचे मूल्यमापन करीत. असे अनेक लेख सांगण्यासारखे असले तरी मूलभूत मतभेद असूनही आमदार गोखले, न्यायमूर्ती रानडे, गोपाळराव आगरकर, मॅक्समूलर यांच्यावरील लेखांचा उल्लेख आवश्यक वाटतो. त्याच प्रमाणे हॅरी ब्रुइन हा कुशल पोलिस इन्स्पेक्टर आणि रँडच्या वधाचा तपास करणारा असूनही चांगला अधिकारी म्हणून टिळकांनी त्याच्यावरही नमुनेदार मृत्यूलेख लिहिला होता.

**सँढर्स्ट आणि कर्झन यांचे स्मारक** - नेहमीच्या अनुभवाप्रमाणे तोंडपुजे मंडळी पुढे सरसावतात त्याप्रमाणे मुंबई इलाख्याचा गव्हर्नर सँढर्स्ट यांना मानपत्र देण्याची योजना पुढे आली. परंतु त्यांच्या कारकीर्दीत प्लेग आणि दुष्काळ यांनी हैराण झालेल्या जनतेची धडाडीने कड घेऊन या स्मारकाला टिळकांनी स्पष्टपणे विरोध केला. स्वभावातील आस्थेवाईकपणा, कळकळ ज्याला कारभारात आणण्याचे धैर्य नाही आणि जो लोकांच्या प्रगतीस प्रतिकूल राहिला त्याच्या मानपत्राची भानगड करू नये! याच्या पेक्षाही कडक धोरण स्वीकारून लोकमान्यांनी व्हाइसरॉय लॉर्ड कर्झन यांना मानपत्र देण्याच्या कल्पनेलाही विरोध केला होता.

**राष्ट्रीय सैन्य** - लोकमान्यांनी 'नॅशनल आर्मी' या विषयावरचे विचार एका व्याख्यानात व्यक्त केले. त्याचा वृत्तान्त लंडनच्या इंडिया ऑफिस रेकॉर्डस मध्ये मिळाला. तो या खंडात देण्यात आला आहे. त्यावरून त्यांची सैनिकीकरणावद्दलची मते कळतात. सैन्य भरतीच्या विषयावर त्यांनी गांधींना लिहिलेले पत्र (४।८।१९१८) वाचण्यासारखे आहे. भारतात सैन्यात भरती झालेल्यांना शिक्षणात, अधिकाराच्या जागा देण्यात सरकारने

यूरोपीयांच्या बरोबरीने संधी देण्याचे अधिकृतपणे स्पष्ट करावे . तसे झाले तर सहा महिन्यात पाच हजार उमेदवार सैन्यात भरती करीन . तसे करता आले नाही तर पाच हजाराची संख्या पूर्ण होण्यासाठी जेवढी उणीव राहील त्या प्रत्येक उमेदवारापोटी मी शंभर रुपये देण्याची हमी घेतो . या हमीपोटी पन्नास रुपयांच्या ठेवीची पावती आपल्याकडे ठेवण्यासाठी पाठविली आहे .

या भरघोस आणि आत्मविश्वास दर्शक इर्षेनंतर ते शेवटी लिहितात की सरकारने निश्चित आश्वासन देण्यात दोन महिन्यांपेक्षा जास्त विलंब केला तर या हमीला मी जबाबदार राहणार नाही !

**लोकमान्यांची शिक्षा व लेनिन** - सहा वर्षांच्या काळेपाण्याच्या शिक्षेबद्दल कॉम्रेड लेनिन म्हणतात की हिंदी ज्यूरींची शिफारस धुडकावून युरोपियन ज्यूरींच्या मतांचा आधार घेत . टिळकांना ठोठावलेली शिक्षा हा भांडवलदार गुलामांकडून घेववलेला सूड आहे . रस्त्यावरच साधा माणूसही आता (टिळकांच्या नेतृत्वाखाली) उठाव करण्यासाठी जागृत झालेला आहे . त्यामुळे रशियातील झारच्या जातीच्या आणि ब्रिटिशांच्या सरकारचे दिवस भरले आहेत ! याचप्रमाणे लेनिन यांनी इंग्रजांच्या हिंदुस्थानातील अत्याचारी राज्यपद्धतीवरही ताशेरे मारले आहेत !

**वृत्तपत्रातील लेख** - वर्तमानपत्रकर्त्याला सर्वच विषयांचा परामर्श घ्यावा लागतो . त्याला जगाच्या पाठीवरील कोणताही विषय वर्ज्य नसतो . टिळकांचा तर अनेक विषयांचा विशेष अभ्यास असल्याने त्या विषयांवरील त्यांचे लेख निवडणे सुकर गेले . त्याशिवाय पूर्वी उल्लेखिलेल्या अंतर्गत आणि बाह्य निकषांच्या आधारे लेखांची निवड करण्यात आली असे प्रास्ताविकात संपादकांनी नमूद केले आहे . गेल्या काही वर्षातले उदाहरण येथे देण्यासारखे आहे . आचार्य अत्रे यांचा 'मराठा' अत्यंत जोरात चालत होता . त्यात स्वतः अत्रे अग्रलेख वगैरे लिहीतच ; परंतु दैनिकाचे मोठमोठे आठ स्तंभी मथळेही सांगत . इतके सगळे असले तरी अत्रे यांचे काही गाजलेले लेख त्यांचे सहसंपादक श्री . विनायक भावे यांच्या लेखणीतून उतरलेले होते असे ज्ञाते सांगतात . जेवढा अधिक काळ जातो तितकी ही निवड अनेक कारणांनी अधिक अवघड होत जाते . श्री . गोपाळराव आगरकरांच्या बाबतीत असे घडले आहे . त्यांचे आणि टिळकांचे लेख एकमेकांच्या संग्रहात घेतले गेले . त्या तुलनेत नजिकच्या काळात ग . वि . केतकरांचे लेख साहित्यसम्राट केळकरांच्या वाङ्मय संग्रहात प्रसिद्ध झाले ! या खंडाच्या निवडीत मात्र काही घोळ झाला आहे असे वाटत नाही .

लो . टिळक स्वराज्य , त्याचं सुराज्य आणि लोकशाहीसाठी जन्मभर झिजले . आजच्या भारतीय राजकारणाचे अवमूल्यन झालेले विचारात घेतले तर त्यांचे पुढील लेख संबंधितांनी पुन्हा पुन्हा वाचावे असे आहेत .

सध्या मुक्त अर्थव्यवस्थेच्या धोरणामुळे पुन्हा काही पक्षांनी 'स्वदेशीच्या चळवळीचा' आग्रह धरला आहे . त्या दृष्टीने १९०५-१९०६ या वर्षातील 'स्वदेशी चळवळ' हे पाच लेख अभ्यासण्यासारखे आहेत . आता 'स्वदेशाभिमान' काही अंशी डळमळू लागला आहे त्यासाठी 'ऑन पॅट्रिऑटिझम' हे सुदीर्घ भाषण (ग्रंथाची १४ पाने) पाहिले तर त्यात केलेली राष्ट्रवादाची मूलगामी मीमांसा महत्त्वाची वाटेल ! 'Advice of Students' हे मोठे भाषणही

उगवत्या पिढीने वाचलेच पाहिजे. टिळकांचे लेख, त्यांचा पत्रव्यवहार अत्यंत उद्‌बोधक असून नेत्याने कसे कार्य करावे याचा तो वस्तुपाठच आहे.

अनेक संकटांना समर्थपणे तोंड देत ताठ मानेने कार्यमग्न रहाणारे टिळक स्थितप्रज्ञ कसे होते हे त्यांच्याच उद्‌गारांवरून दिसते. 'संकटे आली की रडावे आणि गेली की आनंदाने ही मानवाने इतिकर्तव्यता समजणे अयोग्य! तसे माकडे सुद्धा करतात! परंतु संकटापासून बोध घ्यावा. त्यापासून समाजाचा आणि देशाचा फायदा करून घेतला नाही तर त्या संकटांची किंमत राहात नाही. त्यामुळे ती गेली म्हणजे आनंदही मानण्यात अर्थ नाही.'

लोकमान्यांसंबंधी अनेकांचे अनुकूल प्रतिकूल अभिप्राय असले तरी तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांचे मत देऊन हा ग्रंथ परिचय पूर्ण करणे योग्य होईल." टिळकांचे लेखन हे भारताच्या उद्योगपर्वापर्यंतच्या स्वातंत्र्ययुद्धाचे गद्य महाकाव्य आहे!"

(समग्र लोकमान्य टिळक - खंड ८ वा : केसरी प्रकाशन, पुणे. पृष्ठे १४२८, पाचशे रुपये)

(श्री. पु. गोखले, कमलश्री, ३० पारिजात सोसायटी, बिबवेवाडी रोड, पुणे ३७)



## साभार पोच

- श्री गोविंद प्रभुविषयक साहित्य- शोध व समीक्षा : डॉ. अ. वा. आवलगावकर, चंद्रकला प्रकाशन, पुणे. पृष्ठे ३१९, एकशे ऐंशी रुपये.
- पडद्यामागचा माणूस : त्यागराज पेंढारकर, चंद्रकला प्रकाशन, पुणे. पृष्ठे १८८, एकशे तीस रुपये.
- माया : प्रा. नंदकुमार वाळुरे, निर्मल प्रकाशन, नांदेड. पृष्ठे ५२, तीस रुपये.
- उन सावली : प्रा. नंदकुमार वाळुरे, निर्मल प्रकाशन, नांदेड. पृष्ठे ५२, तीस रुपये.
- आनंद बोध : भा. ल. रानडे, भा. ल. रानडे प्रकाशन, सांगली. पृष्ठे २४, पंधरा रुपये.

**चिंतामणी साहित्य सहयोग, सावंतवाडी.**

- सामाजिक परिवर्तनाची वाटचाल : प्रा. एल. आर., पृष्ठे १०५, तीस रुपये.
- गुलमोहर : राजेश तु. जोशी, पृष्ठे ११८, तीस रुपये.
- प्रस्फोट : इब्राहिम खान, पृष्ठे ४५, पंधरा रुपये.
- श्रावणझड : (कविता) पुरुषोत्तम डवरे, पृष्ठे ४२, पंधरा रुपये.
- लोकमान्य टिळक आणि डॉ. वेलकर : प्रताप वेलकर, श्रीविद्या प्रकाशन, पुणे. पृष्ठे ३४८, चारशे रुपये.
- तळ्याकाठी मळ्याकाठी : दीपा गोवारीकर, मॅजेस्टिक प्रकाशन, मुंबई. पृष्ठे ६३, पस्तीस रुपये.
- झिप्री : डॉ. विजया वाड, मॅजेस्टिक प्रकाशन, मुंबई. पृष्ठे ८६, पन्नास रुपये. उत्कर्ष प्रकाशन, पुणे.
- भेट : ज्ञानेश्वर मोडक, पृष्ठे ६८, पंचेचाळीस रुपये.
- व्यंकटेश माडगुळकर- समग्र वाङ्मय सूची : संकलन यशवंत श्रीपाद रास्ते, पृष्ठे १३६, साठ रुपये.
- अंतरंग : सुरेश चुनेकर, पृष्ठे २३५, दीडशे रुपये.
- संतसाहित्य : संदर्भ कोश (खंड पहिला) : डॉ. मु. श्री. कानडे, स्नेहवर्धन प्रकाशन, पुणे. पृष्ठे ४८६, दोनशे पन्नास फक्त.
- व्यक्तिविकास सुविचार कोश : डॉ. वसंत विष्णु कुलकर्णी, स्नेहवर्धन प्रकाशन, पुणे. पृष्ठे १३१. पंच्याहत्तर रुपये.

पडद्यामागचा माणूस : त्यागराज पेंढारकर

# सिने कॅमेरामनचे मनोहर जग

डॉ . लीला दीक्षित

सुप्रसिद्ध चित्रपट कलावंत बाबुराव पेंढारकर यांचे चिरंजीव त्यागराज यांचा चित्रपट व्यवसायाशी संबंध आला तो छायाचित्रकार म्हणून . पडद्यामागचा माणूस म्हणून . आपल्याला आलेले कडूगोड अनुभव 'पडद्यामागचा माणूस' या आत्मनिवेदनात त्यांनी प्रांजळपणे मांडले आहेत .

आपल्या वडिलांबरोबर लहानपणी स्टुडिओमध्ये गेल्याच्या आठवणींपासून ही कहाणी सुरू होते . गणेश उत्सव , सांस्कृतिक मनोरंजनाचे कार्यक्रम , मेळे , शाळेतले दिवस , तेव्हाच्या स्पर्धा असे बालपणाचे चित्र रेखाटीत आपण कॅमेरामन कसे झालो याचा सहज आलेख ते उभा करतात . उत्तम छायाचित्रकार होणे हे ध्येय त्यांनी आरंभापासूनच ठरवले होते . राजकमलमध्ये जी . बाळकृष्ण नावाचे कॅमेरामन होते . त्यांच्याकडून छायाचित्रणाचे प्राथमिक धडे त्यांनी घेतले . चित्रपट तयार होताना छायाचित्रकार सर्वच घटनांचा साक्षी असतो . 'झनक झनक पायल बाजे'च्या छायाचित्रणाचा बारीकसारीक तपशील देताना कॅमेरामन म्हणून कसे घडत गेलो हे लेखक सांगतो . लहान वयापासून वाचनाची आवड , फडके , खांडेकर , माडखोलकर यांच्या कादंबऱ्या , बालकवी , केशवसुत , तांबे , माधव जुलियन यांचे काव्य यामुळे त्यांच्या ठिकाणी भावुकता आणि विचार यांचे मिश्रण झालेले दिसते . कलाकाराचे व त्याच्या सामर्थ्याचे नेमके वर्णन ते करतात . संध्या , गोपीकृष्ण , पृथ्वीराज कपूर , सूर्यकांत , जयश्री गडकर , संजीवकुमार , स्वतःचे वडील बाबुराव पेंढारकर , व . पु . काळे , पु . ल . देशपांडे अशा कितीतरी व्यक्तींविषयी दोन चार वाक्यात नेमकी टिपणी ते करतात . स्वभाव काहींसा बुजरा , पुढे पुढे न करणारा . तरी काही निर्भीड नोंदी आहेत . दुसऱ्याला नावे ठेवण्याची वृत्ती जवळजवळ नाहीच . गुणग्राहकता जास्त आहे . टीकेसाठी टीका येत नाही तर त्या व्यक्तींविषयीची प्रांजळ प्रतिक्रिया म्हणूत येते . दादा कोंडके यांच्या सोंगाड्या चित्रपटाची सिल्व्हर ज्युबिली झाली . त्याबद्दल ते लिहितात -"दादा कोंडके हुशार व कसबी कलावंत . ते मूळचे शाहीर . विनोदाचे अंग चांगले असल्याने 'विच्छा माझी पुरी करा' या लोकनाट्यात ते प्रथमच चमकले . लोकांना ते आवडले . त्यांना अभिनयाचे अंग कमी , आत्मप्रौढी जास्त . तरीही ते यशस्वी झाले , कारण ते अत्यंत हिशेबी आणि मुख्य म्हणजे भाग्यवान होते ."

कामाच्या शोधात लेखकाला अत्यंत वणवण करावी लागली . परिस्थितीचे भरपूर चटके बसले . माणुसकीहीन माणसे भेटली . तरी या संदर्भात लेखकाने कुठेही फार कडवटपणे

लिहिलेले नाही. स्वतःच्या वाट्याला आलेले भोग त्यांनी आनंदाने संयतपणाने स्वीकारले आहेत. एखादा मानाचा तुरा हाती येता येता हुकला तरी त्याच्यावर कडवट प्रतिक्रिया नाही. 'डाकूरानी गंगा' हा गुजराथी चित्रपट गाजला. गिरीश कर्वे हे त्या काळात गाजलेले कॅमेरामन होते. काही भागाचे चित्रीकरण त्यांनी केल्यावर काम पेंढारकरांकडे आले. जवळ जवळ तीन चतुर्थांश भागाचे चित्रीकरण लेखकाने केले. त्या चित्राला छायाचित्रणाचे बक्षिस मिळाले. परंतु छायाचित्रकार म्हणून फक्त गिरीश कर्वे यांचेच नाव होते. त्या चित्रणाला बक्षीस मिळाले म्हणून मला आनंद झाला. एवढीच नोंद करून लेखक पुढे जातो.

लेखक वृत्तीने श्रद्धाळू आहे. जीवनातल्या चांगुलपणावर जशी त्याची श्रद्धा आहे तसं परमेश्वराचे छत्र अखंड माणसावर असेल असा त्यांचा विश्वास आहे. तिरुपतीच्या दर्शनाच्या वेळी त्यांच्या मनाची ही वेगळी घडण व्यक्त झाली आहे. "मोठ्या समयांच्या मंद प्रकाशात, गाभाऱ्यात कमरेवर हात ठेवून उभा असलेला तिरुपती पहाताना माझे मन शांत झाले. डोळे आनंदाश्रूंनी भरून आले. मी नास्तिक नाही, देवभोळाही नाही. पण 'त्याच्या' शक्तीवर माझी गाढ श्रद्धा आहे. तो चराचरात आहे. हे मला नेहमी जाणवतं." असे त्यांनी सहजोद्गार काढले आहेत.

सिनेक्षेत्रात काही गमतीदार प्रसंग येतात. गोव्यात मांडवीच्या मोठ्या पुलावर सायंकाळी शूटिंग चाललेले. एअरपोर्टवरून येताना या पुलावर एक स्मगलर टॅक्सी थांबवतो. टॅक्सीड्रायव्हरचा खून करतो आणि प्रेत (अर्थात डमी) पुलावरून खाली फेकतो. रस्ता निर्मनुष्य. डमीला पुलावरून फेकताना तेथे नेमकी पोलीस जीप येते. पोलिसांना वाटते खरेच खून झालाय. बराच वाद होतो. गर्दी जमते. आणि हे शूटिंग आहे हे सांगताना साऱ्यांची पुरेवाट होते. कोडॅकची फिल्म आणण्यासाठी कोल्डरूममध्ये गेल्याचा एक थरारक अनुभवही आला आहे. स्वतःच्या वडिलांविषयी - बाबुराव पेंढारकरांविषयी वडील म्हणून आदर असणे स्वाभाविक आहे. परंतु कलावंत म्हणून ते मोठे असल्याने त्यांच्यावर एक अनुबोधपट व्हावा म्हणून त्यागराज खूप प्रयत्न करतात. सरकार दप्तरी दिरंगाई होतेच. तीन वर्षांनी 'कलातपस्वी' ही फिल्म तयार झाली. दूरदर्शनवर दाखविण्यात आली.

लेखक स्वतः उत्तम छायाचित्रकार आहे. व्यवसाय म्हणून कॅमेरामन म्हणूनच त्यांचे आयुष्य गेले. व्ही अवधूत, बाळकृष्ण, पांडुरंग नाईक, जाल व फली, मिस्त्री, नरीमन इराणी, जयवंत पाठारे इ. कॅमेरामनच्या कलेतील खुबी, कॅमेरा हाताळण्याचे त्यांचे कौशल्य आणि बारकावे त्यांनी टिपले आहेत. छायाचित्रकारांच्या वैशिष्ट्यांकडे ते लक्ष वेधतात. व्ही. शांताराम आणि भालजी हे तर त्यांना गुरुस्थानी आहेत. त्यांच्या सहवासातील अनेक घटना त्यांनी रंगवल्या आहेत. भालजींचे माणूस म्हणून, कलाकार म्हणून मोठेपण, त्यांची जिद्द, त्यांचे सर्वांविषयीचे सहज प्रेम, वडिलकीच्या नात्याने सर्वांना जपणे, कठीण प्रसंगीही ताठ मानेने उभे राहणे, त्यांचे वागणे, बोलणे, चालणे या साऱ्यांचेच मनोहारी चित्रण या आत्मचरित्रात येऊन गेले आहे.

कठीण काळातच माणसाच्या प्रामाणिकपणाची आणि नैतिकतेची कसोटी लागते. ती नैतिकता आणि प्रामाणिकपणा या माणसाने मनापासून सांभाळला आहे. परंतु मी प्रामाणिक आहे असा कंठशोष कुठेही केलेला नाही. म्हणूनच एक सच्चा, स्वच्छ माणूस आपल्याला

या आत्मचरित्रातून भेटतो. अशी भेट ही या जगात दुर्मिळ असल्याने हे आत्मचरित्र आपल्याला एक वेगळाच आनंद देऊन जाते. "मला कीर्ती आणि संपत्ती लाभली नाही. पण काम करताना जगाकडे सम्यक दृष्टीने पहाण्याचे ज्ञान मला प्राप्त झाले. अनेक थोर व्यक्तींच्या सहवासात राहून त्यांना जवळून पाहण्याची संधी मला मिळाली. सर्व माणसं काही ना काही उणीवा असलेली असतात हेही कळले. मी एक सामान्य मणूस आहे. पण स्वतंत्र विचारांचा आहे. सृष्टीत जे जे सुंदर व पवित्र आहे, त्यावर प्रेम करणारा, निसर्गावर व स्वतःच्या कलेवर प्रेम करणारा कलावंत आहे." हे त्यांनी आत्मचरित्राच्या शेवटी काढलेले उद्गार आपल्याला संपूर्ण जीवनपट वाचून झाल्यावर एक सत्याची प्रचीती आणून देतात. इतके हे आत्मभान निखळ व सत्य आहे. सहजसुंदर शैली, कुठलाही अभिनिवेश नाही, असे हे पुस्तक मराठी आत्मचरित्र दालनात मोलाची भर म्हणून नोंदवले जाईल यामध्ये संदेह नाही. चंद्रकला प्रकाशनने पुस्तक अत्यंत देखण्या स्वरूपात काढले आहे.

(पडद्यामागचा माणूस : त्यागराज पेंढारकर, चंद्रकला प्रकाशन, पुणे. पृष्ठे १८८, एकशे तीस रुपये)

(डॉ. लीला दीक्षित, ४, अनुवी ५५, डहाणूकर, कोथरूड, पुणे. २९)



## साभार पोच

- प्रवोधनाच्या नव्या वाटा : डॉ. रत्नाकर महाजन, दास्ताने रामचंद्र आणि कंपनी, पृष्ठे ८८ पंचावन्न रुपये.
- धूसर चांदणे : संतोष विठ्ठल घसिंग, पृथ्वीराज प्रकाशन, पुणे. पृष्ठे ९६, पंचवीस रुपये.
- भावपेशी : डॉ. अरुण गद्रे, देशमुख आणि कंपनी, पृष्ठे २२८, एकशे पंच्याहत्तर रुपये.
- काळा गुलाव : संजय लांडगे, समता प्रकाशन, सोलापूर. पृष्ठे ४०, तीस रुपये.
- आईची कविता : संजय लांडगे, समता प्रकाशन, सोलापूर. पृष्ठे ४८, तीस रुपये.
- मराठी वृत्तपत्रसृष्टीचे जनक : दर्पणकार आचार्य वाळशास्त्री जांभेकर, लोकजागर प्रकाशन, फलटण, जि. सातारा. पृष्ठे ३१, दहा रुपये.
- मराठवाडा साहित्य संमेलन अध्यक्षीय भाषणे- भाग पहिला : संपा. न्या नरेंद्र चपळगावकर कौतिकराव टाले पाटील मराठवाडा साहित्य परिषद प्रकाशन, औरंगावाद. पृष्ठे १६२, शंभर रुपये.
- स्टीफन हॉकिंग : निवास पाटील, कॉंटिनेंटल प्रकाशन, पुणे. पृष्ठे ७५, चाळीस रुपये.
- भूकंप : य. शि. सहस्त्रवुद्धे, सु. त्रि. राजुरकर, कॉंटिनेंटल प्रकाशन, पृष्ठे १११, साठ रुपये.
- निसर्ग आणि माणूस : प्रकाश गोळे, कॉंटिनेंटल प्रकाशन, पुणे. पृष्ठे १५२, पच्याहत्तर रुपये.
- आरोग्य सौंदर्य व दीर्घायुष्य प्राप्तीचा मार्गदर्शक : पुरुषोत्तम नागेश ओक, माधवी प्रकाशन, पुणे. पृष्ठे ९२, चाळीस रुपये.
- संघर्ष- भाई मनोहर कोतवाल चरित कहाणी : शिवाजी सावंत, ए. डी. कांवळे प्रकाशक. पृष्ठे ३७२, पन्नास रुपये.
- मिस रामपूर वुद्रुक : चंद्रकांत महामिने, अक्षरमुद्रा प्रकाशन, नाशिक, पृष्ठे १६०, ऐंशी रुपये.
- नरेंद्र एकनाथ आणि सामराज यांची रुक्मिणी स्वयंवरे- एक चिकित्सा : रमेश आवलगावकर, चंद्रकला प्रकाशन, पुणे. पृष्ठे २६८, एकशे साठ रुपये.



अनुक्रमणिका

# कार्यवृत्त

(१ एप्रिल ते ३१ जून ९६ अखेर)

**दि. १० एप्रिल ९६ :** डॉ. केतकर यांच्या स्मृतिदिनानिमित्त सकाळी ८ वाजता परिषदेचे पदाधिकारी व कार्यकारी मंडळाचे सदस्य यांनी कमला नेहरू पार्कमध्ये जाऊन डॉ. केतकर यांच्या स्मारकाचे दर्शन घेतले व पुष्पांजली वाहिली. सर्वश्री गं. ना. जोगळेकर, राजा फडणीस, रत्नाकर कुलकर्णी, कल्याणी दिवेकर, प्रमोद ओक, रंगा मराठे, ह. ल. निपुणगे, शंतनू चिंधडे, म. श्री. दीक्षित इ. सभासद यावेळी उपस्थित होते. संध्याकाळी परिषदेच्या पटवर्धन सभागृहात श्री. स. मा. गर्गे यांचे कोशवाङ्मयः काही विचार' या विषयावर व्याख्यान झाले.

**दि. २६ व २७ मे ९६** - परिषदेचा ९० वा वर्धापन दिन :

म.सा.प.चा ९० वा वर्धापन दिन दि. २६ व २७ मे ९६ रोजी मोठ्या उत्साहात व आनंदात भव्य प्रमाणात साजरा करण्यात आला.

**शाखा मेळावा** – दि. २६ मे ९६ रोजी सकाळी १०.३० वाजता परिषदेच्या पटवर्धन सभागृहात शाखा मेळावा आयोजित करण्यात आला होता. अध्यक्षस्थानी कार्याध्यक्ष डॉ. गं. ना. जोगळेकर होते. शाखा प्रतिनिधींनी आपापल्या शाखेच्या कार्याची माहिती दिली. येणाऱ्या अडचणी व सूचना मांडल्या. नवती महोत्सवाच्या निमित्ताने प्रत्येक जिल्ह्यात जिल्हा सभासद मेळावा घेण्याचे ठरवण्यात आले. मेळाव्यांचे नियोजन त्या त्या शाखांनी करावे ही सूचना शाखा प्रतिनिधींनी मान्य केली. शाखा मेळाव्यास पुढीलप्रमाणे प्रतिनिधी उपस्थित होते.

कार्यकारी मंडळ - सर्वश्री गं. ना. जोगळेकर, राजा फडणीस, रत्नाकर कुलकर्णी, कल्याणी दिवेकर, भगवान ठाकूर, शंकर सारडा, ह. ल. निपुणगे, हरि नरके, शंतनू चिंधडे, रंगा मराठे, प्रमोद ओक, मधुकर हसमनीस, प्रकाश होळकर, ल. रा. नसिरावादकर, जे. जे. कुलकर्णी, प्रभाकर संत व अश्विनी धोंगडे

शाखा सदस्य व पदाधिकारी : सर्वश्री भास्कर भोळे, विश्वास तेंडुलकर, राजेंद्र होळकर (लासलगाव), विजय जाधव (पिंपरी चिंचवड,) वी. वी. महाजन (धुळे), भालचंद्र रेंडे (कल्याण), मधुकर देशपांडे, पुरुषोत्तम वैद्य (डोंबिवली), पद्माकर शिरवाडकर, म. पां. भावे (ठाणे), अशोक गोवंडे (इचलकरंजी), विलास शहा (सोलापूर), श्यामराव पाटील, शरद भोसले, धोंडीराम सलगर, दशरथ पाटील, शहानवाझ मुल्ला, सौ. दीपा देशपांडे, मंगला कोकाटे (इस्लामपूर), विष्णू वोरकर (अहमदनगर), नामदेवराव देसाई, डी. टी. गडाख (सोनई), वावूराव उपाध्ये, दिनकर पोखरकर (श्रीरामपूर), शिवराम परव, मधुकर वाणी, आण्णासाहेब पवार (उल्हासनगर), वावासाहेव देशमुख, लक्ष्मण रा. कांवळे (येवला), वि. अ. शेख, रवींद्र वेडकीहाळ, व्यंकटेश देशपांडे (फलटण)

संध्याकाळी ६.३० वाजता १९९५ मधील ग्रंथ पुरस्कार वितरण समारंभ राजेंद्र वनहट्टी यांच्या अध्यक्षतेखाली झाला. उपाध्यक्ष शिवाजी सावंतही या वेळी उपस्थित होते. परीक्षकांच्या वतीने डॉ. म. वि. गोखले आणि पारितोषिक विजेत्यांच्या वतीने डॉ. अशोक कामत व डॉ. तारा भवाळकर यांची भाषणे झाली. सूत्रसंचालन डॉ. कल्याणी दिवेकर यांनी केले. हरि नरके यांनी आभार मानले. समारोपात राजेंद्र वनहट्टी यांनी म. सा. प. ही नियमितपणे पारितोपिक देणारी एकमेव संस्था असल्याने शासकीय ग्रंथ पारितोषिके देण्याचे काम महाराष्ट्र शासनाने परिषदेकडे सोपवावे अशी सूचना केली.

समारंभापूर्वी पारितोपिकविजेते लेखक, प्रकाशक, परीक्षक यांच्यासाठी चहापानाचा कार्यक्रम आयोजित करण्यात आलेला होता.



अनुक्रमणिका

परिषदेच्या इमारतीवर तीन दिवस (२६ - २८ मे ९६) विद्युत रोषणाई करण्यात आलेली होती.

महात्मा फुले सभागृहात झालेल्या नव्वदाव्या वर्धापनदिन समारंभाचे अध्यक्षस्थानी राजेंद्र वनहट्टी होते. प्रमुख पाहुणे म्हणून पुणे विद्यापीठाचे कुलगुरू डॉ. वसंतराव गोवारीकर हे उपस्थित होते. प्रदीर्घ साहित्य सेवेबद्दल दिला जाणारा म. सा. प. पुरस्कार कादंबरीकार श्री. ना. पेंडसे यांना डॉ. वसंतराव गोवारीकर यांच्या हस्ते देण्यात आला. साहित्यसंस्थेत निरपेक्ष कार्य करणाऱ्या कार्यकर्त्यास दिला जाणारा डॉ. भीमराव कुलकर्णी पुरस्कार यंदा इंदूरच्या श्री. प्र. गो. घाटे यांना देण्यात आला. तसेच दरवर्षी साहित्यिक सहाय्य निधीतून दिली जाणारी गौरववृत्ती यंदा तंजावरच्या श्री. टी. भीमराव यांना देण्यात आली. पुरस्कारप्राप्त मान्यवरांबद्दल अनुक्रमे शिवाजी सावंत, ल. रा. नसिराबादकर व सु. प्र. कुलकर्णी यांची गौरवपर भाषणे झाली. तसेच श्री. ना. पेंडसे, प्र. गो. घाटे व टी. भीमराव यांची सत्काराला उत्तरादाखल समयोचित भाषणे झाली.

परिषदेचे एक विश्वस्त म. श्री. दीक्षित यांनी लिहिलेला म. सा. परिषदेचा ९० वर्षांचा इतिहास मराठी राज्य विकास संस्थेने याच समारंभात प्रमुख पाहुणे डॉ. गोवारीकर यांच्या हस्ते प्रकाशित केला. मराठी राज्य विकास संस्थेच्या वतीने डॉ. सरोजिनी वैद्य यांनी प्रास्ताविक केले. श्री. दीक्षित यांचा राजेंद्र वनहट्टी यांच्या हस्ते सत्कार करण्यात आला.

शेवटी प्रमुख पाहुणे डॉ. गोवारीकर यांचे भाषण झाले. अध्यक्षीय समारोप राजेंद्र वनहट्टी यांनी केला.

प्रास्ताविक व स्वागत कार्याध्यक्ष डॉ. गं. ना. जोगळेकर यांनी केले तर आभारप्रदर्शन डॉ. अश्विनी धोंगडे यांनी केले. समारंभाच्या प्रारंभी शारदास्तवन व शेवटी पसायदान सौ. वैजयंती चिपळूणकर यांनी म्हटले. समारंभाचे सूत्रसंचालन डॉ. कल्याणी दिवेकर यांनी केले.

दोन्ही दिवसांचे कार्यक्रम यशस्वी करण्यासाठी परिषदेचे पदाधिकारी आणि कर्मचारी यांनी विशेष परिश्रम घेतले.

**दि. ११ जून ९६ :** परिषदेचे उपाध्यक्ष श्री. रामदास फुटाणे यांची विधान परिषदेवर आमदार म्हणून निवड झाल्याबद्दल राजेंद्र वनहट्टी यांच्या अध्यक्षतेखाली त्यांचा सत्कार करण्यात आला. प्रास्ताविक डॉ. गं. ना. जोगळेकर यांनी केले तर आभार रत्नाकर कुलकर्णी यांनी मानले. समारंभाचे सूत्रसंचालन कल्याणी दिवेकर यांनी केले. या प्रसंगी अश्विनी धोंगडे व प्रकाश पाठारे यांनी रामदास फुटाणे यांच्या गौरवपर भाषणे केली.

**दि. २१ जून ९६ :** नाथमाधव स्मृतिदिनानिमित्त ज्येष्ठ ऐतिहासिक कादंबरीकार श्री. ना. सं. इनामदार यांचे 'ऐतिहासिक कादंबरी : आभा आणि प्रतिभा' या विषयावर भाषण झाले.

**दि. २४ जून ९६ :** मनोरंजनकार का. र. मित्र यांच्या स्मृतिदिनानिमित्त डॉ. म. वि. गोखले यांचे 'मराठी विज्ञानकथा : स्थिती व गती' या विषयावर भाषण झाले.

**म. सा. प. इस्लामपूर शाखा.**

दि. २१ जून ९६ : डॉ. किशोर काळे लिखित 'कोल्हाट्याचं पोर' या पुस्तकावर बोरगाव येथे चर्चासत्र घेण्यात आले. त्यात प्रा. शरद भोसले, प्रा. मधुकर हसमनीस, प्रा. मंगला कोकाटे, प्रा. गवळी यांनी आपले विचार मांडले. मधु शेटे यांनी समारोप केला. धोंडीराम सलगर यांनी सूत्रसंचालन केले.

**रत्नाकर कुलकर्णी**, कार्यवाह

## महाराष्ट्र साहित्य परिषद

# 'नवती महोत्सवानिमित्त' आयोजिलेले संकल्प

मराठी भाषा आणि साहित्य यांच्या सर्वांगीण अभिवृद्धीसाठी ग्रंथनिर्मितीपासून ते ग्रंथ पारितोषिकांपर्यंत सर्व प्रकारचे सर्जनशील, विधायक आणि संघटनात्मक वाङ्मयीन कार्य अखंडपणे करणारी महाराष्ट्र साहित्य परिषद आता शताब्दीकडे वाटचाल करीत आहे. येत्या २७ मे १९९६ रोजी तिला नव्वद वर्षे पूर्ण झाली. परिषदेचा नवती महोत्सव भव्य प्रमाणात लवकरच साजरा होणारा आहे. या महोत्सवाच्या निमित्ताने परिषदेचे कार्य अधिक कार्यक्षम, अधिक व्यापक आणि अधिक जोमाने होण्यासाठी अनेक संकल्प केले आहेत.

**भव्य, सुसज्ज इमारत**

वाढती सभासदसंख्या, विविध प्रकारचे उपक्रम आणि कार्यक्रम यासाठी परिषदेला किमान पाचसहा मजली सुसज्ज इमारतीची अतिशय गरज आहे. गोंगाटाचा त्रास होणार नाही असे मोठे वातानुकुलित सभागृह, ग्रंथालय, संशोधन विभाग, परीक्षा विभाग, कार्यालय, अतिथी निवास, बालविभाग, महिलाविभाग इत्यादीसाठी सर्व सुविधायुक्त इमारत बांधण्याची परिषदेची योजना आहे.

**मराठी वाङ्मयाचा इतिहास**

आरंभापासून ते १९५० पर्यंतचा मराठी वाङ्मयाचा इतिहास सहा खंडात परिषदेने प्रसिद्ध केला आहे. १९५० पासून पुढचा अद्यावत मराठी वाङ्मयाच्या इतिहासाचा सातवा खंड सिद्ध करण्याचे ठरवले आहे. तसेच अमराठी वाचकांसाठी मराठी वाङ्मयाचा संपूर्ण इतिहास इंग्रजीत व हिंदीत तयार करण्याचा अपूर्व प्रकल्पही परिषदेने हाती घेतला आहे.

**अक्षरवाङ्मय योजना**

अक्षर वाङ्मयात गणली जाणारी मराठीतील १०० उत्कृष्ट पुस्तके केवळ हजार रुपयात मराठी वाचकांना देण्याची अभिनव योजना परिषदेने आखली आहे. या महत्त्वाकांक्षी योजनेस मूर्त स्वरूप द्यायचे आहे.

**संदर्भग्रंथाचे प्रकाशन**

परिषदेने यापूर्वी प्रकाशित केलेल्या अनेक संदर्भ ग्रंथांच्या आवृत्त्या संपल्या आहेत. त्यांना सतत मागणी असल्यामुळे त्यांच्या नव्या आवृत्त्यांचे प्रकाशन परिषदेस करायचे आहे.

**साहित्यिक साहाय्यनिधी**

साहित्य परिषदेने अडीच लाख रुपयांचा साहित्यिक साहाय्य निधी जमवला आहे. परंतु जास्तीत जास्त गरजू साहित्यिकांना मानधन देता यावे या उद्देशाने आणखी दहा लाख रुपयांचा निधी जमविण्याचा साहित्य परिषदेचा संकल्प आहे.

**हे सर्व संकल्प**
**सिद्धीस नेण्यासाठी साहित्यप्रेमींनी**
**अर्थसहाय्य करावे असे आवाहन आहे!**

# नवती महोत्सवानिमित्त आवाहन

भव्य सुसज्ज इमारत, मराठी वाङ्मयाचा इतिहास,
अक्षर वाङ्मय योजना, संदर्भ ग्रंथांचे प्रकाशन,
साहित्यिक सहाय्य निधी वगैरे संकल्पयोजना व उपक्रम
प्रत्यक्षात आणण्यासाठी किमान एक कोटी रुपयांचा निधी
उभारावा लागेल. हे लक्ष्य साध्य करण्यासाठी
महाराष्ट्र साहित्य परिषद या आद्य व ज्येष्ठ
साहित्यसंस्थेस सभासद बंधु-भगिनी आणि
साहित्यप्रेमी रसिक यांनी उदारपणे अर्थसाहाय्य करावे
अशी विनंती आहे.

या निधीसाठी अर्थसाहाय्य करणाऱ्यांना प्राप्तिकर सवलत संदर्भात
'८० जी' या प्रमाणपत्राचा लाभ मिळेल.
देणगीचा धनादेश 'महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे'
या नावाने पाठवावा, ही विनंती.

आपले

| | |
|---|---|
| राजेंद्र बनहट्टी<br>अध्यक्ष | गं. ना. जोगळेकर<br>कार्याध्यक्ष |
| गो. म. कुलकर्णी<br>रामदास फुटाणे<br>शिवाजी सावंत<br>उपाध्यक्ष | ना. गो. जोशी<br>कोषाध्यक्ष<br>राजा फडणीस<br>निमंत्रक निधी समिती |

कल्याणी दिवेकर, रत्नाकर कुलकर्णी, भगवान ठाकूर
कार्यवाह

सर्जेराव घोरपडे, म. श्री. दीक्षित, एम. आर. परांजपे
विश्वस्त

महाराष्ट्र साहित्य परिषद
टिळक रस्ता, पुणे ४११ ०३०
दूरध्वनी - ४७५९६३

# नवती महोत्सवासाठी मिळालेल्या देणग्या

( दि. १४।६।९६ पर्यंत )

| | रुपये | | |
|---|---|---|---|
| २८. डॉ. अश्विनी धोंगडे | १०००/- | ४६. श्री. भा. तु. नामेकर | २१/- |
| २९. डॉ. संगमनेरकर अ. वा. | १००१/- | ४७. सौ. परदेशी | ११/- |
| ३०. डॉ. कल्याणी दिवेकर | १००१/- | ४८. श्री. शंतनु चिंधडे | १०००/- |
| ३१. श्रीमती शिरीष केतकर | १०१/- | ४९. ॲड. ज. ज. कुलकर्णी | १००१/- |
| ३२. डॉ. मधुकर हसमनीस | १००१/- | ५०. श्री. संत प्र. अ. | १०००/- |
| ३३. डॉ. सु. रा. चुनेकर | १०००/- | ५१. श्री. देशमुख प्र. श्री. | १०१/- |
| ३४. श्री. ए. ग. कुलकर्णी | १०१/- | ५२. श्री. जोशी ज. वी. | १००/- |
| ३५. श्रीमती श्यामला कुलकर्णी | ५००/- | ५३. साहित्यप्रेमी भगिनीमंडळ | २००१/- |
| ३६. श्रीमती वीणा देव | १०००/- | ५४. श्री. रामदास फुटाणे | १०००/- |
| ३७. श्री. ल. रा. नसिरावादकर | १०००/- | ५५. डॉ. श्री. श्री. घारे | १०००/- |
| ३८. श्रीमती लीला रवडे | ५०/- | ५६. एक हितचिंतक | १००१/- |
| ३९. डॉ. हे. वि. इनामदार | १५१/- | **स्मरणिकेसाठी** | |
| ४०. श्री. अनंत शाम जोशी | १०००/- | ५७. इक्वीप सेल्स | ५०००/- |
| ४१. श्री. म. रा. पारसनीस | २५०/- | ५८. श्री. मोतीलाल पूत | ५००/- |
| ४२. मे. फिल्ट्रॉन (इं.) प्रा. लि. | १००१/- | ५९. मं. त्रिशूल फोर्जिंग्ज | ३०००/- |
| ४३. श्री. शिवाजी सावंत | १००१/- | ६०. सिलीकॉन पॉवर | ५०००/- |
| ४४. श्री. म. ना. अदवंत | १००१/- | ६१. आर. आर. पॅकेजिंग | ५००/- |
| ४५. श्री. गं. वि. संत | १०१/- | ६२. रजित केमिकल्स | ५००/- |

राजा फडणीस, प्रमुख कार्यवाह






अनुक्रमणिका

# राज्य मराठी विकास संस्था
## नवी प्रकाशने

१. **मराठी लघुलेखन शब्दकोश :**
व. वा. इनामदार,
मूल्य रु. १४०/- सवलत मूल्य रु. १००/-

२. **त्रिवेंद्रमची मराठी हस्तलिखिते :**
डॉ. वसंत जोशी,
मूल्य रु. ३०/- सवलत मूल्य रु. २०/-

३. **शिक्षकांसाठी अध्ययन पुस्तिका**
(मराठी वाचनपाठ, इयत्ता नववी, इंग्रजी माध्यम)
मूल्य रु. २०/- सवलत मूल्य रु. १५/-

४. **महाराष्ट्र साहित्य परिषद** (९० वर्षांचा इतिहास)
(अर्वाचीन महाराष्ट्राची जडणघडण या मालिकेतील पहिले पुस्तक)
म. श्री. दीक्षित
मूल्य रु. ५०/- (ग्रंथाली वितरण) सवलत मूल्य रु. ४०

टीप :- पुस्तके टपालाने हवी असल्यास टपालखर्च वेगळा पडेल. पुस्तकांच्या सवलत मूल्याएवढी रक्कम पाठवा. पुस्तके टपालखर्चाच्या रकमेइतक्या व्ही. पी. ने पाठविण्यात येतील.

-: संपर्क :-
प्रशासकीय अधिकारी, **राज्य मराठी विकास संस्था,**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३ महापालिका मार्ग,
मुंबई - ४०० ००१.

# महाराष्ट्र साहित्य परिषद

टिळक रस्ता, पुणे ४११०३०

१ जुलै १९९६

## वार्षिक सर्वसाधारण सभेची सूचना

स. न. वि. वि.

महाराष्ट्र साहित्य परिषदेची वार्षिक सर्वसाधारण सभा **रविवार दिनांक २८ जुलै १९९६** रोजी पुणे येथे माधवराव पटवर्धन सभागृहात **सायंकाळी ४.३०** वाजता **श्री.राजेंद्र बनहट्टी** यांच्या अध्यक्षतेखाली भरणार आहे. या सभेला सभासदांनी वेळेवर उपस्थित राहून सहकार्य करावे, अशी विनंती आहे. या सभेत खालीलप्रमाणे कामकाज होईल.

**सभेत करावयाची कामे**

१) श्रद्धांजली

२) मागील सभेचे इतिवृत्त वाचून संमत करणे.

३) १९९५-९६ या वर्षाचे कार्यवृत्त संमत करणे.

४) १९९५-९६ चे उत्पन्न-खर्च पत्रक आणि ताळेबंद संमत करणे.

५) १९९६-९७ चा अर्थसंकल्प संमत करणे.

६) १९९६-९७ करिता हिशेब तपासनिसांची नेमणूक करणे.

७) मा. अध्यक्षांच्या संमतीने आयत्या वेळचे विषय.

आपले

| | | |
|---|---|---|
| **ना. गो. जोशी**<br>कोषाध्यक्ष | **गं. ना. जोगळेकर**<br>कार्याध्यक्ष | **राजा फडणीस**<br>प्रमुख कार्यवाह |
| **रत्नाकर कुलकर्णी**<br>कार्यवाह | **कल्याणी दिवेकर**<br>कार्यवाह | **भगवान ठाकूर**<br>कार्यवाह |

---

**विशेष सूचना :**

१) पुरेशी गणसंख्या नसल्यास सभा १५ मिनिटे स्थगित करण्यात येईल व नंतर ती रीतसर सुरू होईल. अशा वेळी गणसंख्येचे बंधन असणार नाही.

२) वरील कामकाजासंबंधी मतदार सभासदांस काही सूचना करावयाच्या असतील वा माहिती पाहिजे असेल, अगर ठराव मांडायचा असेल तर लेखी स्वरूपात तसे **२० जुलै १९९६** पर्यंत कळवावे.

## महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ३०

वर्ष ९० वे                                                                 नोंदणी क्र. ४०९

### वार्षिक कार्यवृत्त : १९९५-९६

महाराष्ट्र साहित्य परिषदेचे १ एप्रिल १९९५ ते ३१ मार्च १९९६ या कालावधीचे कार्यवृत्त सादर करताना आम्हांस आनंद होत आहे.

**सभासद**

वर्षारंभी वार्षिक साधारण सभासद ८७ आणि आजीव सभासद ४४५९ अशी एकूण सभासद संख्या ४५४६ होती. १ एप्रिल ९५ ते ३१ मार्च ९६ या कालावधीत २६५ आजीव सभासद नव्याने झाले. १५ सभासद वृत्तांतसालात कालवश झाले. या कालावधीत १५ वार्षिक साधारण सभासद नव्याने झाले व २७ सभासद कमी झाले. यामुळे ३१ मार्च १९९६ रोजी आजीव सभासद ४७०९ आणि साधारण सभासद ७५ अशी एकूण सभासद संख्या ४७८४ आहे.

**कार्यकारी मंडळाच्या सभा**

या वृत्ताच्या कालावधीत कार्यकारी मंडळाच्या एकूण ४ सभा झाल्या. दि. ७ एप्रिल ९५, दि.११ जून ९५, दि. ३ डिसेंबर ९५ व दि. ३ मार्च ९६ रोजी झालेल्या या सभांना खालीलप्रमाणे उपस्थिती होती. दि. ३ डिसेंबर ९५ ची सभा लासलगाव येथे व बाकीच्या सभा पुणे येथे घेण्यात आल्या.

| सभासदांची नावे | उपस्थित | सभासदांची नावे | उपस्थित |
|---|---|---|---|
| १. श्री. गं. ना. जोगळेकर | ४ | १४. श्री. ह.ल. निपुणगे | ४ |
| २. श्री. रवींद्र भट | ३ | १५. श्री. हरि नरके | ३ |
| ३. श्री. ना. गो. जोशी | ४ | १६. श्री. शंतनू चिंधडे | ४ |
| ४. श्री. रत्नाकर कुलकर्णी | ४ | १७. श्री. मधुकर हसमनीस | ३ |
| ५. श्री कल्याणी दिवेकर | ३ | १८. श्री. प्रकाश होळकर | ३ |
| ६. श्री. आश्विनी धोंगडे | ३ | १९. श्री. सु. प्र. कुलकर्णी | ४ |
| ७. श्री. शंकर सारडा | ३ | २०. श्री. भगवान ठाकूर | ४ |
| ८. श्री. रंगा मराठे | ४ | २१. श्री. शं. रा. राणे | २ |
| ९. श्री. प्रमोद ओक | ४ | २२. श्री. जे. जे. कुलकर्णी | ३ |
| १०. श्री. राजा फडणीस | ४ | २३. श्री. ल.रा.नसिराबादकर | २ |
| ११. श्री. सु. वा. जोशी | ३ | २४. श्री. प्रभाकर संत | ४ |
| १२. श्री. अरविंद संगमनेरकर | ३ | २५. श्री. माधव कोंडविलकर | २ |
| १३. श्री. निशिकांत श्रोत्री | २ | २६. श्री. हेमा लेले | १ |



अनुक्रमणिका

वृत्तांत-सालात ८-२-९६ रोजी परिषदेचे प्रमुख कार्यवाह श्री. रवींद्र भट यांनी वैयक्तिक कारणास्तव परिषदेच्या कार्यवाहपदाचा राजीनामा दिला. या रिकाम्या झालेल्या जागेवर प्रमुख कार्यवाह म्हणून श्री. राजा फडणीस यांची कार्यकारी मंडळाने दिनांक ३-३-९६ रोजी झालेल्या सभेत एकमताने निवड केली. दिनांक ६-२-९६ ते दिनांक ३-३-९६ या मुदतीत प्रमुख कार्यवाहपदाचा अतिरिक्त भार श्री. रत्नाकर कुलकर्णी यांच्यावर सोपविण्यात आला होता. पुणे महानगरपालिका क्षेत्रात रिकाम्या झालेल्या कार्यकारी मंडळाच्या सभासद जागी श्री. हेमा लेले यांची कार्यकारी मंडळाने नियुक्ती केली. बाहेरील कार्यवाह श्री. सु. प्र. कुलकर्णी यांनी कार्यवाहपदाचा राजीनामा दिल्यामुळे त्यांच्या जागी श्री. भगवान ठाकूर यांची बाहेरील कार्यवाह म्हणून निवड करण्यात आली. दिनांक १-४-९६ ते ३१-३-९७ या वर्षासाठी महामंडळावरील परिषदेचे प्रतिनिधी म्हणून श्री. सु. प्र. कुलकर्णी यांची श्री. हरि नरके यांच्याऐवजी निवड करण्यात आली.

### साहित्यिक / सांस्कृतिक कार्यक्रम

● **१० एप्रिल १९९५ :** प्रतिवर्षाप्रमाणे महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या पदाधिकाऱ्यांनी व उपस्थित कार्यकारी मंडळ सभासदांनी कमला नेहरू उद्यानातील डॉ. श्री. व्यं. केतकर यांच्या स्मारकास पुष्पांजली वाहिली. संध्याकाळी ६-३० वाजता मसापमध्ये डॉ. गो. म. कुलकर्णी यांचे 'महाराष्ट्रीयांचे काव्यपरीक्षण' या विषयावर व्याख्यान झाले.

● **२८ मे १९९५ :** स्वा. सावरकर यांच्या जन्मदिनी पुणे विद्यार्थी गृह प्रकाशन व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांच्या विद्यमाने 'भारतीय स्वातंत्र्य रणसंग्राम्' या श्री. पो. रं. अंबिके यांनी लिहिलेल्या पुस्तकाचा प्रकाशन समारंभ झाला. अध्यक्षस्थानी श्री. भाई वैद्य होते. यावेळी श्री. प्र . द. पुराणिक व श्री. दि. ब. केरूर आणि श्री. वि. स. वाळिंबे यांची व्याख्याने झाली.

● **२३ जून १९९५ :** कै. का. र. मित्र स्मृतिदिनानिमित्त 'अल्डस् हक्स्ले : साहित्य आणि जीवन ' या विषयावर डॉ. द. वि. जोग यांचे माहितीपूर्ण भाषण झाले.

● **८ जुलै १९९५ :** कै . वा. म. जोशी स्मृतिदिनानिमित्त 'वामन मल्हारांच्या कादंबऱ्यांतील व वर्तमानकालीन स्त्रीजीवन' या विषयावर डॉ. वीणा देव यांचे भाषण झाले.

● **२५ व २६ जुलै १९९५ :** संत सावतामाळी पुण्यतिथीनिमित्त श्री. रवींद्र भट यांची दोन व्याख्याने आयोजित करण्यात आली होती. २५ जुलै रोजी 'क्रांतदर्शी नामदेव' व २६ जुलै रोजी 'जगा जाणीव दे प्रकाशाची ' या विषयावर श्री. रवींद्र भट यांचे भाषण झाले.

● **२८ व २९ जुलै ९५ :** गोपाळ गणेश आगरकर स्मृतिशताब्दीच्या निमित्ताने महाराष्ट्र साहित्य परिषद व नाथीबाई दामोदर ठाकरसी महाविद्यालयाच्या संयुक्त विद्यमाने 'महाराष्ट्रातील स्त्री-विषयक जाणिवांचा विकास' या विषयावर एक चर्चासत्र आयोजित केले होते.

महाराष्ट्र साहित्य परिषदेचे कार्याध्यक्ष डॉ. गं. ना. जोगळेकर यांनी प्रास्ताविक केले. प्राचार्या डॉ. आश्विनी धोंगडे यांनी चर्चासत्रामागची भूमिका विशद केली. डॉ. स. ह. देशपांडे यांनी चर्चासत्राचे उद्घाटन केले. चर्चासत्राच्या पहिल्या दिवशी लोकहितवादी, म. फुले व

आगरकर यांच्या स्त्रीविषयक विचारांचा परामर्श घेतला गेला. या सत्रात डॉ. मा. पं. मंगुडकर, डॉ. भगवंत सुमंत व विद्या बाळ यांनी आपले निबंध सादर केले. अनुक्रमे डॉ. म. वि. गोखले, डॉ. कुमार सप्तर्षी व डॉ. गं. ना. जोगळेकर हे सत्रांच्या अध्यक्षस्थानी होते.

दुसऱ्या दिवशी महर्षी कर्वे व महात्मा गांधी यांच्या स्त्रीविषयक विचारांवर अनुक्रमे डॉ. अंजली सोमण व डॉ. कल्याणी दिवेकर यांनी निबंध वाचन केले. अध्यक्षस्थानी डॉ. तारा शास्त्री व श्रीमती अनुताई लिमये होत्या. यानंतर स्त्रीविषयक जाणिवा : १९४७ ते १९७५ व स्त्रीविषयक जाणिवा : १९७५ ते १९९५ या विषयांवर अनुक्रमे डॉ. कुमुद पोरे व डॉ. अश्विनी धोंगडे यांनी निबंध सादर केले. या सत्रांच्या अध्यक्षा प्रा. पुष्पा भावे यांचे संपूर्ण चर्चासत्राचा आढावा घेणारे भाषण झाल्यानंतर कार्यक्रमाची सांगता झाली.

महाराष्ट्रातील स्त्री काल कोठे होती, आज कोठे आहे, व भविष्यातील तिच्या वाटचालीची दिशा कोणती याचे सम्यक भान या चर्चासत्राच्या निमित्ताने निर्माण होऊ शकले.

● **१ ऑगस्ट १९९५ :** कै. अण्णाभाऊ साठे यांचा जन्मदिन म. सा. परिषद व दलित साहित्य परिषद यांच्या संयुक्त विद्यमाने साजरा करण्यात आला. 'शाहीर अण्णाभाऊ साठे' या विषयावर डॉ. कृष्णा किरवले यांचे भाषण झाले.

● **२४ ऑगस्ट १९९५ :** कै. पु. भा. भावे स्मृतिदिनानिमित्त 'तिमिरातून तेजाकडे' या विषयावर श्री. रवींद्र भट यांचे व्याख्यान झाले.

● **११ सप्टेंबर १९९५ :** आचार्य विनोबा भावे यांच्या जन्मशताब्दीनिमित्त 'साहित्यिक विनोबा' या विषयावर प्रा. आशा जोशी यांचे भाषण झाले.

● **१३ सप्टेंबर १९९५ :** वै. शं. वा. तथा सोनोपंत दांडेकर जन्मशताब्दीनिमित्त म. सा. परिषद व स. प. महाविद्यालय यांच्या संयुक्त विद्यमाने 'सोनोपंत दांडेकर : जीवन व कार्य' या विषयावर डॉ. दि. ब. केरूर यांचे भाषण आयोजित करण्यात आले. हा समारंभ स. प. महाविद्यालयात साजरा करण्यात आला.

● **१५ सप्टेंबर १९९५ :** बालकवी स्मृतिदिनानिमित्त 'निसर्ग' या विषयावर अभिनव कवि-संमेलन आयोजित करण्यात आले होते. या कविसंमेलनात सर्वश्री अश्विनी धोंगडे, मीरा शिंदे, संगीता जोशी, शीला निपुणगे, माधवी पटवर्धन, प्रियदर्शन पोतदार, परशुराम देशपांडे, जीवन आनंदगावकर, किशोर पेंढारकर आदि कवी-कवयित्री यांनी भाग घेतला होता. डॉ. शंतनु चिंधडे यांनी या कार्यक्रमाचे सूत्रसंचालन केले.

● **१६ ऑक्टोबर १९९५ :** कै. व. ह. गोळे यांच्या स्मृतिदिनानिमित्त ज्येष्ठ चित्रपट कलावंत श्री. चंद्रकांत गोखले यांची प्रकट मुलाखत श्री. बापू वाटवे यांनी घेतली. यावेळी श्री. गोखले यांनी काही नाट्यप्रवेशही करून दाखवले. या कार्यक्रमास रसिकांनी खूपच गर्दी केली होती.

● **७ नोव्हेंबर १९९५ :** सुप्रसिद्ध कादंबरीकार व परिषदचे उपाध्यक्ष श्री. शिवाजी सावंत यांना 'मूर्तिदेवी' पुरस्कार मिळाल्याबद्दल परिषदेचे अध्यक्ष श्री. राजेंद्र बनहट्टी यांच्या हस्ते

सत्कार करण्यात आला. यावेळी श्री. शिवाजी सावंत यांची श्री. वि. स. वाळिंबे, श्री. अरुण खोरे यांनी प्रकट मुलाखत घेतली.

● **२७ नोव्हेंबर १९९५ :** कै. आहिताग्नी राजवाडे स्मृतिदिनानिमित्त 'मराठी संतांचे तत्त्वज्ञान' या विषयावर प्रा. ह. श्री. शेणोलीकर यांचे व्याख्यान आयोजित करण्यात आले होते.

● **२९ नोव्हेंबर १९९५ :** श्री. क्षेत्र आळंदी येथे आयोजित केलेल्या ६९ व्या अ. भा. मराठी साहित्य संमेलनाच्या नियोजित अध्यक्षा शांताबाई शेळके यांचा प्रथेनुसार पहिला जाहीर सत्कार म. सा. परिषदचे अध्यक्ष श्री. राजेंद्र बनहट्टी यांच्या हस्ते करण्यात आला. कार्यक्रमाचे प्रास्ताविक डॉ. गं. ना. जोगळेकर, कार्याध्यक्ष यांनी केले. डॉ. कल्याणी दिवेकर व प्रा. रा. ग. जाधव यांची अध्यक्षा शांताबाई शेळके यांच्या गौरवपर व त्यांच्या साहित्याचे रसग्रहण करणारी भाषणे झाली. अध्यक्ष श्री. राजेंद्र बनहट्टी यांनी अध्यक्षा शांताबाई शेळके यांच्या साहित्याचे मर्म स्पष्ट केले. त्यानंतर श्रीमती शांताबाई शेळके यांनी भावपूर्ण शब्दात आपले मनोगत व्यक्त केले. श्री. रवींद्र भट यांनी आभार मानले. या कार्यक्रमाचे सूत्रसंचालन श्री. रत्नाकर कुलकर्णी यांनी केले.

या हृद्य कार्यक्रमानंतर माधव जूलियन स्मृतिदिनानिमित्त निमंत्रित कवींचे कविसंमेलन झाले. याचे सूत्रसंचालन डॉ. शंतनु चिंधडे यांनी केले.

● **२५ डिसेंबर १९९५ :** कै. श्री. म. माटे स्मृतिदिनानिमित्त श्री. शंकरराव खरात यांचे 'समाजसुधारक श्री. म. माटे ' या विषयावर माहितीपूर्ण भाषण झाले.

● **२२ जानेवारी १९९६ :** महाराष्ट्र फाऊंडेशनचा पुरस्कार प्राप्त झाल्याबद्दल कॉन्टिनेन्टल प्रकाशन या संस्थेचे संचालक व म. सा. परिषदेचे माजी कोषाध्यक्ष श्री. अनंतराव कुलकर्णी व म. सा. परिषदेचे सध्याचे उपाध्यक्ष प्रा. गो. म. कुलकर्णी यांचा परिषदेचे अध्यक्ष श्री. राजेंद्र बनहट्टी यांच्या हस्ते सत्कार करण्यात आला. श्री. श्रीपाद जोशी यांनी श्री. अनंतराव कुलकर्णी व डॉ. द. दि. पुंडे यांनी प्रा. गो. म. कुलकर्णी यांच्या गौरवपर भाषणे केली.

● **२४ जानेवारी १९९६ :** कै. द. रा. बेंद्रे यांच्या जन्मशताब्दीनिमित्त यांचे 'कै. द. रा. बेंद्रे यांचे व्यक्तित्त्व आणि कवित्त्व' या विषयावर डॉ. पंडित आवळीकर यांचे सुश्राव्य भाषण झाले.

● **२१ मार्च १९९६ :** कै. वि. द. घाटे स्मृतिदिनानिमित्त 'रशिया : काल, आज व उद्या' या विषयावर सुप्रसिद्ध पत्रकार व लेखक श्री. नरेंद्र सिंदकर यांचे भाषण आयोजित करण्यात आले होते.

● **२९ मार्च १९९६ :** श्रीज्ञानेश्वरांच्या संजीवन समाधीच्या ७०० व्या वर्षानिमित्ताने श्री. गो. नी. दांडेकर यांच्या 'मोगरा फुलला' या कादंबरीचे प्रकट वाचन डॉ. वीणा देव, डॉ. विजय देव व कु. मधुरा देव यांनी केले. हा कार्यक्रम अ. भा. मराठी साहित्य महामंडळाने पुरस्कृत केला होता.

**कै. का. र. मित्र शारदीय व्याख्यानमाला**

दरवर्षीप्रमाणे या वर्षीची का. र. मित्र शारदीय व्याख्यानमाला दिनांक ४-१२-९५ ते ११-१२-९५ या कालावधीत आयोजित करण्यात आली होती. 'मराठी साहित्य आणि मराठी चित्रपट' या विषयावर ही व्याख्याने आयोजित केली होती. ती खालीलप्रमाणे-

| क्र. | वार व दिनांक | विषय | वक्ते |
|---|---|---|---|
| १ | सोमवार, ४-१२-९५ | १९३० ते ४० यामधील मराठी चित्रपट | श्री. बापू वाटवे |
| २ | मंगळवार, ५-१२-९५ | १९४० ते ५० यामधील मराठी चित्रपट | प्रा. खंडेराव केळकर |
| ३ | बुधवार, ६-१२-९५ | १९५० ते ६० यामधील मराठी चित्रपट | श्री. वि . वि बापट |
| ४ | गुरूवार, ७-१२-९५ | १९६० ते ७० यामधील मराठी चित्रपट | प्रा. द. मा. मिरासदार |
| ५ | शुक्रवार, ८-१२-९५ | १९७० ते ८० यामधील मराठी चित्रपट | प्रा. माधव वझे |
| ६ | शनिवार, ९-१२-९५ | १९८० ते ९५ यामधील मराठी चित्रपट | डॉ. विश्वास मेहेंदळे |
| ७ | रविवार, १०-१२-९५ | मराठी काव्य आणि मराठी चित्रपट | श्री. गंगाधर महांबरे |
| ८ | सोमवार, ११-१२-९५ | मराठी साहित्य व मराठी चित्रपट-समारोप | श्री. श्रीराम लागू |

## पारितोषिके

**१. कै. दि. बा. मोकाशी पारितोषिक**

कै. दि. बा. मोकाशी यांच्या स्मृत्यर्थ दरवर्षी 'कै. दि. बा. मोकाशी पुरस्कार' २९ जूनला देण्यात येतो.

यावर्षी श्री मिलिंद बोकील यांच्या 'उदकाचिया आर्ता ' या पुस्तकाला देण्यात आला. परीक्षक म्हणून श्री शंकर सारडा व श्री अनिल बळेल यांनी काम पाहिले.

**२. कै . प्रा. बाबूराव शिरोळे पारितोषिक : दि. १४ जुलै १९९५**

डॉ. धैर्यशील शिरोळे व सौ. वसुंधरा शिरोळे यांनी या वर्षी बालकुमार साहित्य क्षेत्रात संस्मरणीय कार्य करणाऱ्या लेखकास दरवर्षी रुपये २,५००/- चा पुरस्कार देण्यासाठी रुपये ३०,०००/- ची देणगी दिली. या देणगीच्या ठेवीच्या व्याजातून प्रा. बाबूराव शिरोळे यांच्या स्मरणार्थ देण्यात यावयाचा हा पुरस्कार सुप्रसिद्ध लेखक श्री. भा. रा. भागवत यांना परिषदेचे उपाध्यक्ष श्री. शिवाजी सावंत यांच्या हस्ते समारंभपूर्वक देण्यात आला. श्री. सुधाकर प्रभु यांनी यावेळी श्री. भा .रा. भागवत यांच्या कार्याची थोरवी सांगितली. डॉ. धैर्यशील शिरोळे यांनी कै. बाबूराव शिरोळे यांच्या जीवनकार्याचा परिचय करून दिला.

**३. कै. ग. ल. ठोकळ पुरस्कार : दि. २२ जुलै १९९५**

ठोकळ कुटुंबियांनी ठेवलेल्या ठेवीच्या व्याजातून दरवर्षी ग्रामीण साहित्यास हा रुपये १००१ / - चा पुरस्कार देण्यात येतो. यावर्षी डॉ. भीमराव वाघचौरे यांच्या 'पानपळी' या कादंबरीस हा पुरस्कार देण्यात आला. समारंभाचे अध्यक्ष प्रा. गो. म. कुलकर्णी होते. पारितोषिक समितीत डॉ. अरविंद वामन कुलकर्णी व प्रा. जयश्री पाटील यांनी काम पाहिले.

### ४. श्री. शंकर पाटील कथा / कादंबरी पारितोषिक

१९९५ मधील उत्कृष्ट कथासंग्रहाचे रुपये २०००/ - चे 'कै. शंकर पाटील पारितोषिक' यंदा श्रीमती सानिया यांना त्यांच्या 'भूमिका' या कथासंग्रहास परिषदेचे अध्यक्ष श्री. राजेंद्र बनहट्टी यांच्या हस्ते दिनांक ९-८-९५ रोजी समारंभपूर्वक देण्यात आले. समितीत प्रा. के. ज. पुरोहित व डॉ. विलास खोले यांनी काम पाहिले.

### ५. कै. द. वा. पोतदार पारितोषिक

म. म. द. वा. पोतदार यांच्या स्मृतिदिनी त्यांच्या स्मृत्यर्थ ऐतिहासिक, वैचारिक वा साहित्यविषयक ग्रंथाला रुपये २५०/- चे पारितोषिक देण्यात येते. यंदाच्या वर्षी हे पारितोषिक श्री. वि. स. वाळिंबे यांना त्यांच्या '१९४७' या ग्रंथाला श्री. ग. प्र. प्रधान यांच्या हस्ते दिनांक ६-१०-९५ रोजी समारंभपूर्वक देण्यात आले. परीक्षक समितीत डॉ. म. श्री. माटे व श्री. प्रमोद ओक यांनी काम पाहिले.

### ६. कै विद्याधर पुंडलिक पारितोषिक

कै. विद्याधर पुंडलिक यांच्या कुटुंबियांनी ठेवलेल्या ठेवीच्या व्याजातून उत्कृष्ट व्यक्तिचित्रे, ललित ग्रंथ व एकांकिका या पुस्तकांना आलटून पालटून रु. १०००/- चा पुरस्कार देण्यात येतो. यंदाच्या वर्षी हा पुरस्कार श्री. यदुनाथ थत्ते यांच्या 'साथी - सांगाती' या पुस्तकास श्री. मोहन धारिया यांच्या हस्ते दिनांक ९-१०-९५ रोजी समारंभपूर्वक देण्यात आला. परीक्षक समितीत डॉ. अंजली सोमण व डॉ. ललिता कुंभोजकर यांनी काम पाहिले.

### ७. कॉन्टिनेन्टल प्रकाशन पुरस्कृत 'कै. चिं. वि. जोशी पारितोषिक'

हे पारितोषिक विनोदी पुस्तकाच्या लेखकाला रुपये १२००/- व त्या पुस्तकाच्या प्रकाशकाला रुपये ९००/- देण्यात येते. ही पारितोषिके कै. चिं वि. जोशी यांच्या स्मरणार्थ दरवर्षी १९ जानेवारीला देण्यात येतात.

यंदाचे वर्षी 'हसरा ऋतू' या प्रकाश पाठारे लिखित व श्री अरुण जाखडे प्रकाशित पुस्तकाला व 'चिमाजी अप्पा पुणेकर' या अनंत गाडगीळ लिखित व उल्हास लाटकर प्रकाशित पुस्तकाच्या लेखकाला व प्रकाशकाला अनुक्रमे प्रत्येकी रुपये १२००/- रुपये ९००/- ची पारितोषिके सुप्रसिद्ध कवी व परिषदेचे उपाध्यक्ष श्री. रामदास फुटाणे यांच्या हस्ते दिनांक १९-१-९६ रोजी समारंभपूर्वक देण्यात आली. परीक्षकांतर्फे श्री. मधुकर टिल्लू यांनी भाषण केले. परीक्षक समितीत श्री. रंगा मराठे व श्री मधुकर टिल्लू यांनी काम पाहिले.

### ८. कॉन्टिनेन्टल प्रकाशन पुरस्कृत 'कविवर्य कुसुमाग्रज पुरस्कार'

प्रतिवर्षी कॉन्टिनेन्टल प्रकाशन पुरस्कृत सर्वोत्कृष्ट काव्यसंग्रहाला रुपये १२००/- व त्याच्या प्रकाशनाला रुपये ९००/- चा कविवर्य कुसुमाग्रज पुरस्कार दिनांक २७ फेब्रुवारीला देण्यात येतो.

१९९५ मधील सर्वोत्कृष्ट कवितासंग्रह म्हणून श्री. आनंद जोर्वेकर यांच्या 'काहिलीचे पाणी' ला व प्रकाशक अक्षर चळवळ प्रकाशन यांना, ६९ व्या अ. भा. मराठी साहित्य संमेलनाच्या अध्यक्षा शांताबाई शेळके यांच्या हस्ते दिनांक २७-२-९६ रोजी समारंभपूर्वक

देण्यात आले. परीक्षकांतर्फे सौ. हेमा लेले यांनी काव्यसंग्रहाचे परीक्षण केले. परीक्षक समितीत श्रीमती हेमा लेले, श्री. अनिल किणीकर व डॉ. निशिकांत श्रोत्री यांनी काम पाहिले.

**कै. य. दि. पेंढारकर उर्फ कवी यशवंत पारितोषिक**

दिनांक ९ मार्च १९९६ रोजी दरवर्षी देण्यात येणारा महाराष्ट्र कवी यशवंत पुरस्कार सौ. अंजली कुलकर्णी यांच्या 'मी एक स्त्रीजातीय अस्वस्थ आत्म'' या काव्यसंग्रहास, सुप्रसिद्ध कवयित्री डॉ. अश्विनी धोंगडे यांच्या हस्ते समारंभपूर्वक देण्यात आला. परीक्षकांच्या वतीने श्री. अनिल किणीकर यांनी या काव्यसंग्रहाचे परीक्षण केले.

परीक्षण समितीत श्रीमती हेमा लेले, अनिल किणीकर व डॉ. निशिकांत श्रोत्री यांनी काम पाहिले.

**१०. कै . शं. ना. जोशी पारितोषिक**

के. शं. ना. जोशी यांच्या स्मृत्यर्थ वैचारिक ग्रंथाला दरवर्षी देण्यात येणारे रु. ५०००/- चे पारितोषिक यावर्षी दिनांक २९-३-९६ रोजी श्री दिलीप पुरुषोत्तम चित्रे यांच्या 'शतकाचा संधिकाल' या ग्रंथाला सुप्रसिद्ध ग्रामीण लेखक डॉ. आनंद यादव यांच्या हस्ते समारंभपूर्वक देण्यात आले. परीक्षक समितीत प्रा. ह. श्री. शेणोलीकर व डॉ. गं. ना. जोगळेकर यांनी काम पाहिले.

**११. प्रा. रा. श्री. जोग समीक्षा पारितोषिक**

यंदाचे प्रा. रा. श्री. जोग समीक्षा पारितोषिक, समीक्षक प्रा. रा. ग. जाधव यांना 'कविता आणि रसिकता' या पुस्तकाबद्दल (रु. ३५००/-) आणि परिमल प्रकाशन, औरंगाबाद (रु. ७५०/-) यांना देण्यात आले. परीक्षक म्हणून श्री. वि. स. वाळिंबे, डॉ. म. वि. गोखले व डॉ. गं. ना. जोगळेकर यांनी काम पाहिले.

सर्व ग्रंथ पारितोषिक परीक्षक समितीच्या निमंत्रक म्हणून डॉ. कल्याणी दिवेकर यांनी काम पाहिले.

**दिवाळी अंक पारितोषिके**

**१९९५ मधील पारितोषिक प्राप्त दिवाळी अंक :**

१. अ.स. गोखले पारितोषिक (रुपये १०००/-) अंकाचे नाव - 'महाराष्ट्र टाइम्स'
संपादक - श्री कुमार केतकर, डॉ. दादाभाई नौरोजी रोड, फोर्ट, मुंबई ४००००१

२. रावसाहेब मोरमकर पारितोषिक (रुपये १००/-) अंकाचे नाव - 'मौज'
संपादक - श्री. श्री. पु. भागवत, खटाववाडी, गिरगाव, मुंबई ४००००४

३. का. र. मित्र पारितोषिक (रुपये १००/-) अंकाचे नाव - 'साप्ताहिक सकाळ'
संपादक - सदा डुंबरे, ५९५ बुधवार पेठ, पुणे ४११००२

४. शं. वा. किर्लोस्कर पारितोषिक (रुपये १००/-) अंकाचे नाव - 'बहिणाई '
संपादक-सौ. वर्षा पाटील, १११ मंत्री हाऊस, फर्ग्युसन कॉलेज रोड, पुणे ४

५. दिवाळी अंकातील उत्कृष्ट ललितलेखास कै. अनंत काणेकर यांच्या स्मृत्यर्थ रु. २०० चे पारितोषिक 'विवेक' दिवाळी अंकातील श्री. रेणु दांडेकर यांच्या 'आनंदवनभुवन' ला देण्यात

आले.

या स्पर्धेत निर्णयासाठी श्री. राजा फडणीस व श्री श्याम भुरके यांनी आणि निमंत्रक म्हणून डॉ. कल्याणी दिवेकर यांनी काम पाहिले.

## ग्रंथ पारितोषिके

महाराष्ट्र साहित्य परिषदेतर्फे देण्यात येणाऱ्या विविध पारितोषिकांसाठी १९९५ सालाकरिता निवडलेली पुस्तके -(ही पारितोषिके **दि. २६-५-९६** रोजी समारंभपूर्वक देण्यात आली.)

| | पारितोषिकाचे नाव व वाङ्मयप्रकार | रुपये |
|---|---|---|
| १. | हरि नारायण आपटे पारितोषिक (कादंबरी)<br>'दशक्रिया' - बाबा भांड, साकेत प्रकाशन, औरंगाबाद | १००/- |
| २. | वा. म जोशी पारितोषिक (कादंबरी)<br>'दु:खाचे श्वापद' -रंगनाथ पठारे, शब्दालय प्रकाशन, श्रीरामपूर | १,०००/- |
| ३. | ह.स. गोखले पारितोषिक (कविता)<br>'लाटांच्या आसपास' - प्रियदर्शन पोतदार, मौज प्रकाशन, मुंबई | ३००/- |
| ४. | आनंदीबाई शिर्के पारितोषिक (कथा)<br>'आगराळ' - चंद्रकुमार नलगे, मेहता प्रकाशन, पुणे | १०००/- |
| ५. | नी. स. गोखले पारितोषिक (कथा)<br>'चांदण फुला' - सुमेघ वडावाला (रिसबूड), मेहता प्रकाशन पुणे | ३००/- |
| ६. | गिरिजा गंगाधर जांभेकर पारितोषिक ( संपादित पुस्तकासाठी )<br>'मिथवाणी' - उषा बंबावले आणि सुमित्रा भावे, स्नेहवर्धन प्रकाशन पुणे | १००/- |
| ७. | अ. स. गोखले पारितोषिक (उत्कृष्ट प्रकाशन)<br>'अंगतपंगत' - ल. गो. परांजपे (प्रकाशक), ज्योत्सा प्रकाशन, मुंबई | ३००/- |
| ८. | ह. श्री. शेणोलीकर पारितोषिक (समीक्षा)<br>'भावपेशी' - अरुण गद्रे, देशमुख आणि कंपनी पुणे | ५००/- |
| ९. | वासुदेव धोंडो आणि भागीरथीबाई दीक्षित पारितोषिक (धार्मिक)<br>' सिख्ख गुरुचरित्र - शोध आणि बोध '-<br>डॉ. अशोक कामत, स्नेहल प्रकाशन, पुणे | १,०००/- |
| १०. | तुळशीराम वाघ पारितोषिक (संतवाङ्मय)<br>'ज्ञानेश्वरांचा अलौकिकतावाद' - श्यामला मुजुमदार,<br>मनोहर कथा प्रकाशन, नागपूर | २५०/- |
| ११. | सुनील प्रधान पारितोषिक (बालवाङ्मय)<br>'कथांची दुनिया' - रमेश महाले , साकेत प्रकाशन, औरंगाबाद | २००/- |
| १२. | विनायक कोंडदेव ओक पारितोषिक (कुमारवाङ्मय)<br>'गावमोहन' - अरुण जाखडे, अभिनुजा प्रकाशन, पुणे | १००/- |
| १३. | म. वि गोखले पारितोषिक (नाट्यसमीक्षा/नाटक)<br>'मराठी नाट्यपरंपरा : शोध आणि आस्वाद'- तारा भवाळकर, मेहता प्रकाशन, पुणे | ७५०/- |

| | | |
|---|---|---|
| १४. | रा. ना. नातू पारितोषिक (इतिहासविषयक लेखन)<br>'महाभारताचे वरदान' - श्री. र. भिडे, राजहंस प्रकाशन, पुणे | ७५०/- |
| १५. | श्री. शा. हणमंते (कोश व संदर्भ वाङ्मय)<br>'सूचींची सूची' - सु. रा. चुनेकर, प्रतिमा प्रकाशन, पुणे | ३५०/- |
| | ललितेतर वैचारिक पुस्तकांसाठी असलेली पारितोषिके खालीलप्रमाणे - | |
| १६. | सत्यशोधक केशवराव विचारे पारितोषिक<br>'जन-मन' - अरुण टिकेकर, श्री विद्या प्रकाशन, पुणे | १०००/- |
| १७. | लोकहितवादी देशमुख पारितोषिक<br>'नारायण मेघाजी लोखंडे' - मनोहर कदम,<br>महात्मा समता प्रतिष्ठान प्रकाशन, पुणे | ७५०/- |
| १८. | गणेश सरस्वती ठाकूरदेसाई पारितोषिक (एक वर्षाआड)<br>'घाणेरीची फुले' - रामनाथ चव्हाण, उत्कर्ष प्रकाशन, पुणे | १००/- |
| १९. | गणेश सरस्वती ठाकूर देसाई पारितोषिक (एक वर्षाआड)<br>'पारंपरिक मराठी तमाशा आणि आधुनिक वगनाट्य'<br>- विश्वनाथ शिंदे, प्रतिमा प्रकाशन, पुणे | ४००/- |
| २०. | शि. म. परांजपे पारितोषिक<br>'शोधता शोधता' - य. दि. फडके, श्री विद्या प्रकाशन, पुणे | २५०/- |
| २१. | ना. गो. चापेकर पारितोषिक<br>'आंबेडकरी चळवळ : परिवर्तनाचे संदर्भ'<br>- अविनाश डोळस, सुगावा प्रकाशन, पुणे | २५०/- |
| २२. | विश्वनाथ पार्वती गोखले पारितोषिक<br>'आधुनिक भाषाविज्ञान : सिद्धांत आणि उपयोजन'<br>- मिलिंद मालशे, लोकवाङ्मय गृह प्रकाशन, मुंबई | १५०/- |
| २३. | वासंती काळे पारितोषिक (हस्तकला व कलाविषयक)<br>हस्तकला, हस्तव्यवसाय छंद (संच) अ. दि. कोकड, सन पब्लिकेशन्स पुणे | ५००/- |
| २४. | अभिजात ग्रंथ पारितोषिक (सामाजिक शास्त्रांतर्गत ग्रंथास) (एक वर्षाआड)<br>'काश्मीर : एक शापित नंदनवन' - शेषराव मोरे, राजहंस प्रकाशन, पुणे | ५,०००/- |
| २५. | वि. मो. महाजनी पुरस्कार (कोशकार्यासाठी-एक वर्षाआड)<br>प्रा. भा. म. गोरे | ७५०/- |

पारितोषिकांचा निर्णय करण्यासाठी परीक्षक म्हणून पुढील व्यक्तींनी काम पहिले

डॉ. शशिकांत देशपांडे, सौ. भारती पांडे, सौ. हेमा लेले, डॉ. निशिकांत श्रोत्री, श्री. अनिल किणीकर, डॉ. निर्मला मोने, डॉ. कल्याणी हर्डीकर, डॉ. हे. वि इनामदार, डॉ. प्र. ल. गावडे, डॉ. अरविंद

वामन कुलकणी, डॉ. नीलिमा गुंडी, डॉ. म. वि. गोखले, डॉ. म. श्री. माटे, डॉ. कल्याण काळे, डॉ. रमेश धोंगडे, श्री अनिल जोशी, श्री राजा मंगळवेढेकर, श्री. शं. रा. देवळे, श्री. रवी मुकुल, श्रीमती मेधा राजहंस, श्री. वि. स. वाळिंबे, श्री. हरि नरके, डॉ मनीषा दीक्षित, डॉ. वि. भा. देशपांडे, डॉ. वीणा देव, डॉ. आश्विनी धोंगडे, श्री. राजा फडणीस, श्री. स. मा. गर्गे, डॉ. गं. ना. जोगळेकर

### महाराष्ट्र साहित्यपत्रिका

वृत्तांत सालात पत्रिकेचे चार अंक प्रकाशित करण्यात आले. ऑक्टोबर-डिसेंवर १९९५ चा अंक (दिवाळी अंक) 'विनोद विशेषांक' म्हणून प्रसिद्ध करण्यात आला.

### वा. गो आपटे संदर्भ - ग्रंथालय

ग्रंथालयाचा लाभ सुमारे १२०० सभासद घेत आहेत. वर्षारंभी ग्रंथसंख्या २८,४७१ होती. त्यात मार्च ९६ पर्यंत १४७५ पुस्तकांची भर पडली. आता ग्रंथसंख्या २९,९४६ झाली आहे.

सभासदांना ऐन दिवाळीत दिवाळी अंक वाचायला मिळावेत, या हेतूने १९९५ साली दिवाळी अंक योजना - १९९५ कायान्वित केली. या योजनेला सभासदांचा उत्तम प्रतिसाद मिळाला. १०७ आजीव सभासद या योजनेत सहभागी झाले. या योजनेअंतर्गत ६० दिवाळी अंक खरेदी केले. ७ अंक खास भेटीदाखल मिळाले.

### १९९६ सालातील परीक्षाकार्य

जानेवारी १९९६ मध्ये झालेल्या मराठीच्या परीक्षांची एकूण ३० केंद्रे होती. या परीक्षांना बसलेले उमेदवार पुढीलप्रमाणे -

प्रथमा : २१२४ प्रवेश : ४३७ प्राज्ञ : ६८ विशारद : २०

या सर्व परीक्षांमध्ये यशस्वी झालेले गुणानुक्रमे पहिले तीन उमेदवार पुढीलप्रमाणे-

| क्रमांक | नाव व केंद्र | प्राप्त गुण |
|---|---|---|
| | **प्रथमा परीक्षा** | |
| प्रथम क्रमांक | वैद्य विदिशा वसंत | ८८/१०० विशेष गुणवत्ता |
| १३५२ | केंद्र - मा. रा. सारडा कन्यामंदिर, नाशिक | |
| द्वितीय क्रमांक | कोल्हटकर वरदा वामन | ८७/१०० विशेष गुणवत्ता |
| ९ | केंद्र - विमलाबाई गरवारे प्रशाला, पुणे | |
| तृतीय क्रमांक | बोहरा समीर सुभाषचंद्र | ८६/१०० विशेष गुणवत्ता |
| १४७३ | केंद्र - म. सा. प. शाखा धुळे | |
| | **प्रवेश परीक्षा** | |
| प्रथम क्रमांक | ढोरे रश्मी बाळासाहेब | १६०/२०० विशेष गुणवत्ता |
| २३७ | केंद्र - श्री समर्थ विद्यामंदिर, अहमदनगर | |
| द्वितीय क्रमांक | मांडगे दीपाली पंढरीनाथ | १५०/२०० विशेष गुणवत्ता |
| ३३८ | केंद्र - म.सा.प. शाखा, धुळे | |

| क्रमांक | नाव व केंद्र | प्राप्त गुण |
|---|---|---|
| तृतीय क्रमांक<br>७२२ | सहस्त्रबुद्धे प्रथमेश शशिकांत<br>केंद्र - टिळकनगर विद्यामंदिर, डोंबिवली | १४२/२०० प्रथम श्रेणी |
| | **साहित्यप्राज्ञ** | |
| प्रथम क्रमांक<br>२४ | कुलकर्णी जयश्री रवींद्र<br>केंद्र - म. सा. प. शाखा धुळे | १९५/३०० प्रथम श्रेणी |
| द्वितीय क्रमांक<br>६३ | साळे प्रशांत मारुती<br>केंद्र - म. सा. प. शाखा, धुळे | १६१/३०० द्वितीय श्रेणी |
| तृतीय क्रमांक<br>४३ | पाटील प्रतिभा गोजिहार<br>केंद्र - म. सा. प. शाखा, धुळे | १५९/३०० द्वितीय श्रेणी |
| | **साहित्यविशारद** | |
| प्रथम क्रमांक<br>१ | खांडेकर वैखरी नंदकुमार<br>केंद्र - म.सा.प. पुणे | ४०७/६०० प्रथम श्रेणी |
| द्वितीय क्रमांक<br>३ | पाडळकर कल्याणी विजय<br>केंद्र - म.सा. प. पुणे | ३९९/६०० प्रथम श्रेणी |
| तृतीय क्रमांक<br>८ | देवकर दीपाली अरविंद<br>केंद्र - म. सा. प. शाखा, श्रीरामपूर | ३६५ / ६०० द्वितीय श्रेणी |

डॉ. कल्याणी दिवेकर यांच्या मार्गदर्शनाखाली या वर्षीचे परीक्षा कार्य सुरळीतपणे पार पडले. प्रा. वंदना जोशी, सौ. सुनीला रानडे, सौ. सुजाता शेणई, सौ. सुमती कुलकर्णी, सौ. सुचेता वैद्य, सौ. कुसुम नेर्लेकर, सौ. उज्ज्वला गोखले, श्रीमती निर्मला मोने, श्री. माधव राजगुरू, सौ. रविवाला काकतकर, सौ. शुभश्री काळे, प्रा. शरद अनवलीकर, सौ. अलका शिंदे, श्री. हणमंत कुंभार, सौ. विनया डोंगरे, डॉ. मधुरा कोरान्ने, सौ. वासंती जोशी, सौ. आशा जोशी या सर्वांनी या वर्षी या परीक्षाकार्यात आत्मीयतेने सहकार्य केले. परीक्षा केंद्राचे संचालक, मुख्याध्यापक व वर्गाची तयारी करून घेणारे शिक्षक या सर्वांचे आम्ही आभारी आहोत.

प्रा. भगवान ठाकूर व डॉ. सु. प्र. कुलकर्णी यांच्या सहकार्यामुळे परीक्षाकार्य योग्य प्रकारे पार पडले.

**परिषदेचा वर्धापनदिन**

परिषदेचा ८९ वा वर्धापन दिन २७ मे १९९५ रोजी साजरा करण्यात आला. विधान परिषदेचे उपसभापती प्रा. ना. सं. फरांदे हे प्रमुख पाहुणे होते. अध्यक्षस्थानी परिषदेचे अध्यक्ष श्री. राजेंद्र बनहट्टी होते.

या समारंभप्रसंगी दरवर्षी देण्यात येणारा महाराष्ट्र साहित्य परिषद पुरस्कार रु. ५०००/- व मानचिन्ह -सुप्रसिद्ध ज्येष्ठ कवयित्री सौ. संजीवनी मराठे यांना देण्यात आला. यावेळी सौ. संजीवनी मराठे यांनी भावपूर्ण शब्दात आपली कृतज्ञता व्यक्त केली. या पुरस्कारासंबंधी

निवेदन श्री. रत्नाकर कुलकर्णी यांनी केले.

मराठवाडा साहित्य परिषदेचे कार्यकर्ते प्रा. भगवंतराव देशमुख यांना कै. डॉ. भीमराव कुलकर्णी - रुपये १,०००/- चा पुरस्कार देण्यात आला.

या पुरस्काराचे निवेदन श्री. शंकर सारडा यांनी केले. प्रा. भगवंत देशमुख यांनी आपले मनोगत व्यक्त केले.

या वेळी महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या विविध वाङ्मय प्रकारांसाठी असलेल्या पारितोषिकांचे वितरण अध्यक्षांच्या हस्ते झाले. कार्याध्यक्ष डॉ. गं. ना. जोगळेकर यांनी प्रास्ताविक भाषण केले.

प्रमुख पाहुणे ना. स. फरांदे यांच्या समयोजित भाषणानंतर श्री. राजेंद्र बनहट्टी यांनी अध्यक्षीय समारोप केला. श्री. रवींद्र भट यांनी आभारप्रदर्शन केले.

**शाखा मेळावा**

२६ नोव्हेंबर १९९५ रोजी परिषदेच्या शाखांचे प्रतिनिधी आणि परिषदेचे पदाधिकारी यांचा ठाणे येथे शाखा मेळावा आयोजित करण्यात आला होता.

म. सा. परिषद, पुणे यांच्या वतीने सर्वश्री गं. ना. जोगळेकर, रवींद्र भट; रत्नाकर कुलकर्णी, कल्याणी दिवेकर व राजा फडणीस उपस्थित होते. शाखांच्या वतीने पिंपरी-चिंचवड, बारामती, सोनई, कल्याण, डोंबविली, ठाणे इत्यादि शाखांचे प्रतिनिधी, श्री. ल. रा. कांबळे (येवला), श्री नामदेवराव देसाई (सोनई), श्री संदीप सुभेदार (बारामती), श्री अशोक गोवंडे (इचलकरंजी) इत्यादी हजर होते.

उपस्थित शाखा प्रतिनिधींशी त्यांच्या अडचणींबद्दल सर्वांगीण चर्चा झाली. श्री. गं. ना. जोगळेकर यांनी या वर्षी साजरा करण्यात येणाऱ्या नवती महोत्सवाबद्दल माहिती सांगितली व सर्व शाखा प्रतिनिधींना सहकार्याचे आवाहन केले.

नंतर ठाणे शाखेचे कोषाध्यक्ष श्री. श्रीहरी भिडे यांच्या सुगम संगीताचा कार्यक्रम झाला. श्री. म. पां. भावे यांनी या कार्यक्रमाचे सूत्रसंचालन केले.

ठाणे शाखेचे श्री. पद्माकर शिरवाडकर, श्री. श्रीहरी भिडे, श्री. म. पां. भावे व त्यांच्या सहकाऱ्यांनी सहकार्य केल्यामुळे शाखा मेळाव्याचा हा कार्यक्रम चांगल्या प्रकारे पार पडला.

**महाराष्ट्र साहित्य परिषदेला मिळालेल्या देणग्या**

(१) डॉ. धैर्यशील शिरोळे, डॉ. एम. डी. शिरोळे, सौ. वसुंधरा शिरोळे या शिरोळे कुटुंबियांनी रुपये ३०,०००/- ची देणगी दिली. या देणगीच्या व्याजातून दरवर्षी प्रा. बाबूराव शिरोळे यांच्या स्मरणार्थ बालकुमार साहित्यात लक्षणीय कार्य केलेल्या लेखकास रुपये २,५००/- चा पुरस्कार देण्यात येणार आहे.

(२) डॉ. ज. रा. कदम यांनी परिषदेस रुपये १०,०००/- ची देणगी दिली आहे. या ठेवीच्या व्याजातून प्रतिवर्षी शेतीविषयक पुस्तकाला 'ज. रा. कदम' पुरस्कार रुपये ७५०/- चा देण्यात येणार आहे.

(३) श्री. ल. गो. काळे यांनी ५०००/- ची देणगी दिली आहे. या ठेवीच्या व्याजातून दर वर्षाआड मराठीतील 'कशिदा, भरतकाम, विणकाम' किंवा तत्सम उपयुक्त कलांवरील

पुस्तकास रु. ७५०/- चा 'सौ. वासंती काळे पुरस्कार' देण्यात येणार आहे.

(४) श्री. सुधा सोवनी यांनी ग्रंथालयाच्या मदतीसाठी रु. १०००/- ची देणगी दिली आहे.

(५) श्रीमती सुनंदा कुंटे यांनी रुपये २८०००/- ची भरघोस देणगी ग्रंथालयाच्या विकासासाठी दिली आहे. या देणगीच्या रकमेतून एक स्टील कपाट घेण्यात आले आहे. उरलेल्या रुपये २५,०००/- च्या व्याजाची रक्कम ग्रंथालयासाठी ग्रंथखरेदी व जुन्या ग्रंथांची बांधणी इत्यादीसाठी खर्च करावयाची आहे.

(६) कै. विद्याधर पुंडलीक यांच्या स्मरणार्थ दरवर्षी देण्यात येणाऱ्या पुरस्काराची रक्कम रु. ७५०/- ऐवजी रु. १००० /- करण्यासाठी सौ. मोनिका गजेंद्रगडकर यांनी रुपये ४०००/- ची देणगी दिली आहे.

वरील सर्व देणगीदारांची परिषद अतिशय आभारी आहे.

### नवती महोत्सव

परिषदेला यंदाच्या वर्षी नव्वद वर्ष पूर्ण होत आहेत. या निमित्ताने निरनिराळ्या योजना कार्यान्वित केल्या आहेत. त्याची माहिती पत्रिकेच्या अंकातून देण्यात आली आहे. यासाठी रुपये एक कोटीचा निधी जमविण्याचा संकल्प केला आहे. कार्यकारी मंडळाचे सभासद व इतर अनेक व्यक्तींनी यासाठी देणग्या दिल्या आहेत. त्याचा तपशील पत्रिकेच्या दर अंकात देण्यात येत आहे. सर्व सभासदांना विनंती आहे की त्यांनी या महोत्सवासाठी जास्तीत जास्त रक्कम देणगी द्यावी. रुपये ५००/- च्यावरील देणगीसाठी आयकर कलम ८०-जी नुसार सूटही मिळेल.

### वार्षिक सभा

दिनांक २०-७-९५ रोजी परिषदेचे अध्यक्ष श्री. राजेंद्र बनहट्टी यांच्या अध्यक्षतेखाली वार्षिक सभा पार पडली. १९९४-९५ चे कार्यवृत्त, ताळेबंद, नफातोटा पत्रक व १९९५-९६ चा अर्थसंकल्प यांना या सभेने एकमताने मान्यता दिली.

### परिषदेच्या नव्या शाखा

(१) वृत्तांत सालात श्री क्षेत्र आळंदी (जिल्हा पुणे) येथे नवीन शाखा स्थापन झाली. शाखेच्या अध्यक्षपदी ह.भ.प. श्री किसनमहाराज साखरे, कार्याध्यक्षपदी प्रा. विश्वनाथ कराड, कार्यवाहपदी श्री. मधुकर चावरे व श्री. भारत गोपे यंची निवड करण्यात आली.

(२) उल्हासनगर (जि. ठाणे) येथे वृत्तांत सालात नवीन शाखा स्थापन झाली. उद्‌घाटनप्रसंगी ख्यातनाम लेखक श्री. वि. आ. बुवा यांचे व्याख्यान झाले.

### आठवे विभागीय संमेलन

महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे व राजारामबापू ज्ञान प्रबोधिनीच्या सहकार्याने शनिवार दिनांक १३ व रविवार दिनांक १४ जानेवारी १९९६ रोजी ८ वे विभागीय मराठी साहित्य संमेलन इस्लामपूर येथे आयोजित करण्यात आले. अध्यक्षस्थानी प्रसिद्ध विचारवंत प्रा. डॉ. रावसाहेब कसबे होते. संमेलनाचे उद्‌घाटन आमदार जयंतराव पाटील यांनी केले. राजारामबापू सूत गिरणीचे चेअरमन व संमेलनाचे स्वागताध्यक्ष या दिलीपराव पाटील यांनी उपस्थितांचे स्वागत केले. प्रास्तविक प्रा. शामराव पाटील यांनी केले. यावेळी सर्व कार्यकारी मंडळाच्या उपस्थित

सभासदांचा आ. जयंतराव पाटील यांच्या हस्ते सत्कार करण्यात आला. या संमेलनप्रसंगी मृत्युंजयकार श्री. शिवाजी सावंत यांची उपप्राचार्य प्रा. अविनाश सप्रे, सांगली यांनी मुलाखत घेतली. प्राचार्य डॉ. हरिश्चंद्र निर्मळे यांच्या अध्यक्षतेखाली 'साहित्य आणि अभिरूची' या परिसंवादात श्री. हरि नरके, पुणे, प्रा. डॉ. अच्युत माने,निपाणी आणि प्राचार्य शिवाजीराव कुंभार यांनी आपली मते मांडली. डॉ. अनुराधा गुरव, कोल्हापूर यांच्या अध्यक्षतेखाली झालेल्या 'स्त्रियांची आत्मचरित्रे : सामर्थ्य व मर्यादा' या परिसंवादात डॉ. कल्याणी दिवेकर, पुणे, प्रा. शैला सायनाकर व प्रा. दीपा देशपांडे यांनी भाग घेतला. प्रा. रामदास फुटाणे यांच्या अध्यक्षतेखाली निमंत्रित आणि नवोदित कवींचे संमेलन झाले, यामध्ये विलास माळी, उद्धव कानडे, राजकुमार कवठेकर, प्रकाश पाठारे,. शंकरराव साळुंखे, राजेंद्र टिळे, दीपक स्वामी, मोहन पाटील तसेच डॉ. निशिकांत श्रोत्री, डॉ. शंतनु चिंधडे, चंद्रकांत देशमुख, राम गोसावी, नारायण सुमंत इत्यादी कवींनी आपल्या कविता सादर केल्या.

विभागीय संमेलनाच्या सर्व कार्यक्रमांना मोठ्या प्रमाणात प्रतिसाद मिळाला. हे संमेलन यशस्वी करण्यात प्रा. श्यामराव पाटील, श्री. डी. आर. सलगर, सौ. दीपा देशपांडे, श्री. शरद भोसले, श्री. दशरथ पाटील, प्रा. प्रदीप पाटील, श्री. शहानवाझ मुल्ला, श्री. विलास कुलकर्णी आणि डॉ. मधुकर हसमनीस या सर्वांनी विशेष परिश्रम घेतले.

**लासलगाव शाखा दशकपूर्ती समारंभ**

दिनांक २-१२-९५ रोजी लासलगाव शाखेने, शाखेला १० वर्षे पूर्ण झाल्याबद्दल दशकपूर्ती समारंभ आयोजित केला होता. म. सा. परिषदेच्या कार्यकारी मंडळाचे सर्व सभासद हजर होते. या समारंभात सर्व कार्यकारी मंडळाच्या उपस्थित सदस्यांचा सत्कार करण्यात आला. कार्याध्यक्ष डॉ. गं. ना. जोगळेकर यांनी मार्गदर्शनपर भाषण केले व लासलगाव शाखेच्या पुढील वाटचालीस शुभेच्छा दिल्या. या समारंभानंतर श्री. रामदास फुटाणे यांच्या अध्यक्षतेखाली निमंत्रित कवींचे कवि-संमेलन आयोजित केले होते. या कार्यक्रमास श्रोत्यांनी भरपूर प्रतिसाद दिला. लासलगाव शाखेचे श्री. प्रकाश होळकर यांनी व त्यांच्या सहकाऱ्यांनी हा समारंभ यशस्वी केला.

**ऋणनिर्देश**

परिषदेच्या कार्यकारी मंडळाने केलेल्या विविध कार्यांत अनेक व्यक्ती आणि संस्था यांचे सतत सहकार्य लाभले. महाराष्ट्र शासन, महाराष्ट्र राज्य शिक्षण खाते, ग्रंथालय संचालनालय, महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ, विश्वकोश कार्यालय, पुणे महानगरपालिका, तसेच परिषदेच्या साहित्यिक साहाय्य निधीस भरघोस देणगी देणाऱ्या व्यक्ती व संस्था, सर्व शाखासभांचे कार्यकर्ते, वृत्तपत्रे, नियतकालिके, आकाशवाणी, नव्याने झालेले आजीव व साधारण सभासद, तसेच हितचिंतक या सर्वांचे आम्ही ऋणी आहोत.

| राजा फडणीस | रत्नाकर कुलकर्णी | कल्याणी दिवेकर | भगवान ठाकूर |
|---|---|---|---|
| प्रमुख कार्यवाह | कार्यवाह | कार्यवाह | कार्यवाह |

## महाराष्ट्र साहित्य परिषद

शेड्यूल ८ नियम १७ (१) प्रमाणे

| मागील वर्ष दि. ३१.३.९५ | निधी व देणी | | रक्कम ३१.३.९६ |
|---|---|---|---|
| | **विश्वस्त निधी (स्थिर निधी)** | | |
| | मागील ताळेबंदाप्रमाणे | १०,६१,२०२.४५ | |
| | आजीव सभासद | ·१,०७,७२३.०० | |
| १०,६१,२०२.४५ | | | ११,६८,९२५.४५ |
| | **इतर राखीव निधी** | | |
| | अ. इमारत निधी -मागील ताळेबंदाप्रमाणे | ८९,६४४.९४ | |
| | ब. ग्रंथालय निधी-मागील ताळेबंदाप्रमाणे | ३३,५७३.१० | |
| | जमा १९९५-९६ | २५,०००.०० | |
| | | ५८,५७३.१० | |
| | **आ. वाङ्मय इतिहास योजना निधी** | | |
| | मागील ताळेबंदाप्रमाणे | १,१४,७१२.४९ | |
| | +१९९५-९६ मधील विक्री | ९,५१२.७५ | |
| | +३१.३.१९९६ साठा | ५५,५००.०० | |
| | वजा ९५-९६ मधील खर्च | १,३७१.५० | |
| | वजा ३१.३.१९९५ साठा | ५७,३००.०० | |
| | | १,२१,०५३.७४ | |
| | **इ. पारितोषिक व स्मृतिदिन निधी** | | |
| | मागील ताळेबंदाप्रमाणे | ४,१५,१५६.०० | |
| | १९९५-९६ मधील जमा | ४९,०००.०० | |
| | | ४,६४,१५६.०० | |
| | **ई. फर्निचर खरेदी निधी** | | |
| | मागील ताळेबंदाप्रमाणे | १०,०००.०० | |
| | १९९५-९६ मधील जमा | ३,०००.०० | |
| | | १३,०००.०० | |
| | **उ. इमारत नुतनीकरण निधी** | | |
| | मागील ताळेबंदाप्रमाणे | ८१,४२१.०० | |
| | **ऊ. साहित्यिक साहाय्य निधी** | | |
| | मागील ताळेबंदाप्रमाणे | ३,४२,७३०.५० | |
| | १९९५-९६ मधील जमा | ५७३.०० | |
| | उत्पन्न खर्च खात्यातून वर्ग | २५,०००.०० | |
| | | ३,६८,३०३.५० | |
| १०,८७,२३८.०३ | | | ११,९६,१५२.२८ |
| | इतर देणी | — | ४,०००.०० |
| | ग्रंथालय अनामत | | |
| ८९,५१४.५० | मागील ताळेबंदाप्रमाणे | ८९,५१४.५० | |
| | अधिक १९९५-९६ मधील जमा | ९,७७०.०० | |
| | वजा १९९५-९६ मधील परतफेड | २२५.०० | ९९,०५९.५० |

टिळक रस्ता, पुणे ४११ ०३०

३१ मार्च १९९६ अखेरचे ताळेबंद पत्रक

| मागील वर्ष दि. ३१.३.९५ | निधी व देणी | | रक्कम ३१.३.९६ |
|---|---|---|---|
| | **स्थिर जिंदगी** | | |
| | मागील ताळेबंदाप्रमाणे | १,१८,४५५.४८ | |
| | वजा प्रमाण २.५ प्रतिशतप्रमाणे | २,९६१.३८ | |
| १,१८,४५५.४८ | | | १,१५,४९४.१० |
| | **गुंतवणूक** | | |
| | अ. कर्जरोखे - दर्शनी किंमतीचे | ५,३००.०० | |
| | रूपांतरित कर्ज | २,७००.०० | |
| ८,०००.०० | | | ८,०००.०० |
| | आ. शेअर्स - से. प्रो. रेल्वेज | २,३००.०० | |
| | महाराष्ट्र स्टेट को.- ऑप बँक लि. | १,२५०.०० | |
| ३,५५०.०० | | | ३,५५०.०० |
| | **इ. विश्वस्त ठेवी** | | |
| | मागील ताळेबंदाप्रमाणे | १४,३४,५००.०० | |
| | अधिक ९५-९६ वर्षातील गुंतवणूक | ४,३९,०००.०० | |
| | वजा गुंतवणूक परत ९५-९६ मधील | २,८०,०००.०० | |
| १४,३४,५००.०० | | | १५,९३,५००.०० |
| | **ई. कार्यकारी मंडळ ठेवी** | | |
| | मागील ताळेबंदाप्रमाणे | १,४९,०००.०० | |
| | अधिक ९४-९५ मधील गुंतवणूक | — | |
| | (सा.सा. निधी १,१४,००० | — | |
| १,४९,०००.०० | ग्रंथालय अनामत ३५,०००) | | १,४९,०००.०० |
| | **फर्निचर व टिकाऊ सामान** | | |
| | मागील ताळेबंदाप्रमाणे | १९,३०५ . ९० | |
| | अधिक ९५-९६ मधील खरेदी | ३,७५०.०० | |
| | वजा ९५-९६ मधील विक्री | — | |
| | वजा घसारा १० प्रतिशत | २,३०५.६० | |
| १९,३०५.९० | | | २०,७५०.३० |
| | **ग्रंथालय खाते** | | |
| | मागील ताळेबंदाप्रमाणे | ३६,६१०.१० | |
| | अधिक ९५-९६ मधील खरेदी | ८,२१७.०० | |
| | वजा घसारा १० प्रतिशत | ४,४८२.७० | |
| ३६,६१०.१० | | | ४०,३४४.४० |
| | **शिल्लक साठा (कार्यवाह दाखल्यानुसार)** | | |
| | वाङ्मय इतिहास प्रकाशने | ५५,५००.०० | |

| मागील वर्ष दि. ३१.३.९५ | निधी व देणी | | रक्कम ३१.३.९६ |
|---|---|---|---|
| | **'मराठी फार्स' प्रकाशन** | | |
| | मागील ताळेबंदाप्रमाणे | १६,८५४.२३ | |
| | अधिक - ९५-९६ मधील विक्री | ६३.७५ | |
| | अधिक - ३१.३.९६ साठा | २१,०१०.०० | |
| | वजा - ३१.३.९५ साठा | २१,०४०.०० | |
| १६,८५४.२३ | | | १६,८८७.९८ |
| | **साहित्य परिषद पारितोषिक निधी** | | |
| ३,९१४.२५ | मागील ताळेबंदाप्रमाणे | | ३,९१४.२५ |
| | **संशोधन प्रकाशने** | | |
| | मागील ताळेबंदाप्रमाणे | १६,९३७.९७ | |
| | अधिक - ९५-९६ मधील विक्री | १,४८०.५० | |
| | अधिक ३१.३.९६ साठा | २१,६५०.०० | |
| | वजा -३१-३-९५ साठा | २२,१५०.०० | |
| १६,९३७.९७ | | | १७,९१८.४७ |
| | **'उमलते अंकुर' प्रकाशन** | | |
| १७,०००.०० | मागील ताळेबंदाप्रमाणे | | १७,०००.०० |
| ५८.३० | अखिल भारतीय मराठी साहित्य महामंडळ | ५८.३० | |
| | वजा ९५-९६ खर्च | ५८.३० | — |
| | **नवती महोत्सव निधी** | | |
| | ९५-९६ जाहिरात | ५,५००.०० | |
| | ९५-९६ देणग्या | ७९,११२.०० | |
| — | वजा ९५-९६ मधील खर्च | १,१५९.४० | |
| | | | ८३,४५२.६० |
| २२,१२,७१९.७३ | | | २६,०७,३१०.५३ |

आमच्या आजच्या तारखेच्या अहवालानुसार

पुणे
दिनांक : १०-६-९६

एम. व्ही. भावे, मान्यताप्राप्त लेखापरीक्षक



अनुक्रमणिका






| मागील वर्ष दि. ३१.३.९५ | निधी व देणी | | रक्कम ३१.३.९६ |
|---|---|---|---|
| | संशोधन प्रकाशने | २१,६५०.०० | |
| | मराठी फार्स (प्रकाशन) | २१,०१०.०० | |
| | उमलते अंकूर (प्रकाशन) | १२,०००.०० | |
| १,१२,४९०.०० | | | १,१०,१६०.०० |
| २६०.०० | विद्युत मंडळ अनामत (मागील ताळेबंदाप्रमाणे) | | २६०.०० |
| १०,२६१.७५ | इतर येणी (व्याजासह) | | ४४,४९९.२५ |
| १,१२४.५० | वाङ्मय इतिहास इंग्रजी (मागील ताळेबंदावरून) | | १,६४८.०० |
| ६७,१४५.९२ | आयकर वसुली | | ७२,४००.९२ |
| | **अखेरच्या शिलका** | | |
| | रोख | १०५.९५ | |
| | स्टेट बँक ऑफ इंडिया ४५०५० विश्वस्त | १,३१५.८५ | |
| | बँक ऑफ वडोदा - ५८४७ | २९,२६१.६५ | |
| | पुणे पीपल्स को-ऑप बँक लि. २७९० वि. | २,६६०.०४ | |
| | सा. स. निधी १५९४ | २६,३६२.०० | |
| | १८०४ | ८१,६३८.१५ | |
| | देना बँक - चालू खाते एम २१ | ५३१.५० | |
| | बँक ऑफ महाराष्ट्र १५३० | ७,०७८.०१ | |
| | बँक ऑफ वडोदा- चालू खाते | ५१४.२१ | |
| | देना बँक ३४७५ | १,०२,३४५.२२ | |
| १,८१,५१४.०९ | | | २,५१,८१२.५८ |
| | **तूट खाते** | | |
| | मागील ताळेबंदाप्रमाणे | १,५०,४९१.९९ | |
| | अधिक ठेवी खात्यावरून वर्ग | — | |
| | अधिक चालू वर्षाचा तोटा | — | |
| | उत्पन्न खर्च पत्रकाप्रमाणे | ४५,३९८.९९ | |
| १,५०,४९१.९९ | | | १,९५,८९०.९८ |
| २२,९२,७१९.७३ | | | २६,०७,३१०.५३ |

आमच्या उत्तम माहितीप्रमाणे स्थितीविवरणात दिलेल्या विश्वस्त निधी आणि देयता मालमत्तेचा आणि उत्पन्नखर्च पत्रकातील तपशील बरोबर आहे.

***महाराष्ट्र साहित्य परिषदेकरिता***

विश्वस्त : सर्जेराव घोरपडे, मधुकर परांजपे, म. श्री. दीक्षित

कार्याध्यक्ष : गं. ना जोगळेकर, कोषाध्यक्ष : ना. गो. जोशी,

प्रमुख कार्यवाह : राजा फडणीस

कार्यवाह : कल्याणी दिवेकर, रत्नाकर कुलकर्णी, भगवान ठाकूर

**महाराष्ट्र साहित्य परिषद**
शेड्युल ११ नियम १७ (१) प्रमाणे

| मागील वर्ष ३१.३.९५ | खर्च | | रक्कम दि. ३१.३.९६ |
|---|---|---|---|
| | **मालमत्तेसंबंधी** | | |
| | भूईभाडे व महानगरपालिका कर | १,५२९.०० | |
| | इमारत दुरुस्ती व देखभाल खर्च | ५,७०३.१० | |
| | व्यवसायकर | ८५०.०० | |
| ६,२७८.८० | | | ८,०८२.१० |
| | **व्यवस्थापन** | | |
| | पगार | ५०,९६४.७० | |
| | छपाई, टंकलेखन, स्टेशनरी | ११,७७४.२५ | |
| | टपाल व दूरध्वनी | ८,६७९.८० | |
| | कार्यकारी मंडळ सभा खर्च | १९,२२४.०० | |
| | प्रवास व प्रचार कार्य | ५,७२३.५० | |
| | वीज | ६३,२४४.५४ | |
| | व्यावसायिक आकार | ९००.०० | |
| १,१२,४५५.९३ | | | १,६०,५१०.७९ |
| २,७५०.०० | **लेखापरीक्षक शुल्क** | | २,०००.०० |
| | **किरकोळ खर्च** | | |
| | इतर | १५,०२४.६८ | |
| | आतिथ्य | ८,६२१.०० | |
| | बँक कमिशन | ७१०.०० | |
| | विश्वस्त खाते | — | |
| १४,७६१.०५ | | | २४,३५५.६८ |
| | **घसारा** | | |
| | इमारत | २,९६१.३८ | |
| | फर्निचर व टिकाऊ सामान | २,३०५.६० | |
| | ग्रंथालय | ४,४८२.७० | |
| ९,२५०.२२ | | | ९,७४९.६८ |
| | **संस्थेच्या उद्दिष्टांकरिता खर्च** | | |
| | साहित्यिक सांस्कृतिक कार्यक्रम | ११,११२.७५ | |
| | शाखा सभा (हिस्सा) | ७,८७०.०० | |
| | पत्रिका | १,४३,३८०.५० | |
| | ग्रंथालय (वेतन व इतर) | २१,४२८.०० | |
| | परीक्षा | ३२,१९६.७० | |
| | प्रकाशने | १,७३०.०० | |
| | महामंडळ खर्च | ६,४०३.०० | |
| | विभागीय संमेलन | ११,६५१.०० | |
| २,५६,८६३.९० | | | २,३५,७७१.९५ |
| | **पारितोषिके व स्मृतिदिन** | ७८,१८१.५० | |
| | **वजा जमा** | ५,४००.०० | |
| ४९,८२१.७५ | | | ७२,७८१.५० |
| | **साहित्यिक साहाय्य निधी** | | १२,१५२.०० |
| | **साहित्यिक सा. निधीस वर्ग** | | २५,०००.०० |
| ७१,२१३.०० | **चालू वर्षाची शिल्लक ताळेबंदाकडे वर्ग** | | — |
| **५,२३,३९४.६५** | **एकूण** | | **५,५०,४०३.७०** |



अनुक्रमणिका

टिळक रस्ता, पुणे ४११०३०

दिनांक १.४.९५ ते ३१.३.९६ अखेर कालावधीचे उत्पन्न खर्चपत्रक

| मागील वर्ष ३१.३.९५ | उत्पन्न | | रक्कम दि. ३१.३.९६ |
|---|---|---|---|
| २,५९,१०३.५२ | व्याज (लाभांश इ.) | | २,१६,३५०.७१ |
| ५८,५३५.४५ | देणग्या | | १,०८,८२३.५० |
| | अनुदान | | |
| | शासकीय | १,००,०००.०० | |
| | पत्रिका | २४,०००.०० | |
| | ग्रंथालय | — | |
| १,२६,५००.०० | | | १,२४,०००.०० |
| | इतर उत्पन्न | | |
| | परीक्षा | १४,३९१.०० | |
| | इतर जमा | ८४६.५० | |
| | साधारण सभासद वर्गणी | ४,६५५.०० | |
| | पत्रिका वर्गणी व जाहिरात | ३५,०५२.०० | |
| | प्रकाशने | ८८६.०० | |
| ७५.३६१.६५ | | | ५५,८३०.५० |
| ३,८९४.०३ | तोटा ताळेबंदाकडे वर्ग (चालू वर्षीचा) | | ४५,३९८.९९ |
| ५,२३,३९४.६५ | एकूण | | ५,५०,४०३.७० |







**महाराष्ट्र साहित्य परिषद**

शेड्यूल ११ नियम १७ (१) प्रमाणे

| खाते जमा | संकल्प १९९५-९६ | प्रत्यक्ष १९९५-९६ | संकल्प १९९६-९७ |
|---|---|---|---|
| व्याज व लाभांश | २,१०,०००.०० | १,९१,२५१.०० | २,००,०००.०० |
| साहित्यिक साहाय्य निधी (व्याज) | ३०,०००.०० | २५,०००.०० | २५,०००.०० |
| देणग्या (योगक्षेमार्थ) | ६०,०००.०० | १,०८,९२३.०० | ७५,०००.०० |
| शासकीय अनुदान | १,००,०००.०० | १,००,०००.०० | १,००,०००.०० |
| सा. सं. मंडळ अनुदान (पत्रिकेसाठी) | १२,०००.०० | २४,०००.०० | १८,०००.०० |
| ग्रंथालय अनुदान | २,५००.०० | — | २,५००.०० |
| पत्रिका (वर्गणी जाहिरात इ.) | ४०,०००.०० | २५,०५२.०० | ४०,०००.०० |
| वार्षिक सा. सभासद वर्गणी | ८,०००.०० | ४,६५५.०० | ५,०००.०० |
| परीक्षा शुल्क | २५,०००.०० | १४,३९१.०० | १७,०००.०० |
| किरकोळ (रद्दी इ.) | ५००.०० | १४६.०० | १,०००.०० |
| प्रकाशने | ५,०००.०० | ११,९४२.०० | १०,०००.०० |
| ग्रंथ पारितोषिक स्मृतिदिन | १२,०००.०० | ५,४००.०० | ६,०००.०० |
| साहित्यिक साहाय्य निधी वाटप | — | १२,५००.०० | १६,५००.०० |
| तूट | ३६,२३०.०० | ४५,३१८.९९ | ४५,७००.०० |
| **एकूण** | | | **५,६१,७००.००** |

कार्याध्यक्ष : गं. ना. जोगळेकर, कोषाध्यक्ष : ना. गो. जोशी

राजा फडणीस (प्रमुख कार्यवाह) कल्याणी दिवेकर, रत्नाकर कुलकर्णी, भगवान ठाकूर (कार्यवाह)

